# इस्लामचे पुनरुत्थान

* लेखक *
मुहम्मद कुत्ब

* अनुवादक *
शेख अब्दुल हमीद

# अनुक्रमणिका

*"अल्लाह, असीम दयावंत व कृपावंतच्या नावाने"*

# प्रस्तावना

आजच्या सुशिक्षित लोकांमधील एक फार मोठी संख्या एका जबरदस्त धार्मिक अडचणीत पडली आहे. खरोखरीच धर्म ही मानवी जीवनाची वास्तवता आहे काय? हे शक्य आहे की अशी स्थिती पूर्वी असेल, पण आज जेंव्हा विज्ञानाने मानवी जीवनप्रवाहाची दिशा एकदम बदलून टाकली आहे व जीवनांत वैज्ञानिक सत्याखेरीज दुसऱ्या कुठल्याही बाबीला वावच नाही, अशा वेळी आज हा दाव खरा आहे? धर्म ही मानवी स्वभाव धर्माची निकड आहे काय? की ही भिन्नभिन्न माणसांच्या स्वभावधर्माची निकड आहे की काहींनी धर्माचा अंगिकार करावा व काहींनी करु नये? यावरुन हे सिद्ध होत नाही काय की धर्म मानल्यामुळे किंवा न मानल्यामुळे, मानवी अवस्थेमध्ये कोणताही विशेष बदल घडून येत नाही? तसेच आम्ही मानवाच्या ज्या अवस्थांना "श्रद्ध" व "अश्रद्ध" ही संज्ञा देतो, त्या अवस्थांमध्ये वास्तवतेच्या दृष्टीने कुठलाही फरक आढळून येत नाही?

हे लोक जेव्हा इस्लामच्या बाबतीत बोलतात, तेव्हा त्यातही त्यांच्या मनात अढीच असते. जेव्हा त्यांना हे दाखविले जाते की इस्लाम एखाद्या श्रद्धेचे अगर विश्वासाचे नाव नव्हे, तर ते केवळ आत्म्याचा निर्मळपणा अगर मानवी कल्याण अधिक चांगले करणे व त्या पद्धतीने कृती करण्याचे नाव आहे. तसेच ते सबंध जीवनावर प्रभावी आहे आणि सर्वांना बरोबर घेऊन मार्गक्रमण करणारी एकमेवता आहे. त्यामध्ये एक न्यायपूर्ण अर्थव्यवस्था, संतुलित सामाजिक व्यवस्था, तसेच दिवाणी, फौजदारी व आंतरराष्ट्रीय कायद्यांची व्यवस्था, एक विशिष्ट प्रकारच्या जीवनाचे दर्शन व देहधर्माच्या देखरेखीच्या पद्धतीचा समावेश आहे. खरे तर हे सर्व इस्लामच्या मूलगामी श्रद्धेची व त्याच्या नैतिक, आध्यात्मिक प्रकृतीची फळे होत, असे म्हटल्यावर त्यांच्यात मोठी खळबळ माजते. कारण त्यांच्या दृष्टीने इस्लामने सदासर्वदा परिणामकारक होणारी आपली ताकद बऱ्याच काळापूर्वी हरवलेली आहे आणि आज त्याचे अस्तित्व नसल्यासारखेच आहे. म्हणून जेव्हा त्यांना असे सांगण्यात येते की 'इस्लाम' एखाद्या मृतधर्माचे नाव नसून ती एक जिवंत, बलशाही व जागृत जीवनपद्धत आहे, ज्यामध्ये अशा निर्मळ व मंगल गोष्टी अंतर्भूत आहेत की ज्या गोष्टी समाजवादात आढळत नाहीत. साम्यवादात आढळत नाहीत आणि इतर कोणत्याही "इझम" मध्ये आढळत नाहीत, तर त्यांना असे विधान असह्य होते व त्यावर ते आम्हाला विचारतात की या सर्व गोष्टी तुम्ही अशा धर्मासंबंधीच सांगत नाही काय, जो गुलामगिरी, जमीनदारी व भांडवलशाहीला योग्य व सत्य मानतो? जो स्त्रीला पुरुषाची अर्धांगिनी मानून तिला घराच्या चार भिंतीमध्ये बंदिस्त करुन ठेवतो? असा धर्म जो धोंडेमार करून प्राण घेतो, अवयव छाटण्याची व

फटके मारण्याची रानटी शिक्षा देतो? जो आपल्या अनुयायांना भिक्षा अथवा दान यावर जीवन व्यतीत करण्याचे शिकवितो व लोकांचे विभाजन वेगवेगळ्या वर्गात करतो. ज्यायोगे काही लोक दुसऱ्या लोकांना आपल्या अनुचित शोषणाचे लक्ष्य बनवून ठेवतात अशी जीवनपद्धती ज्यामध्ये श्रमिकांना सुखी व आरामात जगण्याची कोणी शाश्वती देत नाही? आणि तो "इस्लाम" असा आहे, तसा, आहे, म्हणून सांगता, त्या सर्व गोष्टी तुम्ही याच इस्लामबद्दल सांगत आहात काय? त्याची प्रगती होणे व भविष्टकाळात सफल होणे दूरच राहो, पण आम्हाला तर त्याचे अस्तित्वच धोक्यात आहे असे दिसते. प्रस्तुत जगामध्ये जेथे अनेक सामाजिक आणि आर्थिक सिद्धान्त व प्रणालीमध्ये तीव्र संघर्ष जारी आहे, तेथे इस्लामसारख्या घासून ठोकून बनलेल्या धर्माचा निभाव लागणे व तो यशस्वी होणे ही बाब सूक्ष्म अभ्यासाची व चिंतनाची मुळीच नाही.

यापुढे जाण्याआधी क्षणभर आपण या "सुशिक्षित" मनामध्ये अढी व शंका बाळगणाऱ्या लोकांच्या सत्य स्वरुपावर एक दृष्टीक्षेप टाकून पाहू की, या अढींचे व शंकेचे मूळ कशात आहे. त्यांची विचार करण्याची पद्धती त्यांच्या स्वतंत्र विचारशक्तीचा परिणाम आहे किंवा डोळे झाकून इतरांचे अंधानुकरण करण्याचा परिपाक आहे?

खरे तर ज्या प्रकारच्या शंकांचा इस्लामविरुद्ध हे लोक निर्देश करतात त्या त्यांच्या स्वतंत्र विचारशक्तीचा व मनाचा परिपाक नसून ती इतराकडून स्वीकारलेली आहे. अशा शंकाचे उगमस्थान शोधण्यासाठी आजच्या युगाच्या इतिहासावर दृष्टीक्षेप टाकू या.

मध्ययुगात युरोपियन राष्ट्रे व इस्लामी जगत यामध्ये अनेक भयंकर धर्मयुद्धे झाली. त्यानंतर असा एक काळ लोटला की सकृद्दर्शनी या दोघांत सलोखा व समझोता झाला, पण खरी परिस्थिती अशी आहे की या दोघात चिरकाल टिकणारा सलोखा कधी झाला नाही. ते सतत एक दुसऱ्याविरुद्ध उभे ठाकत. म्हणूनच की काय पहिल्या महायुद्धात जेव्हा इंग्रजांनी जेरुशलमवर कब्जा केला तेव्हा इंग्रज लॉर्ड ॲलन्जीने स्पष्ट उद्‌गार काढले, "आज धर्मयुद्धाचा अंत झाला आहे."

याचबरोबर आम्हाला हेही लक्षात ठेवले पाहिजे की गेल्या दोन शतकांत विशेषत: युरोपीय साम्राज्य व इस्लामी जगत यामध्ये सतत चालू राहणारा एक संघर्ष पेटला आहे. तौफीक पाशाच्या देशद्रोहामुळे इंग्रजांना इजिप्तमध्ये आपले पाय रोवण्याची संधी मिळाली. म्हणून त्याच्या सहाय्याने त्यांनी आराबी पाशाच्या नेतृत्वाखाली १८८२ साली झालेल्या जनक्रांतीला असफल केले. त्यानंतर इंग्रजांच्या धोरणाचे खरे स्वरुप असे झाले की वाटेल ते करुन इस्लामी जगतावर आपली साम्राज्यवादी पकड अधिक दृढ करावयाची व शक्य त्या तऱ्हेने इस्लामी आंदोलन व चळवळ दडपून टाकायची, जेणेकरून त्यांची सत्ता टिकून राहील. याचकरिता

विक्टोरियाकालीन पंतप्रधान श्री. ग्लॅडस्टोन याने "कुरआन मजीद" ची एक प्रत हातात उंच उचलून धरून ब्रिटीश "हाऊस ऑफ कॉमन्स"ना म्हटले, "इजिप्शियन लोकांजवळ हा ग्रंथ उपलब्ध आहे, तोवर आम्हास इजिप्तमध्ये सुखासमाधानाने राहाण्याचे भाग्य मिळू शकत नाही."

याचकरिता इंग्रजांनी मुस्लिमांना इस्लामपासून पराङ:गमुख करण्यासाठी व त्याला नष्ट करण्यासाठी, इस्लामी बाबीना टर, टवाळी व उपहास यांचे लक्ष्य बनविले व त्यांच्यासमोर इस्लामचे भयानक स्वरुप चित्रित करुन सादर केले, जेणेकरून त्यांची साम्राज्यवादी पकड मजबूत राहावी व त्यांच्या दुष्ट मनोरथ व आकांक्षाची पूर्तता करता यावी.

इजिप्तमध्ये ज्या प्रकारच्या शिक्षण पद्धतीचा व नीतीचा इंग्रजांनी अवलंब केला त्यामध्ये मुस्लिम विद्यार्थ्यांना खऱ्या अर्थाने आपल्या धर्माचे ज्ञान प्राप्त करुन घेण्याची संधी दिली नव्हती. ही स्थिती येथपर्यंत होती की इंग्रजी साम्राज्याने स्थापिलेल्या शाळातूंन शिकून व ज्ञान प्राप्त करुन झाल्यानंतरही त्यांना इस्लामधर्माचा आत्मा अथवा सार प्राप्त होत नव्हता. या शाळातून इस्लामच्या बाबतीत त्यांना अशी शिकवण देण्यात येत असे त्याचा सारांश असा असे की "कुरआन" हा "अल्लाहने" दिलेला ग्रंथ आहे व त्याचे वाचन पुण्यप्राप्तीसाठी व बरकतीसाठी करण्यात येते. तसेच मानवाला इतर धर्मांप्रमाणेच सज्जन होण्यास व आपल्या आचरणात नैतिक गुणाची निपज करण्याचा प्रयत्न करतो. तसेच इतर धर्मासारखा इस्लामसुद्धा जप, आराधना, भक्ती चमत्कार यांचे एकत्रीकरण व परिपाक आहे. मानवी जीवनाच्या सामाजिक वा आर्थिक व्यवस्थेचा अथवा त्याची शासन व्यवस्था तसेच त्यांच्या आंतरजातीय व आंतरराष्ट्रीय नीतीचा, त्याच्या शिक्षण व संस्काराचा थेट संबंध त्याच्या जिवंत व सजीव अस्तित्वाशी आहे, या बाबतीत विद्यार्थ्यांना केवळ अंधारातच ठेवले जात होते असे नसून उलट त्याना प्राच्यविद्याविशारदद्वारा प्रस्तुत केले गेलेल्या शंका, संभ्रमरुपी इंजेक्शनांचे डोस एकसारखे दिले जात असत, जेणेकरुन त्यांच्या मनात संभ्रम निर्माण करुन त्यांचा उपयोग साम्राज्यवाद्यांनी आकांक्षापूर्ती करून घेतला.

साम्राज्यवाद्यांनी घडविलेल्या शिक्षणपद्धतीत विद्यार्थ्यांना फक्त हेच शिकविण्यात येत असे की पृथ्वीवरील जीवनपद्धतीमध्ये युरोपियन जीवनपद्धतीच सर्वोत्तम आहे. सर्वोत्तम अर्थव्यवस्था युरोपियन विचारवंतानी काढलेल्या निष्कर्षाचाच परिणाम आहे. तसेच जी शासनपद्धत शतकानुशतक वर्षांच्या प्रयोगानंतर युरोपियन राष्ट्रांनी घडविली, तीच संविधानिक शासनपद्धत सर्वोत्कृष्ट आहे.

त्यांनी विद्यार्थ्यांच्या मनात हे पक्के बिंबविले की मानवाला मूलभूत अधिकार सर्वाआधी फ्रेंच क्रांतीने मिळवून दिले. लोकशाही व लोकशाहीप्रधान जीवनपद्धतीच्या लोकप्रियतेचे विकासाचे संपूर्ण श्रेय ब्रिटनच्या लोकशाहीच्या कार्यांना दिले जाते. तसेच संस्कृती, सुसंस्कारांचा मूळ पायाही रोमनसंस्कृतीची देणगी आहे.

सांगावयाचे तात्पर्य एवढेच की अशा प्रकारच्या शिक्षण पद्धतीने युरोप व युरोपवासीयांचे मोठे आकर्षक चित्र घडविले. ते पाहून असा आभास निर्माण झाला की जणू काय युरोप एक महान व बलशाली शक्ती आहे, जिच्यावर कोणीही अधिपत्य करु शकत नाही. त्याचप्रमाणे युरोपवासीयांच्या आकांक्षा पूर्तीमध्ये कोणीही अडसर होऊ शकत नाही. उलट विद्यार्थ्यांसमोर पूर्वेला सतत हिणकस व खालच्या दर्जाचे लेखले जात असे व त्यांचे मानहानीचे चित्र रंगविण्यात येत असे. जणूकाय पौर्वात्य माणूस हा लहान देहयष्टीचा एक वामनमूर्ती आहे. ज्याची महाकाय युरोपियन माणसासमोर काही किंमत वा व्यक्तिमूल्य नाही. किंतू त्यांचे अस्तित्व, जीवन व मरण सर्वथा युरोपियनांच्या दयेवर व कृपेवर अवलंबून आहे. त्यांची स्वत:ची कोणतीही संस्कृती, सुसंस्कार नाहीत व जे काही थोडेसे आहे ते इतके मागास व दर्जाहीन आहे की पूर्वेलाही पाश्चिमात्यांच्या सामाजिक व सांस्कृतिक मूल्यांचा अंगिकार करण्याशिवाय पर्याय नाही.

साम्राज्यवाद्यांचे राजकारणी व्यूह शेवटी परिणामकारक ठरले. परिणामस्वरुप इजिप्शियन मुस्लिमांची नवी पिढी राष्ट्रीय स्वाभिमान व आपले स्वतंत्र सांस्कृतिक अस्तित्वाची कल्पनाही विसरुन गेली. त्यांच्या मनावर व विचारशक्तीवर युरोप व येथील संस्कृतीचा प्रभाव पडला होता. ते आपल्या डोळ्यांनी काहीही पाहू शकत नव्हते. तसेच आपल्या प्रभावित बुद्धीपासून वेगळे होऊन स्वतंत्रपणे काहीही विचार करु शकत नव्हते. त्यांच्या दृष्टीची व चिंतनाची भरारी मर्यादित होती व ती आपल्या युरोपियन धन्याच्या सहाय्यावर, उपदेशावर व मर्जीवर अवलंबून होती.

या ऐतिहासिक पार्श्वभूमीच्या प्रकाशात पाहिले तर असे दिसून येते की, मुस्लिमांच्या आजच्या ''सुशिक्षित'' लोकांचे अस्तित्व हे साम्राज्यवादी शक्तींनी रचलेल्या राजकारणी षडयंत्राचेच फळ आहे. त्यांचा षडयंत्राच्या यशाचा हा सर्वांत मोठा युक्तिवाद आहे. मुस्लिम समाजातील या वर्गाचे विचार व चिंतन साम्राज्यवाद्यांच्या आकांक्षाचे खरेखुरे चित्र उभे करते.

इस्लामसंबंधी अपूर्ण ज्ञान या बिचाऱ्यांनी आपल्या पाश्चिमात्य गुरुकडून प्राप्त केलेले आहे. त्याचप्रमाणे धर्माच्या बाबतीतील त्यांचे ज्ञान व विचार, खरे तर युरोपवासीयांना वाटलेल्या शंका व संभ्रमांचेच प्रतिध्वनि आहेत. म्हणून त्यांचे अंधानुकरण करून हे लोकही इस्लामसंबंधी तऱ्हेतऱ्हेच्या अर्थहीन शंका उपस्थित करीत असतात. काहीवेळा म्हणतात की इस्लामचा राजकारणात, शासकीय कार्यात कसलाही हस्तक्षेप असू नये तर कधी विज्ञान व इस्लामच्या दरम्यान वैर असल्याचे नगारे बडविण्यात येतात.

परंतु अज्ञानाचे नष्टचर्य संपो! त्यांना कदाचित ही वस्तुस्थिती ठाऊक नाही की ज्या धर्मांविरुद्ध उठाव करण्यासाठी युरोप बुद्धीपरिकर झाला होता तो इस्लाम नसून त्यापेक्षा अगदी भिन्न असा दुसरा धर्म होता. हेही विसरतात की ज्या परिस्थितीत युरोपवासीयांना त्यांच्या

धर्मांपासून विन्मुख केले ती परिस्थिती युरोपपुरतीच मर्यादीत होती व जगाच्या दुसऱ्या कुठल्याही भागात याचे उदाहरण आढळत नाही. कमीतकमी इस्लामी इतिहास तरी अशा प्रकारच्या गोष्टींना अपरिचित आहे. तसेच भविष्यकाळात अशी गोष्ट होणे असंभव आहे, पण युरोपचे हे आंधळे अनुयायी न समजता-उमजता इस्लामला आपल्या सामाजिक, राजकीय तसेच आर्थिक जीवनापासून वेगळे करण्याचे जणू व्रत घेऊन बसले आहेत. त्यांचे समीप इस्लाम केवळ याचकरिता त्याज्य नष्ट करण्यालायक आहे कारण युरोपवाले धर्मविन्मुख आहेत व आपल्या धर्माला त्यांनी जवळजवळ हद्दपार केल्यासारखे आहे.

युरोपात धर्मविज्ञान यामधील संघर्षाचे खरे कारण चर्चवाल्यांचा मूर्खपणा होता, ज्यामुळे त्यांनी अविचाराने ग्रीसमधून वारसाहक्कानें प्राप्त झालेल्या काही वैज्ञानिकी सत्यांना आपल्या चर्चचाच एक भाग बनवून त्यांना पवित्र स्थान दिले. त्यांचे समीप त्यांचा इन्कार सत्य व वस्तुस्थितीचा इन्कार होता. म्हणून विज्ञानाने सिद्धान्त व प्रयोगाच्या दृष्टीने त्यांच्या त्या प्रिय सिद्धान्ताची चूक व कमकुवतपणा उघड केला. तरी या लोकांना शहाणपण आले नाही व पूर्वी प्रमाणेंच ते आपली चूक नेटाने करीत आहेत. अशा परिस्थितीने युरोपात चर्च व चर्चवाले, या दोहोंची प्रतिष्ठा मोठ्या प्रमाणात खालावली गेली, चर्च-विज्ञान यामधील संघर्ष त्या वेळी पराकोटीला पोहचला आणि लोकांनी चर्चच्या धार्मिक दडपण व हिंसाचार याविरुद्ध गंभीर प्रतिक्रिया सुरु केली व त्यापासून मुक्त होण्याच्या इच्छेला पुष्टी मिळत गेली. त्या वेळी चर्चने आपल्या 'ईश्वरी अधिकाराचा' वापर अतिक्रूरतेने व बेगुमानपणे करण्याचे सुरु केले. आपल्या अशा पद्धतीने युरोपवाल्यांसमोर त्यांनी धर्माचे जे चित्र उभे केले ते अत्यंत किळसवाणे व अंधकारपूर्ण होते. त्यांचा धर्म एक असा पोकळ डोलारा होता की जो माणसाला दिवसा सुखाने बसून देत नव्हता तसे रात्रीही त्यांच्या दुष्टपणापासून वाचला नव्हता. चर्च धर्माच्या नावावर या मोठमोठ्या रकमा वसूल करीत होता, त्यामुळे ते आचरणाने त्यांचे गुलाम बनले होते. चर्चचे लोक स्वत:ला अल्लाहचा प्रतिनिधी मानत होते व त्यांची इच्छा अशी होती की लोकांनी त्यांचे म्हणणे व अन्याययुक्त कारवायांचा डोळे मिटून स्वीकार करावा. म्हणूनच ज्या काही विज्ञानतज्ञांनी त्यांच्या कोणत्याही मताला विरोध केला, त्यांना या लोकांनी अतिकठोर शारीरिक क्लेश दिले आणि लहान सहान बाबीवर त्यांना जिवंत जाळण्यात आले. पृथ्वी गोल आहे असे विधान करणारे वैज्ञानिक या गोष्टीचे उत्तम उदाहरण आहे.

अशा रितीने चर्चच्या या हिडीस अत्याचाराने युरोपातील सकल विचारवंताना व स्वतंत्र व स्वाभीमानी व्यक्तींना बेचैन करुन सोडले. त्यांनी असे ठरविले की या दैत्यांना धैर्याने तोंड दिले पाहिजे. यायोगे ते बिलकूल नष्ट तरी होतील किंवा इतके प्रभावहीन होतील की पुढे कधीही लोकांना छळू शकणार नाहीत. आपल्या खोट्या उदाहरणाने असा ढोंगी प्रकार करू शकणार नाही, की धर्म एक असत्य थोतांड आहे.

पण आम्हा मुस्लिम आणि इस्लाममधील संबंधाचे स्वरूप तेच आहे काय, जसे युरोप व चर्चचे संबंध होते? जर नाही तर इस्लाम व विज्ञान यामधील संघर्षाचा हा सारा कल्लोळ कशाकरिता आहे? सत्य तर हे आहे की इस्लाम व विज्ञान यांच्या दरम्यान कोणताही संघर्ष नाही व आजतागायत कोणतेही असे वैज्ञानिक सत्य पुढे आले नाही ज्याच्याशी इस्लामचा संघर्ष होणे अपरिहार्य ठरेल. दीर्घ इस्लामी शासकीय कारकिर्दीत असा कोणताही काळ झाला नाही जेव्हा वैज्ञानिकांना जुलूम, अत्याचार व रानटीपणाचे लक्ष्य बनविले गेले. आज इस्लामचा समग्र इतिहास आमच्यासमोर आहे. त्यामध्ये पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, गणितशास्त्र तसेच भौतिकशास्त्राचे मोठमोठे चिकित्सक व तज्ञ होऊन गेले. परंतु एकही असे उदाहरण उपलब्ध नाही की त्यामधल्या कोणत्याही वैज्ञानिकांना केवळ त्यांच्या सिद्धान्ताच्या कारणामुळे जुलूम वा अत्याचाराचे लक्ष्य व्हावे लागले. या मुस्लिम वैज्ञानिकांपैकी कोणीही इस्लाम व विज्ञान यांच्या दरम्यान कसलाही विरोध असल्याचे मानले नाही किंवा त्यांना तसे वाटले नाही. तसेच मुस्लिम राज्यकर्त्यांनी चर्चवाल्यांप्रमाणे वैज्ञानिकांना कधीही आपले शत्रू मानले नाही. म्हणून इस्लामी इतिहासात कोणाही वैज्ञानिकाला जिवंत जाळले गेले नाही व कोणालाही कैद व बंदिस्त केले गेले नाही.

असे असताना काहीजण इस्लाम व विज्ञान हे परस्परविरोधी असल्याचे सिद्ध करण्यासाठी कंबर कसून आहेत. हे लोक इस्लामविरुद्ध ज्ञान प्राप्त केल्याशिवाय त्याचे दोष दाखवित असतात. साम्राज्यवाद्यांनी त्यांच्या नसानसांत हे विष भिनवले आहे. त्यांच्यात बाह्यदर्शनी खूणा म्हणून या सर्व गोष्टी निर्देष करतात; पण त्यांना आजतागायत या सर्व बाबींचे काहीही वाटत नाही.

अशा लोकांना संबोधून ही पुस्तिका लिहिलेली नाही. कारण माझ्या मते त्यांना काही सांगणे अकाळी व अवेळी आहे. त्यांना सरळमार्गावर येण्यासाठी आम्हाला त्या शुभ घडीची प्रतीक्षा करावी लागले, जेव्हा त्यांचे पाश्चिमात्य गुरु आपल्या निरीश्वरवादी जडसंस्कृतीशी निराश होऊन त्यांना एका अशा जीवनपद्धतीची तृष्णा लागली असेल, जी जीवनाच्या सर्व अंगोपांगावर प्रभावित असेल व आत्मा, जड, सृष्टी 'ईमान' (श्रद्धा) व आचार या सर्व बाबतीत योग्य मार्गदर्शन करीत असेल. अशा वेळी त्यांचे अनुकरण करून हे लोकही सरळमार्गावर येणे संभवनीय आहे.

लेखक : मुहम्मद कुत्ब

**प्रकरण पहिले**

# आता इस्लामची गरज उरली नाही काय?

आज विज्ञानाच्या आश्चर्यजनक यशाने पाश्चिमात्य लोकांना असे काही भारून टाकले आहे की त्यांच्यात असा शीघ्रगतीने विचार पसरला आहे, की विज्ञानाने धर्माला कायमचे परागंदा करून टाकले आहे. कारण त्याची उपयुक्तता संपली आहे. मानसशास्त्राच्या तसेच समाजशास्त्राच्या प्रसिद्ध तज्ञापैकी जवळजवळ सर्वांनी अशाप्रकारचे विचार व्यक्त केले आहेत. उदाहरण द्यावयाचे म्हटले तर युरोपमधील प्रसिद्ध मानसशास्त्रज्ञ 'फ्राईड'ने धर्माच्या पुनरुज्जीवनाच्या प्रयत्नावर हल्ला व उपहास करताना असे लिहिले की मानवी जीवन तीन प्रकारच्या स्पष्ट मानसशास्त्रीय कालातून जात असतो. रानटीकाल, धर्मकाल आणि वैज्ञानिक काल, आता विज्ञानाचे युग आहे म्हणून धर्माच्या गोष्टीत काही अर्थ व तथ्य नाही, तो संपला आहे व आपले मूल्य हरवून बसला आहे.

## धर्माशी वैरभावाचे खरे कारण

यापूर्वी प्रस्तावनेत आम्ही लिहिले आहे धर्माच्या बाबतीत युरोपियन वैज्ञानिकांच्या विरोधी भूमिकेचे खरे कारण तो संघर्ष होता जो त्यांना युरोपीय चर्चच्या विरुद्ध करावा लागला. त्या संघर्षात चर्चने ज्या प्रकारच्या आचरणाचे प्रदर्शन केले ते पाहून ते लोक हेच सत्य आहे असे समजू लागले की धर्म हा प्रतिगामीत्व, रानटीपणा, अंधविश्वास निर्मूल व बिनबुडाच्या विचारांचा परिपाक आहे. म्हणून श्रेयस्कर असे आहे की धर्म कायमचा नष्ठ केला जावा. विज्ञानाला पुष्टी दिली जावी व त्याच्या मार्गदर्शनात मानवजातीची, तसेच संस्कृतीचा विकास चालू राहू शकेल.

## युरोपचे अंधानुकरण करणारे

युरोपीयन वैज्ञानिकांचे धर्माशी वैर असण्याचे खरे कारण हे होते. धर्माविरुद्ध असणारे काही मुस्लिम या खऱ्या कारणाला समजून घेत नाहीत, तसेच पूर्व व पश्चिमेतील परिस्थितीचा फरक लक्षात घेत नाहीत व धर्माला विरोध करीत असतात. त्यांचा विरोध एखाद्या गंभीर चिंतन व विचारांती नसतो, किंबहुना तो युरोपच्या अंधानुकरणाचे अपत्य आहे. त्यांच्यासमीप विकास व उन्नतीचा तोच एकमेव मार्ग आहे ज्या मार्गाने युरोपियन राष्ट्रे जात आहेत. म्हणून आम्हालाही धर्माची कास सोडून दिली पाहिजे. असे नाही केले तर लोक आम्हाला प्रतिगामी व मागासलेले म्हणून टोमणे मारतील.

दुर्दैवाने हे लोक विसरतात की युरोपियन विद्वानांमध्येही धर्मविरोधाच्या बाबतीत पूर्वी एकमत आढळत नाही. तसेच आताही पूर्ण एकमत आढळत नाही. याउलट काही मोठे विद्वान या निरीश्वरवादी संस्कृतीला विटून हे सत्य उघडपणे बोलू लागले आहेत, की धर्म ही मानवाची अनिवार्य मानसशास्त्रीय व बौद्धिक गरज आहे.

## युरोपियन विद्वानांची साक्ष

या विद्वानात प्रसिद्ध खगोलशास्त्रज्ञ जेम्स जीन्स प्रमुख आहे. जेम्सच्या जीवनाचा आरंभ एक निरीश्वरवादी व प्रत्येक विषयात शंकादृष्टी ठेवणाऱ्या युवकाच्या रुपात झाला. पण आपल्या अनेक वैज्ञानिक शोधांनंतर शेवटी या निष्कर्षाप्रत येऊन पोहोचला की धर्म ही मानवी जीवनातील अनिवार्य गरज आहे, कारण ईश्वरावर आस्था बाळगल्याविना विज्ञानाच्या मूळ समस्या उलगडल्या जाऊ शकत नाहीत. हा प्रसिद्ध समाजशास्त्रज्ञ जेम्स जीन्ज धर्माच्या समर्थनार्थ इतका पुढे गेला, की त्याने जडवाद व अध्यात्मावाद या दोघांच्या समन्वयावरील विश्वास व आचरण यांचा समतोल एकत्रित करण्याच्या पद्धतीवर इस्लामची उघडपणे स्तुती केली. इंग्लंडचे प्रसिद्ध साहित्यिक 'समर्सेटमॉम'ने धर्माच्या बाबतीत आजच्या युरोपातील नकारात्मक भूमिकेला या शब्दांत संबोधिल आहे, ''युरोपने आपल्याकरिता एक नवीन ईश्वर 'विज्ञान' शोधून काढले आहे आणि जुन्या ईश्वरापासून तोंड फिरविले आहे.''

## युरोपचा नवा ईश्वर

परंतु युरोपचा हा नवीन ईश्वर मोठा ''परिवर्तनवादी'' निघाला आहे. हा प्रत्येक क्षणी बदलत असतो व त्याचा दृष्टिकोन नेहमी बदल व स्थित्यंतर करण्याकडे असतो. एखाद्या गोष्टीला तो आज 'सत्य' मानतो, तर उद्या खोटे, असत्य व फसगत असे म्हणून टाकतो. परिवर्तनाचे हे चक्र असे चालतच राहते. ते कधी संपत नाही आणि त्याचे भक्त नेहमी त्रासलेले असतात. अशा तऱ्हेच्या परिवर्तनशील व प्रत्येकक्षणी बदलणाऱ्या ईश्वराच्या छत्राखाली ते आणखी वेगळी कसली आशा करू शकतात. आजचे पाश्चिमात्य जगत बेचैनी व असंतोषाच्या मेघांनी झाकोळलेले आहे. ते अनेक मानसिक व मानसशास्त्रीय रोगांचे बळी होत आहेत. ती त्यांच्या मूळ आध्यात्मिक रोगाची बाह्यचिन्हे होत.

## विज्ञानाचे नवे जग

विज्ञानाला ईश्वरपद बहाल करण्याच्या कृतीचा आणखी एक असा परिणाम निघाला आहे की जेथे तुम्ही आम्ही राहतो, हे जग कुठल्याही स्पष्ट उद्देशापासून अथवा ध्येयापासून बिलकूल वंचित झाले आहे. त्याचा कुठलाही उच्च उद्देश नाही, व्यवस्था नाही तसेच कोणतीही श्रेष्ठ सत्ता वा शक्ती येथे अस्तित्वात नाही, जिच्याद्वारे जगाचे मार्गदर्शन होऊ शकेल. येथे परस्परविरोधी शक्तींमध्ये सतत संघर्ष चालू आहे व येथील प्रत्येक वस्तू परिवर्तनाचे लक्ष्य आहे. आर्थिक पद्धती असो की राजनैतिक तसेच राज्य आणि व्यक्तीचे संबंध असो, येथील प्रत्येक गोष्ट बदलत असते इथपर्यंत की वैज्ञानिक सत्येही बदलतात. उघड आहे की या अंधकारमय व भयानक जगात, मानवाला सततच्या त्रास, बेचैनी व असंतोषाखेरीज काही प्राप्त होऊ शकत नाही. विशेषकरुन अशावेळी जेव्हा वातावरण एखाद्या उच्चतम सत्तेच्या कल्पनेशीही अनभिज्ञ आहे. गुंतागुंतींनी जीवनातील अडचणींनी, दुखांनी पीडित झालेल्यांना व गांजलेल्यांना त्याच्या पदराखाली शरण जावून आश्रय घेतल्याने सुख व शांती प्राप्त होऊ शकेल.

## शांतीचा एकच मार्ग

धर्म आणि फक्त धर्मच जगाला गमावलेली सुख-शांती देऊ शकतो. तो माणसाच्या मनात खऱ्या अर्थाने प्रेम निर्माण करुन त्याला अन्यायाशी सामोरे जाऊन मुकाबला करण्याचे धैर्य प्रधान करतो आणि त्याला दर्शवितो की जर तो आपल्या पालनकर्त्या स्वामीच्या प्रसन्नतेचा इच्छुक आहे, तर त्याने दुष्टपणाचे अधिपत्य करणाऱ्या दैत्यांना नष्ट करून केवळ आपल्या पालनकर्त्याचे शासन स्थापित केले पाहिजे. या मार्गात येणाऱ्या सर्वप्रकारच्या संकटांना धैर्याने तोंड दिले पाहिजे आणि केवळ परलोकीय यशावर दृष्टी ठेवली पाहिजे. काय आजच्या जगाला सुख, शांती, समाधान याकरिता धर्माची गरज नाही काय?

## धर्माविना

धर्माविना जीवनाला आरंभापासून काही अर्थ उरत नाही. परलोकावरील दृढ विश्वास ही धर्माची बहुमोल विशेषता आहे. हा विश्वास प्राप्त झाल्यानंतर मानवी जीवन एका नव्या श्रद्धेचे बोट पकडते व त्याच्यासमोर नवनवी क्षितिजे उभी राहतात. परलोकावरील दृढविश्वासाविना मानव नीचतेच्या कष्टदायी अनुभूतीचे लक्ष्य बनतो. मरणोत्तर जीवनाच्या इन्काराचा अर्थ असा होतो की समाजातील एकत्र जीवनाचा, मानवी आयुष्याचा भाग केला जावा व मानवाला आपल्या आंधळ्या व बहिऱ्या वासना, इच्छा, तसेच अंधविश्वास यांच्या दयेवर मोकळे सोडून देण्यात यावे. त्यानंतर माणूस आपल्या इच्छापूर्तीमध्ये स्वत:ला हरवून बसतो. जितके अधिक सुख तो मिळवू शकतो, तितके गोळा करावे आणि त्यात इतर कोणालाही वाटेकरी होऊ देऊ नये, हेच त्याच्या सर्व प्रयत्नांचे व पराकष्टेचे ध्येय व लक्ष्य बनते. येथूनच हेवेदावे, झगडे व रक्तरंजित युद्धांचा आरंभ होतो व इच्छादासांनी भरलेल्या या जगामध्ये आपल्यासमोर पसरलेल्या सुखद गोष्टीवर तुटून पडून प्रत्येकजण ते जास्तीतजास्त हस्तगत करु इच्छितो. अधिकाधिक फायदे कमीतकमी वेळात तो एकटा गोळा करु इच्छितो. त्याच्या मनात कोणत्याही उच्चतम सत्तेचे भय असत नाही, कारण त्यांच्यानुसार या जगाचा कोणी ईश्वर नसतो व कोणतीही न्याय व्यवस्था नसते.

## अध:पतनाची सीमा

पारलौकिक जीवनाच्या इन्कारामुळे माणूस इच्छांच्या खोल गर्तेत बुडून जातो. त्याच्या विचाराची व चिंतनाची भरारी उदात्ततेपासून वंचित होते आणि त्याचे हेतू व कार्यभाग साधून घेण्याचे मार्ग अध:पतनाचे लक्ष्य बनतात. मानवता आपापसातील झगड्यांचा व लढायांचा आखाडा बनते. त्यानंतर माणसाला इतकी उसंतच मिळत नाही की त्याने उच्च व उदात्त जीवन उद्देशांचा पाठपुरावा करावा. या नवीन जगात प्रेम व सहानुभूतीला काही स्थान नसते. भौतिक सुखाची लालसा व इच्छा वासनांचे अधिपत्य यामुळे जीवनातील श्रेष्ठ मूल्यांचा व सद्भावांचा आदर करण्याची माणसाची क्षमता लोप पावून असा आदर करण्यापासून तो अक्षम केला जातो.

## भौतिक जडवादाचा परिणाम

भौतिकवादी माणसांना काही भौतिक फायदेही मिळून जातात यात शंका नाही, पण भौतिकवादात एक असा शाप आहे की वरपांगी दिसणारे हे फायदेही नाश पावतात. माणूस त्यांच्या लालसेने आंधळा बनून आपल्याच बांधवाशी लढत असतो. इच्छाशक्ती, लोभ, मोह, मत्सर, द्वेष, तिरस्कार या कुभावनांवर त्याचा ताबा नसतो आणि तो त्यांच्या बंधनातून कधीही मुक्त होऊ शकत नाही.

ज्या लोकजाती भौतिकतेचा अंगीकार करतात त्यांच्यावर निरंतर एक प्रकारच्या दडपणाचे व गृहकलहाचे वातावरण आच्छादित असते. परिणामस्वरुप समस्त मानवी जीवन अस्तव्यस्त होऊन जाते आणि विज्ञान व त्याची भयानक अस्त्रे मानवी वंशाची सेवा करण्याऐवजी माणसाचा सर्वनाश व संहार करण्यात व्यतीत होऊ लागतात.

## संकुचितपणावर उपाय

भौतिकता माणसाच्या संकुचितपणाचे प्रतीक आहे. यातील बिघाडापासून वाचण्याकरिता मानवतेच्या मानसिक क्षितिजांचा विस्तार करण्याची गरज आहे. हा उद्देश केवळ धर्मानेच प्राप्त होऊ शकतो. केवळ तोच मानवतेला नवा विस्तार व नवी उदात्तता प्रदान करु शकतो, कारण धर्माच्या दृष्टीने मानवी जीवन फक्त इहलोकापुरतेच मर्यादित नसून ह्यानंतरचीही परंपरा निरंतर चालू राहत असते. हा विश्वास माणसाच्या मनात एका नवीन आशेची ज्योत प्रफुलित करतो, त्याला दुष्टपणा, अत्याचार, तसेच दडपण याविरुद्ध धैर्याने झगडण्याचे साहस प्रदान करतो आणि त्याला हे दाखवून देतो की सारी मानवजात एकमेकांचे बंधू आहेत. प्रेम आपापसांतील सहानुभूती व विश्वबंधुत्व या गोष्टीचे शिक्षण मानवतेला सुखशांती व वास्तविक समृद्धी, तसेच विकास व उन्नती यांनी वैभवसंपन्न करुन टाकतो. अशी वस्तुस्थिती व सत्य असतांना धर्म ही माणसाची अंतिम गरज नाही आणि मानव आजही तिचा गरजवंत नाही, जसा शतकानुशतकापूर्वी होता, असे कोण म्हणू शकतो? जीवनक्षेत्रात धर्म ज्याप्रकारे माणसाला घडवून तयार करतो, त्याप्रकारे दुसरी कोणतीही शक्ती माणसाला घडवू शकत नाही.

## दीपस्तंभ

धर्म माणसाला स्वत:साठी जगण्याऐवजी इतरांसाठी जगण्याचे शिकवितो, त्याला एक उदात्त व पवित्र लक्ष्य देतो आणि हे लक्ष्य साध्य करण्याच्या मार्गांत येणाऱ्या कष्टांचे व संकटाचे, खुल्या मनाने स्वागत करण्याचे शिकवितो. धर्माने प्रदान केलेल्या त्या ईमान (श्रद्धा) व विश्वास यापासून जर मानव वंचित झाला, तर तो स्वत:खेरजी दुसऱ्या कोठल्याही गोष्टीचा विचार करु शकत नाही. सर्व जीवन स्वार्थ व स्वभक्ती याची प्रतिमा होऊन जाते. त्यांच्यात व जंगली श्वापदात काही अंतर उरत नाही. इतिहासात अशा असंख्य व्यक्ती होऊन गेल्या, ज्यांनी आयुष्यभर न्याय व

सत्य याच्या रक्षणार्थ ढालीचे कार्य केले आणि त्यामध्ये आपल्या प्रिय प्राणाचीही आहुती व बलिदान केले. त्यांना आपल्या दीर्घ प्रयत्नाचे व त्यागाचे कसलेही फळ या जगात मिळाले नाही. प्रश्न असा आहे की कोणत्या दृष्टीने या लोकांना असा लढा देण्यास उद्युक्त केले? ज्याचा परिणाम असा निघाला की त्यामध्ये त्यांना कसलेही भौतिक यश प्राप्त झालेच नाही, परंतु जे काही त्यांच्यापाशी होते तेही या लढ्यानंतर त्यांच्या हातून निसटले. याचे उत्तर केवल एकच आहे आणि ते म्हणजे श्रद्धा या पवित्र मानवी जीवांचे अस्तित्व याच श्रद्धेचा एक छोटा चमत्कार आहे. याउलट लोभ, मोह, कपट, द्वेष, स्वार्थ तसेच तिरस्कार हे असे नीचतेचे प्रेरक आहेत की ज्यांच्याद्वारा कसलेही वास्तविक व सुदृढ यश प्राप्त होऊ शकत नाही. त्याचा झगमगाट बाह्यत्कारी व क्षणभर होत असतो. त्यांच्या प्रभावाखाली असलेली माणसे तत्काळ लाभाची इच्छा करतात. त्यामुळे माणसात कधीही स्वास्थ्यपूर्ण चारित्र्य वाढीस लागू शकत नाही. तसेच त्यामध्ये एखाद्या उच्च ध्येयासाठी, जगाचा त्याग करुन सोशिकपणाने, सहनशीलतेने व भक्कमपणे सतत प्रयत्न करीत राहण्याची भावना टिकून ती वाढीस लागू शकत नाही.

## तिरस्काराचे भक्त

आम्हाला हे माहीत आहे की काही तथाकथित सुधारक प्रेमाऐवजी द्वेष व तिरस्कारद्वारा जगाची सुधारणा करु इच्छितात. द्वेषातच ते सतत गुरफटलेले असतात. त्यापासूनच ते पोषण व शक्ती प्राप्त करतात व त्याच्याच सहाय्याने, दु:खांनी आणि कष्टांनी वेढलेले असतानासुद्धा भक्कमपणे व साहस करुन आपले सुधारणाअभियान चालू ठेवतात. या लोकांच्या तिरस्काराचे लक्ष्य मानवी वंशाचा एखादा विशेष समूहही होऊ शकतो आणि हेही संभव आहे की सामूहिकरुपाने अखिल मानवजात अथवा तो ऐतिहासिक काल त्याचे लक्ष्य होतो, ज्यामध्ये तिरस्काराच्या भक्तास जाग येते. मानवतेपासून दूर असलेले हे वैफल्यग्रस्त 'सुधारक' व त्यांचा समूह, आपले उद्देश प्राप्त करणे निश्चतच संभवनीय आहे. तिरस्काराची आग त्यांच्या दुष्ट स्वभावाशी व उपजत अत्त्याचाराची सवय असल्याने हे लोक आपल्या उद्देशपूर्तीकरिता पूर्ण एकोपाही दाखवू शकतात व सर्व प्रकारच्या उणिवाही व वंचितपणा पसंत करु शकतात. परंतु जी श्रद्धा प्रेमाऐवजी तिरस्कारावर आधारलेली असेल त्यापासून, मानवतेला कसलेही कल्याण व यश प्राप्त होऊ शकत नाही. त्यापासून वर्तमान अन्यायाची, तसेच समाजातील प्रचलित वाईट गोष्टीचे परिमार्जन करुन झालेले नुकसान व त्याची भरपाई निसंदेह पुरी केली जाऊ शकते. पण त्याचा हात मानवतेच्या या आजाराच्या रामबाण उपायापासून बिलकूल रिकामा असतो. याच कारणस्तव समाजाचे वर्तमान दोष नष्ट करण्याच्या नावावर केले जाणारे हे सुधारणेचे इलाज व उपाय, त्या दोषांना कमी करुन त्यांना नष्ट करण्याऐवजी, त्यामध्ये अनेक पटीने वृद्धी करतात आणि अशी अवस्था निर्माण होऊन जाते की -

'जो जो उपाय केला गेला तो तो आजार वाढतच गेला.'

## परलोकवरील श्रद्धेचा एक महत्त्वाचा पैलू

जो विश्वास व श्रद्धा द्वेषापासून व वैरभावापासून निपजलेले नसते आणि त्यापासून प्रेरणा घेतलेली नसते, त्यापासून भौतिक लाभ तत्काळ मिळत नाही. जी श्रद्धा माणसात प्रेम, बंधुभाव, त्याग एवढेच नाही तर आपल्या बांधवाखातर प्राणार्पण करण्याची भावना निर्माण करते; खरे पाहता हीच श्रद्धा मानवतेला वास्तविक व सुदृढ देणग्यांनी व सुखांनी अलंकृत करु शकते आणि भविष्यातील समृद्धी व उन्नतीचे आधार बनू शकते. या विश्वासाचा गाभा ईश्वरावर श्रद्धा व त्याच्याशी मन:पूर्वक प्रेम होय. हा विश्वास व्यक्तिगत जीवनास पावित्र्य देऊन आपल्या निर्माणकर्त्याशी सानिध्य मिळवून देतो; पण पारलौकिक जीवनावरील श्रद्धेखेरीज ईश्वरावरील विश्वास वा त्याच्यावरील प्रेमाला काही अर्थ उरत नाही. परलोकची कल्पना माणसाला एक प्रकारच्या रक्षणाची भावना देत असते. यानंतर मानवाला अशी खात्रीपूर्वक शाश्वती प्राप्त होते जी आपल्या पार्थिव अंतानंतर नष्ट होत नाही. आपल्या जीवनात केलेले प्रयास व कष्ट निष्फळ होत नाहीत. उलट त्याला त्यांचा मोबदला या नश्वर जगात जरी मिळाला नाही तरी तो मोबदला पुढे येणाऱ्या परलोकीय जीवनामध्ये कसल्याही परिस्थितीत मिळाल्याशिवाय राहणार नाही.

अशी ही फळे आहेत जी केवळ अल्लाह आणि पारलौकिक जीवनावर विश्वासरूपी वृक्षापासून निर्माण होतात; पण इस्लाम केवळ येथेच थांबत नाही याखेरीज आणखी बरेचसे आम्हाला देतो. त्याची कहाणी इतर कहाण्यांपेक्षा भिन्न व अधिक रुचिर आहे.

## इस्लामविषयी एक गैरसमज

जे लोक इस्लामला गतकाळाची गोष्ट समजतात व वर्तमानकाळातील त्याची उपयुक्तता, तसेच आवश्यकता यांचा इन्कार करतात ते वास्तवात इस्लामचे खरे स्वरुप जाणत नाहीत व जीवनातील त्याच्या खऱ्या संदेशासी व ध्येयाशी अनभिज्ञ आहेत. लहानपणी साम्राज्यवाद्यांच्या एजंटांनी नेमलेल्या पाठ्यपुस्तकातून त्यांना जे काही शिकविले गेले तोच शिकविलेला धडा ते आजही गिरवीत आहेत. त्यांच्यामते इस्लामच्या उदयाचा हेतू मानवाला मूर्तीपूजेपासून मुक्त करण्याचा होता. तसेच परस्पराशी वैरभाव बाळगणाऱ्या अरबी टोळ्यांची एकजूट करुन त्यांच्यात बंधुत्व निर्माण करण्याचा होता. तसेच दारु पिणे, जुगार खेळणे, मुलींना जिवंत पुरणे व याप्रकारच्या अनेक नैतिक दोषांपासून मुक्त करण्याचा होता. म्हणून इस्लामने अरबांमधील आपापसातील झगडे व लढाया समाप्त करुन त्यांची शक्ती नष्ट होण्यापासून वाचवली व नंतर जगामध्ये आपल्या संदेशाचा प्रचार करण्याकरिता या शक्तीचा उपयोग केला. या ध्येयासाठी मुस्लिमांना इतर जातीशी अनेक युद्धे करावी लागली. परिणामस्वरुप इस्लामी जग आपल्या वर्तमान मर्यादांसह या विश्वपटला वर उभे राहिले. हा एक असा ऐतिहासिक संदेश व ध्येय आहे ज्याचे कार्य आता पूर्ण झाले आहे. जगात मूर्तिपूजा संपली आहे. अरब टोळ्यांनी आता मोठमोठ्या राष्ट्रांचे रुप धारण केले आहे, म्हणून आता इस्लामची काही गरज उरली नाही. कारण जेथपर्यंत जुगार खेळण्याचा व

मदिरा प्राशन करण्याचा संबंध आहे, त्यावर आजच्या संस्कृतीच्या व संस्काराच्या युगात कोणताही पायबंद घालणे शक्य नाही. याचा अर्थ असा की या लोकांमध्ये इस्लाम एका विशेष काळापुरता अतिउचित जीवनव्यवस्था देणारा धर्म होता. पण आज जग इतके पुढे गेले आहे की आज इस्लामच्या मार्गदर्शनाची काही गरज उरली नाही. म्हणून मार्गदर्शन व प्रकाशाकरिता आम्ही त्याच्याकडे पाहू नये. उलट सिद्धान्त व जीवनदर्शनापासून हा प्रकाश व उपदेश घ्यावयास पाहिजे. यातच आमची मुक्ती होऊ शकते व यातच आमचे कल्याण सामावलेले आहे.

पाश्चिमात्यांचे हे पौर्वात्य चेले आपल्या गुरुंच्या वाक्यांचा पुनरुच्चार करुन अनिच्छेने व अज्ञानाने आपल्या संकुचितपणाची जाणीव करुन देतात. हे बिचारे इस्लामला ज़ाणतही नाहीत, तसेच जीवनातील त्याचे वास्तविक उद्देशही त्यांना ठाऊक नाहीत. म्हणून पुढे जाण्यापूर्वी 'इस्लाम', त्याचा अर्थ व उद्देश यावर थोडीशी चर्चा आवश्यक आहे.

## इस्लामचा क्रांतिकारी अर्थ

मानवतेच्या विकासामध्ये अडसर बनणाऱ्या व त्याला सन्मार्गांपासून रोखणाऱ्या, हरप्रकारच्या गुलामगिरीतून मुक्त करुन स्वातंत्र्य देण्याचे नाव इस्लाम आहे, असे एका वाक्यात आम्ही म्हणून शकतो. माणसांचे प्राण, संपत्ती, अब्रू, स्वाभिमान तसेच आत्मविश्वास या सर्वांची लूट करणाऱ्या हुकूमशहापासून तसेच अन्याय व अत्याचार करणाऱ्यापासून मुक्तीचा हा संदेश आहे. इस्लाम मानवाला शिकवितो की सत्तेचा खराखुरा स्वामी अल्लाह आणि अल्लाहच आहे. तोच मानवाचा खराखुरा शासक आहे, सारी प्रजा त्यानेच निर्माण केलेली आहे. तोच माणसाच्या दैवाचा धनी आहे, त्याच्या मर्जीशिवाय कोणीही कोणाला फायदा देऊ शकत नाही, तसेच कोणीही त्रास व दु:खे दूर करु शकत नाही. निवाड्याच्या दिवशी सर्व मानव त्याच्या समोरच गोळा केले जातील आणि तो त्यामधील प्रत्येकाच्या जीवनकार्यांचा हिशेब व आढावा घेईल. इस्लामचे हे शिक्षण माणसाला भय, अन्याय, अत्याचार व इतरांच्या संपत्तीचा अपहार व शोषण वगैरे गोष्टींपासून मुक्ती प्रदान करते.

## इच्छा-आकांक्षापासून मुक्ती

एवढेच नव्हे तर एक पाऊल पुढे जाऊन इस्लाम माणसाला इच्छा, आकांक्षा यांच्या दास्यत्वातून मुक्त करतो. येथपर्यंत की जगण्याच्या इच्छेपासूनही त्यांचे संबध तोडून टाकतो. ''जीवनासक्ती'' हाच मानवी कमकुवतपणा आहे व हुकूमशहा याच गोष्टीचा लाभ घेऊन इतर माणसांना आपले दास बनवित आले आहेत. जर माणसात हा कमकुवतपणा नसता तर तो कधीही व कोणतेही दास्यत्व पत्करण्यास तयार झाला नसता व या क्रूर दैत्यांना असे सैतानी नाच करु दिले नसते. अत्याचार व क्रौर्य यांच्या समोर गुडघे टेकून शरण जाण्याऐवजी वीरश्रीपूर्वक मुकाबला करण्याचे शिक्षण देऊन इस्लामने मानवतेवर महान उपकार केला आहे. कुरआनमध्ये आले आहे,

"हे नबी ! त्यांना सांगा की जर तुमचे बाप व तुमचे मुलगे आणि तुमचे भाऊ व तुमच्या पत्नी व तुमचे सगेसोयरे व तुम्ही शिल्लक ठेवलेली संपत्ती व जो कारभार मंदावेल असे भय तुम्हाला वाटते तो सर्व व्यवहार व तुम्हास प्रिय असलेले तुमचे घर, जर तुम्हाला अल्लाह व त्याचा प्रेषित व त्याच्या मार्गाने प्रयत्नांची पराकाष्ठा करण्यापेक्षा अधिक प्रिय आहे, तर तोवर प्रतीक्षा करा जेव्हा अल्लाह आपला निर्णय तुमच्यासमोर आणील व अल्लाह अवज्ञा करणारांचे मार्गदर्शन करीत नाही."

(कुरआन ९:२४)

## जीवनाची मूळशक्ती

इस्लाम माणसाला अल्लाहचे प्रेम शिकवितो. ज्याला सहानुभूती, चांगलुपणा, सत्य तसेच अल्लाहच्या मार्गात म्हणजेच जीवनातील सर्व उच्च, पवित्र उद्देशाकरिता जिहाद असे नाव दिले जाऊ शकते; ते तसेच वासनांशी व इच्छाआकांक्षांशी झगडण्यास प्रवृत्त करते व त्यांना आपल्या काबूत राखण्याचे शिक्षण देते. आधळ्या, बहिऱ्या इच्छा वासनारुपी माजलेल्या अश्वांना तो अल्लाहवरील प्रेमाद्वारे ताब्यात ठेवण्यास शिकवितो, तसेच जीवनात तो फक्त अल्लाहच्या प्रेमाला सर्वश्रेष्ठ मूल्य व मूळ कार्यशील शक्तीच्या स्वरुपात पाहू इच्छितो. जो या धनापासून वंचित आहे तो मुस्लिम होऊच शकत नाही.

## इहलोकभक्तांचा गैरसमज

लोभ, लालसा व इच्छा वासनांचा एखादा दास आपल्या चुकीच्या अनुमानाच्या कारणास्तव असा विचार करु लागतो की इतरांच्या तुलनेत त्याचे जीवन अधिक सफल व सुखपूर्ण आहे; असे होणे संभवनीय आहे. परंतु त्याच्या उणिवांची शिक्षा त्याला फारच लवकर भोगावी लागते. जेव्हा तो आपल्या या स्वप्नवत अवस्थेतून बाहेर येतो तेव्हा त्याला आढळते की आपण इच्छा वासनांचे विवश गुलाम बनलो आहोत. त्याच्या भाग्यात वंचना, दुर्भाग्य तसेच हालअपेष्टा व विवशताखेरीज आणखी काही असत नाही. कारण एकदा माणूस आपल्या इच्छा लालसांना शरण गेला तर तो कधीही त्यांना आपल्या काबूत आणू शकत नाही, उलट त्याचा उदंडपणा जसजसा वाढत जातो तसतशी त्याची तृष्णाही वाढत जाते. अशाप्रकारे माणसाचे पशुपेक्षाही खालच्या स्थरावर पतन होते आणि आस्वाद घेण्यात तो अशाप्रकारे निमग्न होत जातो की त्यांना इतर कुठल्याही वस्तुचे भान राहत नाही. यावरुन हे स्पष्ट होते की जीवन व त्यातील अनेक समस्यांच्या बाबतीत अशातऱ्हेचे मार्गक्रमण मानवतेला कसल्याही भौतिक वा आध्यात्मिक प्रगतीपर्यंत नेऊन पोचवू शकत नाही. प्रगती मग ती भौतिक असो वा आध्यात्मिक असो त्याकरिता माणसाला आपल्या इच्छा लालसेच्या गुलामगिरीतून मुक्त होणे ही पहिली अट आहे. यानंतरच विज्ञान, कला व धर्माच्या क्षेत्रात प्रगती होणे संभवनीय आहे.

## जगाच्या बाबतीत इस्लामचा दृष्टिकोन

इस्लामने जरी इच्छा लालसेच्या दास्यत्वातून मुक्तीवर याचकरिता बराच भर दिला आहे, तरी त्या उद्देशाकरिता तो आपल्या अनुयायांना संन्यास घेण्याची परवानगी देत नाही. तसेच चांगल्या व पवित्र वस्तुंचा उपयोग करुन त्यांचा लाभ घेण्यासही रोखीत नाही. या दोन टोकांच्या गोष्टी सोडून तो मधल्या समतोल मार्गाचा अंगीकार करतो. त्याच्या दृष्टीने जे काही आढळते ते सर्व मानवाकरिता निर्माण केले गेले आहे. इस्लाम माणसाला दाखवितो की "जग तुझ्यासाठी आहे, तू जगासाठी नाही." म्हणून आस्वादप्रियता व इच्छा लालसांच्या दास्यत्वाला तो मानवाच्या स्थानापासून खालच्या दर्जाचे मानतो. जगातील ही सामुग्री माणसाला फक्त याचकरिता उपलब्ध केली गेली आहे. ज्याद्वारा तो आपल्या श्रेष्ठ रचना, उद्देशांना प्राप्त करु शकेल. माणसाचा जीवनउद्देश अल्लाहच्या धर्मांचा प्रचार होय व मानवतेची परिपूर्ती करण्याचा तोच एकमात्र मार्ग आहे.

## इस्लामचे दोन स्पष्ट उद्देश

जीवनात इस्लामसमोर दोन महत्त्वाचे व ठळक उद्देश आहेत. व्यक्तिगत जीवनक्षेत्रात तो प्रत्येक व्यक्तीला इतकी जीवनसामुग्री व साधनसंपत्ती गोळा करू देऊ इच्छितो की ज्यामुळे तो एक निर्मळ व पवित्र जीवन जगू शकेल. सामूहिक जीवनक्षेत्रात त्याचा असा प्रयत्न असतो की असा एक समाज आस्तित्वात यावा, ज्याची संपूर्ण शक्ती मानवाच्या सामूहिक प्रगतीमध्ये खर्च व्हावी. सभ्यता संस्कृतीचा हा कारखाना इस्लामी दृष्टिकोनातून पुढे पुढे जावा, तसेच तो अंश व एकूण व्यक्ती व समाज यामध्ये 'समतोल' बनून राहावा ज्यामध्ये कोणाच्याही अधिकारावर आघात होऊ नये.

## मानवी विचारांचे स्वातंत्र्य

माणसाला विचारस्वातंत्र्य प्रदान करण्यात इस्लामला एक महत्त्वपूर्ण व प्रभावशाली शक्तीचा दर्जा प्राप्त आहे. इस्लाम अंधविश्वासाच्या, बिनबुडाच्या व बेबंद विचारांचा सदैव विरोध करीत आला आहे. इतिहासात मानवतेला आचारविचारांना मार्गभ्रष्ट करणाऱ्या व त्यात वक्रगती निर्माण करणाऱ्या गोष्टीशी सामना करावा लागत आला आहे. त्यापैकी काही मानवाच्या सुपीक डोक्यातील उपज होती व त्या काळातील लोक त्यांचा हा दर्जा चांगल्यारितीने जाणून होते. परंतु मार्गभ्रष्ट करणाऱ्या काही अशाही शृंखला अस्तित्वात होत्या की ज्यांचे दुवे माणूस आपल्या कपोलकल्पित देवतांच्या मूर्खपणाच्या दुव्यांशी जोडत होते. तात्पर्य असे की इस्लामच्या उदयापूर्वी मानवी विचार असेच अंधकारात चाचपडत होते. इस्लामने येऊन त्याला तर्कसिद्धता व दृढता दिली. इस्लाम उदयापूर्वी प्रचलित असलेल्या कपोलकल्पित अवतारांची मालीका, इस्त्रायली दंतकथा, ख्रिस्ती धर्माचे अर्धेकच्चे व चुकीचे विचार पृथ्वीवर आढळून येत, अशा सर्व प्रकारच्या अंधश्रद्धापासून मानवाला इस्लामने मुक्त केले. त्याला पुन्हा एकदा आपल्या खऱ्या धर्माकडे नेवून आपल्या खऱ्या स्वामीच्या दरबारात नेवून उभे केले.

## इस्लाम व वैज्ञानिक शोध

इस्लामचे आणखी एक वैशिष्ठ असे की त्याची भाषा व त्याचे शिक्षण अतिशय सरळ, साधे व सोपे आहे. त्यामध्ये काही खाचाखोचा नाहीत, तसेच त्या भाषेला समजणे, त्यातून विचार करणे व त्यावर श्रध्दा ठेवणेही कठीण नाही. इस्लामची अशी इच्छा आहे की निसर्गाने मानवाला दिलेल्या नैसर्गिक क्षमतांचा भरपूर उपयोग करून आपल्या सभोवती पसरलेल्या ब्रह्मांडातील अगणित जिवांचे तसेच प्रकृतीचे दडलेले रहस्य जाणून घ्यावे. कारण इस्लाम बुध्दी व धर्म किंवा दुसऱ्या शब्दात सांगावयाचे विज्ञान व धर्म यांच्या दरम्यान वैमनस्य अथवा मोठा विरोध मानत नाहीत. ख्रिश्चन धर्माप्रमाणे इस्लाम न समजणाऱ्या कठीण श्रद्धावर व सिद्धान्तावर विश्वास ठेवण्याचे हुकूम लादत नाही, अथवा त्यांच्यावरील विश्वासाला ईश्वरावरील विश्वासाची एक अनिवार्य अट मानत नाही. त्याचप्रमाणे तो माणसाला अशा संदिग्ध स्थितीत घालीत नाही जेथे वैज्ञानिक सत्यांना ईश्वराचे अस्तित्वाचा इन्कार केल्याशिवाय मानूच शकत नाही. एवढेच नव्हे तर इस्लाम मानवाला स्पष्टपणे हे दाखवून देतो की या जगतात जी सामुग्री प्राप्त आहे आणि ज्याप्रकारे येथील अगणित उघड व दडलेल्या शक्ती रात्रंदिवस त्याची सेवा करीत आहेत, हे सर्व त्याच्या अतिदयाशील व कृपशील पालनकर्त्यांच्या दयेची व कृपेची देणगी आहे. त्याचप्रमाणे आपल्या वैज्ञानिक शोधानंतर ज्या नवनवीन ज्ञानरुपी खजिन्यांचा शोध करीत असत, तेही वास्तवात त्याच्या परमकृपाळू स्वामीच्या अपार कृपेचेच एक प्रदर्शन होय. म्हणून त्याचा कृतज्ञदास बनून राहणे हे त्याचे कर्तव्य ठरते व त्याने जास्तीतजास्त निष्ठेने, कटाक्षाने व एकाग्रतेने त्याची भक्ती करावी. इस्लाम वैज्ञानिक ज्ञानाला श्रद्धेच्या अथवा अश्रद्धेच्या प्रतिकूल मानत नाही. या उलट तो ईश्वरावरील श्रद्धेचा अनिवार्य भाग मानतो.

## इस्लामची गरज

या समस्या अशा आहेत की ज्यांना सोडविण्याकरिता मानव आजसुद्धा बेचैन आहे. मानसाला उच्च व वास्तविक उद्देशाची प्राप्ती आजपर्यंत असंभवनीय झाली आहे. माणूस आजसुद्धा नानाप्रकारच्या फसगतीचे व मूर्खपणाचे लक्ष्य आहे. हुकूमशहा व जुलमी शासकांना आज रान मोकळे आहे आणि मानवता आजसुद्धा त्यांच्या जुलूम, अत्याचार व दबाव-दडपणाखाली अडकलेली आहे. प्रत्येक ठिकाणी मानवतेवर पाशवी शक्तींचा प्रभाव आहे. अशा वस्तुंचा सर्रास आढळ याच गोष्टीचा पुरावा देत नाही काय की जगाला इस्लामची गरज आहे. इस्लामला माणसाच्या मार्गदर्शनाकरिता अजून प्रकाश देण्याचे कार्य करणे आहे.

## मूर्तिपूजेची निर्भर्त्सना

आज जगातील अर्धी लोकसंख्या गतकाळाप्रमाणेच मूर्तिपूजेच्या विरोधात व निषेधात मग्न आहे. भारत, स्पेन व जगातील इतर अनेक देशांचे उदाहरण या संदर्भात दिले जाऊ शकते.

उरलेल्या जगतापैकी एक मोठा भाग, एका खोट्या उपास्याच्या जाळ्यात अडकलेला आहे. या नवीन खोट्या उपास्याने मानवी विचारांच्या व भावनांच्या जगात पूर्वीच्या मूर्तिपूजेपेक्षा काही कमी बिघाड निर्माण केलेला नाही. आजच्या मानवाला सरळ मार्गापासून दूर लोटण्यामागे त्याचा मोठा वाटा आहे. या नवीन खोट्या उपास्याचे पारिभाषिक नाव "विज्ञान" आहे.

## पाश्चिमात्यांची संकुचित दृष्टी

सृष्टीबद्दल ज्ञान प्राप्त करण्याचे माध्यम या दृष्टीने विज्ञानाला महत्त्व फार मोठे आहे आणि या दृष्टीनेच आतापर्यंतच्या कार्यक्षेत्राची यादीसुद्धा फार प्रभाव पाडते. पण त्याचे हे सारे यश त्याक्षणी निराशेमध्ये रुपांतरित होऊन गेले. ज्याक्षणी पाश्चिमात्यांनी विज्ञानाला ईश्वर मानले आणि त्याला आपल्या प्रेमाचा, निष्ठेचा, श्रद्धेचा एकमात्र केंद्र मानले. त्याच्या या खेदजनक चुकीचा परिणाम असा झाला की त्यांनी व्यवहारातील विज्ञानाच्या अनुभवांच्या मर्यादित साधनाखेरीज ज्ञान मिळविण्याच्या इतर साधनांपासून अलिप्त करुन घेऊन स्वत:ला वंचित करुन घेतले. मानवता आपल्या इष्ट ध्येयाप्रत जाण्याऐवजी त्याच्यापासून दूर गेली. माणसामध्ये विकासाची व प्रयत्नांची जी अपार शक्ती आहे ती पाश्चिमात्यांच्या संकुचित दृष्टिकोनाला व भौतिक विज्ञानाच्या अनिवार्य मर्यादांना बळी पडली, कारण बुद्धिरुपी पंखांनी उड्डान करणारे हे विज्ञान मानवतेच्या उंच उड्डानाबरोबर भरारी मारु शकत नाही. ती बुद्धी व आत्मा या दोहोंपासून सहाय्य घेते आणि तेव्हा कोठे आपल्या निर्माणकर्त्याशी सान्निध्य प्राप्त करते आणि तेव्हा कोठे सत्याचे स्पष्ट व शुद्ध विचार समजण्यायोग्य होत असते.

## विज्ञानाचे वाढते महत्त्व

विज्ञानच सर्वस्व आहे असा दावा करणारांचा एक समज असा आहे, की विज्ञानच ब्रह्मांडातील व जीवनातील दडलेली रहस्ये उकलून दाखवू शकते, म्हणून विज्ञान ज्याला अनुमोदन देते ते सत्य व शेष सगळे निरर्थक आहे. भावनेच्या ओघात वाहणारे हे लोक ही गोष्ट विसरतात की आपल्या सर्व आश्चर्यजनक कार्यानंतरही विज्ञान आपल्या प्रारंभिक काळातच आहे. अजूनही अनेक रहस्ये व समस्या अशा आहेत की ज्यांच्या बाबतीत विज्ञानाची माहिती अपूर्ण व अविश्वसनीय आहे. याचे कारण त्याचे प्रभावक्षेत्र मर्यादित आहे. त्याचे निरीक्षण बाह्यांगी आहे व त्यात वास्तवतेच्या तळापर्यंत पोहोचण्याची क्षमता नाही. परंतु हे सर्व पाहूनसुद्धा हे लोक असा दावा करतात की आत्मा नावाची एखादी गोष्टच मुळात आस्तित्वात नाही. त्यांच्या दृष्टीने ज्ञानेंद्रियांची मर्यादा ओलांडून कोणी माणूस परोक्षात दडलेल्या जगाशी आपले संबंध जोडू शकत नाही. असे नाते स्वप्नसृष्टीतील असो किंवा 'टेलिपथीचे' माध्यम म्हणून असो, वर्तमानकाळातील आत्म्याचा इन्कार करण्याची कल्पना कसल्याही प्रत्यक्ष अनुभवावर आधारभूत नाही. त्याचे खरे कारण असे की आजच्या व्यवहारातील विज्ञान व त्याच्या मर्यादित अस्त्रांची पोच वास्तवतेपर्यंत नाही. म्हणून ते सर्व नैसर्गिक व प्राकृतिक रहस्यांचे अनावरण करण्यात मोठ्या भयानक रितीने अपयशी ठरले

आहे. कदाचित निसर्गाच्या दृष्टीने ही श्रेष्ठ सत्ये मानवी बुद्धीच्या कक्षेत व त्याच्या प्रत्यक्ष पकडीच्या बाहेर ठेवण्यासाठी चातुर्याची व कल्याणाची निकड होती. परंतु अज्ञानी लोकांना हीच गोष्ट मार्गभ्रष्ट होण्याचे व इन्कार करण्याचे कारण ठरले आणि त्यांनी स्वत:ची अशी समजूत करुन घेतली की जगात आत्म्याचे आस्तित्व मुळातच नाही.

## वर्तमान युगाचे ज्ञानपूर्ण अज्ञान

तात्पर्य असे की वर्तमान युगात माणूस ज्ञानपूर्ण अज्ञानात पडलेला आहे. यावरुन याचा अंदाज करता येईल की आज इस्लामची किती मोठी गरज आहे. कारण याच तऱ्हेने माणूस नव्या जुन्या निरर्थक वादाच्या दलदलीतून बाहेर पडू शकतो. मानवाचा मूर्खपणा आम्हाला आरंभी मूर्तिपूजेच्या रुपाने प्रकट झाला आणि आज तोच विज्ञानाच्या पूजेच्या रुपाने अस्तित्वात आहे. मानवी बुद्धीला व आत्म्याला त्याकाळापर्यंत वास्तविक स्वातंत्र्य मिळू शकत नाही, जोवर तो त्या जुन्यापुराण्या निरर्थक गोष्टींपासून मुक्त होत नाही आणि त्याचा एकच मार्ग आहे आणि तो आहे इस्लाम. हेच ते ठिकाण आहे, जेथे इस्लाम मानवतेची एकमात्र आशा बनून समोर येतो. इस्लामच धर्म व विज्ञान यामधील तथाकथित विरोधाचे रुपांतर समझोत्यामध्ये करु शकतो. याखेरीज या संकटात पडलेल्या जगाला शांती व सुरक्षितता यांनी अलंकृत करु शकतो. जी शांती व सुरक्षितता पाश्चिमात्यांच्या मूर्खपणामुळे मानवतेने गमावलेली आहे.

## युरोप व प्राचीन ग्रीस

प्राचीन ग्रीस, वर्तमान युरोपियन संस्कृतीला जबाबदार आहे. हा सांस्कृतिक वारसा रोमन साम्राज्याच्या माध्यमाने युरोपापर्यंत पोहोचला. प्राचीन ग्रीस संस्कृतीत, माणूस व त्याच्या देवदेवतांमधील आपापसांतील संबंधाचे चित्र भयानक आहे. ते एकमेकांविरुद्ध असून एकमेकांचे शत्रू आहेत. त्यांच्यात कायमस्वरुपाचा संघर्ष व झगडा असल्याचे दृश्य दिसते. म्हणून माणसाला निसर्गाच्या दबलेल्या रहस्यांचा शोध लावण्यामध्ये जे यश प्राप्त झाले ते त्याच्या जवळील देवदेवतांच्या विवशतेचा पुरावा देते व मानवाने जबरदस्तीने झटापट करुन ते मिळवलेले आहे. जर कदाचित या द्रोही व विवश देवदेवतांच्या हातात काही असते तर त्यांनी माणसाला आपल्या संशोधनकार्यातील कुठल्याही भागात सफल होऊ दिले नसते आणि मानव त्या सर्व सुखसोयी व सुविधा ज्याने निसर्गाच्या भांडारातून प्राप्त केल्या आहेत त्यापासून तो वंचित राहिला असता. या ग्रीसच्या दृष्टिकोनातून विज्ञानाचे प्रत्येक नवे यश हेच जणू आपल्या कलहप्रिय देवदेवतांविरुद्ध मानवाने मिळविलेली विजयाची व यशाची घोषणा असून त्याच्या सर्वश्रेष्ठतेचा पुरावा आहे.

## युरोपचा सांस्कृतिक आत्मा

हाच ग्रीसचा संस्कृतीरुपी अमंगल आत्मा, वर्तमान युरोपच्या अचेतन देहात आज आढळतो. तो कधी वास्तवाचा अर्थ सांगताना प्रकट होतो तर कधी ईश्वराच्या बाबतीत

युरोपियनांच्या वागण्यामध्ये प्रकट होतो. याचे कारण असे आहे की आजचा युरोपियन वैज्ञानिक विज्ञानाच्या यशाला अशा तऱ्हेने पुढे ठेवतो की जणूकाही ते यश मानवाने एखाद्या महान शक्तीशी युद्धात जिंकूनच घेतले आहे व परिणामस्वरुप जणू निसर्गाच्या शक्तीला त्याने आपल्या अधीन करुन टाकले आहे. न पाहिलेल्या ईश्वरासमोर माणूस जेव्हा विनम्र होऊन शरण गेल्याचे दाखवितो, त्याचे मुख्य कारण माणसाची स्वत:ची असहाय्यतेची "विवशतेची भावना" आहे. पण विज्ञानाला निसर्गावर जे विशाल यश मिळत आहे त्याच्या परिणामस्वरुप मानवी भावना हळू हळू नष्ट होतील व शेवटी असा दिवस उगवेल जेव्हा माणूस स्वत:च स्वत:चा ईश्वर होईल. अर्थात याकरिता माणसाला जीवन व मृत्यू यातील बाबींचे व रहस्यांचे ज्ञान प्राप्त होणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे प्रयोगशाळेत जिवाची निर्मिती करण्यात मानव समर्थ बनणे आवश्यक आहे. म्हणूनच की काय वर्तमान वैज्ञानिक प्रयोगशाळेत जिवांची निर्मिती करण्याच्या कार्यास अग्रक्रमांकाने महत्त्व देतात कारण, त्यांच्यामते या कार्यात यश मिळाल्याच्या पश्चात त्यांच्यामध्ये आणि त्या न पाहिलेल्या ईश्वरामध्ये काही फरक उरणार नाही व तो स्वत:खेरीज इतर कुठल्याही शक्तीला शरण जाण्याच्या गरजेपासून परावृत्त होईल.

## आशेचा शेवटचा किरण

वर्तमान पाश्चिमात्य जग आज ज्या आध्यात्मिक रोगांचे लक्ष्य बनले आहे, हे सर्वांत जास्त भयानक आहे. त्याने मानवी जीवनाला एका महाभयंकर शिक्षेचे स्वरुप दिले आहे. माणसामाणसांत बेबनाव व फूट घालून नरकाची अवस्था निर्माण केली आहे, माणसे आपापसांत एकमेकांशी संघर्षरत आहेत. जीवनात शांती, स्थैर्य, तसेच समाधान उरलेले नाही. तसेच सौंदर्य व रुचीही उरलेली नाही. अशा परिस्थितीमध्ये आशेचा किरण उरला आहे इस्लाम! नास्तिक पाश्चिमात्यांनी आणलेल्या सर्वनाशापासून वाचण्यासाठी ईश्वरी हुकूमाचे व कायद्याचे पालन केल्याखेरीज आता इतर कुठलाही मार्ग उरलेला नाही. तो मानवाला जीवनाचा एक स्वास्थपूर्ण दृष्टिकोन देतो आणि त्याला असे दर्शवितो की जगात ज्ञान साधनेद्धारा जे भौतिक व आध्यात्मिक यश मिळत असते ते खऱ्या अर्थाने त्यांच्या कृपाळू पालनकर्त्याचीच कृपा आहे व त्या कृपेचेच ते फळ होय. या यशांना जर तुम्ही तुमच्यासारख्याच इतर मानवांची सेवा करण्याचे साधन वा माध्यम बनविले तर तो तुमच्याशी संतुष्ट होईल व तुम्हाला इनाम देईल. तुमचा पालनकर्ता तुमच्या ज्ञान प्राप्त करण्याच्या वेडाने केलेल्या निसर्गशोधाने रागावत नाही, कारण त्यांनी निर्मिलेल्या सृष्टीमध्ये कोणी स्वत:च्या ज्ञानबलावर त्याच्या ईश्वरी दर्जाला धोका निर्माण करु शकेल असे बिलकूल भय नाही. त्याचा कोप फक्त अशाच वेळी भडकतो व अशाच लोकांवर होतो जे आपले संपादित ज्ञान, मोठेपण व वैज्ञानिक शोध आपल्यासारख्याच इतर मानवांच्या कल्याणाची कामे करण्याऐवजी त्याच्या सर्वनाशाकरिता उपयोग करतात.

## नव्या युगातील नवीन ईश्वर

चारित्र्य व आचरणाच्या दृष्टीने जग आज ज्या ठिकाणी आहे तसेच ते चौदा शतकांपूर्वी याच ठिकाणी व याच स्थितीत होते. त्या वेळी इस्लामनेच त्याला खोट्या देवदेवतांपासून मुक्त केले होते. आजच्या खोट्या ईश्वरापासून इस्लामच मानवतेची सुटका करु शकतो. या ईश्वरांनी, हुकूमशाही, बादशाही, साम्राज्यशाही व भांडवलशाहीचे बुरखे घेतलेले आहेत. एकीकडे पाषाणहृदयी भांडवलदार गरीब मजुरांचे रक्त शोषण करुन आपल्या तिजोऱ्या भरीत आहेत, तर दुसरीकडे श्रमिकवर्गाच्या हुकूमशाहीच्या नावावर काही लोक आपल्या ईश्वरत्वाचा देखावा थाटून बसले आहेत. हे लोक स्वातंत्र्याच्या नावाखाली लोकांचे स्वातंत्र्य चिरडून टाकीत आहेत. परंतु त्यांच्या तोंडी भाषा अशी असते की ते जनतेच्या इच्छेची पूर्ती करीत आहेत.

## एक शंका व तिचे उत्तर

इस्लाम मानवासाठी स्वातंत्र्याचा संदेश आहे ही गोष्ट ऐकून काही लोकांच्या मनात असा प्रश्न उभा राहण्याचा संभव आहे की मग इस्लाम खुद्द मुस्लिमांनाच या जुलमी व अत्याचारी हुकूमशहांच्या पंजातून का सोडवीत नाही. ज्यांनी आज पूर्ण मुस्लिम जगाला स्वातंत्र्यापासून वंचित करुन साखळदंडाने बांधून ठेवलेले आहे आणि जे इस्लामच्या नावाखाली मुस्लिमांना हीन, दीन, नीच दर्जाचे बनवीत आहेत. या शंकेच्या उत्तरात आम्ही असे सविनय सांगू की हे खरेखुरे हुकूमशहा, जरी इस्लामच्या नावाचा वापर करीत असले तरी खरी वास्तवता अशी आहे की त्यांच्या शासनामध्ये इस्लामला कुठलेही अधिकार, स्थान प्राप्त नाही. तसेच त्यांच्या जीवनामध्ये वा आसपास इस्लामची एखादी झलकसुध्दा दृष्टीस पडत नाही हे तथाकथित मुस्लिम त्या मानवी समूहाशी संबंध बाळगतात ज्याच्यविषयी स्वत: अल्लाहची आज्ञा आहे की,

"आणि जे लोक अल्लाहने दिलेल्या कायद्याप्रमाणे न्याय करणार नाहीत हे अत्याचारी होत." (५:४४)

"हे मुहम्मद ! तुमच्या पालनकर्त्यांची शपथ ! जोवर आपापसातील मतभेदांचा निवाडा करण्यासाठी तुम्हाला नेमत नाहीत, तोपर्यंत हे लोक 'श्रध्दावंत' होऊच शकत नाहीत. नंतर तुम्ही असा न्याय करा की त्यावर कोणालाही कमतरतेची जाणीव होऊ नये व त्या निवाड्याचा त्यांनी पूर्णपणे स्वीकार करुन तो मानावा." (४:६५)

## हे मुस्लिम हुकूमशहा

ज्या इस्लामकडे आम्ही आज लोकांना बोलावितो आणि अशी इच्छा करतो की त्यांनी इस्लामला आपल्या जीवनात मार्गदर्शक बनवावे त्याचा त्या 'इस्लाम'शी काडीचाही संबंध नाही,

ज्याचा भूतकाळातील मुस्लिम शासकांनी अंगीकार केला आहे. या शासकांच्या मनात ईश्वरी कायद्याविषयी कसलाही आदर असल्याचे आढळून येत नाही. ज्यांना जेव्हा पाहिजे तेव्हा त्या आदेशांना बाजूला सारुन टाकतात व मन मानेल तसे करतात व असे करताना त्यांना क्षणभरसुद्धा खंत वाटत नाही. प्रकाश व मार्गदर्शनाकरीता त्यांना आपल्या जीवनात त्याच्यापासून सहाय्य घेण्याची गरज भासत नाही. तसेच त्यांच्या निष्ठाही फक्त त्यांच्या पुरत्याच विशेष नाहीत. ते जेव्हा आपल्या पसंतीची एखादी वस्तु प्राप्त करतात तिचा ते अंगीकार करतात. मग भलेही युरोपच्या कुठल्याही देशाचे कायदे असोत अथवा शरीअतचे आदेश असोत. जी वस्तु वा जी गोष्ट त्यांच्या इच्छेविरुद्ध किंवा त्यांच्या हिताविरुद्ध असते, तिला उचलून दूर फेकून देतात. हे लोक माणसाशीही निष्ठावान नाहीत, तसेच अल्लाहशीही नाहीत. ती माणसे व ईश्वर या दोहोंचे अतिरेक व अशिष्ठपणा, तसेच अमर्यादा करणारे आहेत, कारण त्यांच्या अंगीकाराची वा दूर झटकून टाकण्याची कसोटी, सत्य व न्याय यावर आधारलेली नसून त्यांची स्वत:ची मते व त्यांच्या स्वत:च्या इच्छा-आकांक्षा व स्वार्थावर आधारभूत आहेत.

आम्ही जो इस्लाम जाणतो, तो अभिमानी, अहंकारी बादशहांचे, तसेच घमंडी व जुलमी शासकांचे अस्तित्व सहन करीत नाही. सामान्यजनाप्रमाणेच तो या शासकांनाही ईश्वरी कायद्यांच्या शृंखलांनी बांधून ठेवतो. त्यासाठीच जर हे शासक राजी नसले तर त्यांना तो कायमचे नष्ट करुन टाकतो कारण,

"जो (समुद्राच्या पाण्यावरील) फेस असतो तो उडून जातो व जी वस्तु माणसांना लाभप्रद आहे ती पृथ्वीवर स्थिरावते, शिल्लक राहते." (१३:१७)

## इस्लामी शासन

दुसऱ्या शब्दांत, याचा अर्थ असा झाला की इस्लामी शासनामध्ये हुकूमशहा असत नाहीत. कारण इस्लाम उदंडता, उन्मत्तपणा व हुकूमशाही सहन करण्याविरुद्ध आहे. तसेच तो आपल्याचप्रमाणे असलेल्या इतर माणसावर, अल्लाह व त्याचे प्रेषित मुहम्मद (स) यांच्या इच्छेला सोडून त्यावर आपण निर्माण केलेले कायदे लादण्याचा प्रयत्न करण्याची परवानगी देत नाही. इस्लामी शासनामध्ये, शासक ईश्वर व जनता या दोहोंना जबाबदार असतो. या जबाबदारीच्या कर्तव्याची ही निकड आहे की त्याने माणसामध्ये ईश्वरनिर्मित कायदे लागू करावे. जर तो आपल्या या कर्तव्यात कुचराई करील तर इतरांवर शासन करण्याचा त्याचा हक्क नष्ट होईल आणि मग कायदेशीर दृष्टीने तो प्रजेकडून आज्ञापालन करण्याची मागणी करु शकत नाही. या वास्तवतेला पहिले खलीफा आदरणीय अबू बक्र (र) यांनी आपल्या पहिल्या भाषणामध्ये अशारितीने व्यक्त केले आहे.

'माझे आज्ञापालन तेथपर्यंतच करा, जोपर्यंत मी अल्लाहचे आज्ञापालन करीन. मी जर अल्लाहचे आज्ञापालन करण्याची सीमारेषा ओलांडली तर माझे आज्ञापालन करणे तुमच्यावर बंधनकारक राहणार नाही.'

यावरुन हे कळून चुकते की इस्लाममध्ये शासकाला सरकारी खजिन्याच्या बाबतीत अथवा कायदे निर्माण करण्याच्या बाबतीत तेवढेच अधिकार असतात जेवढे जनतेतील एका साधारण व्यक्तीला असू शकतात. त्यापेक्षा शासनकर्त्याला जास्त अधिकार असू शकत नाहीत. यावरुन हे स्पष्ट होते की इस्लामी दृष्टिकोनातून एखाद्या व्यक्तीला इतर लोकांवर शासन करण्याचा अधिकार केवळ अशाच स्थितीत प्राप्त होतो, जेव्हा मुस्लिम समाजातील व्यक्तींनी त्याला आपल्या स्वतंत्र इच्छेने निवडलेले असते. व हे निवडणूककार्य पूर्णपणे स्वतंत्र, निपक्षपाती व कुठल्याही वाईट पद्धतीविरहित असते. अशा मतदानाच्या वेळी मतदानावर चांगुलपणा, भलेपणा, न्यायप्रियता यांच्या परिचित पायबंदीशिवाय इतर कसलीही पायबंदी अथवा आडकाठी नसते.

## महान धर्म

इस्लामी राज्य आपल्या नागरिकांना आपल्या अंतर्गत असलेल्या जुलमी व अत्याचारी शासकांच्या कृतीपासून तर वाचवतोच, तसेच तो बाह्य आक्रमणापासून रक्षण करतो. मग हे आक्रमण, साम्राज्यवादी शोषणरुपाने प्रकट झालेले असो अथवा अन्य कुठलेही रुप धारण केलेले असो. याचे कारण असे की इस्लाम स्वत:च एक महान, उदात्त व शक्तिशाली धर्म आहे. मानवाने आपल्या उच्च स्थानापासून खाली पडून या खोट्या व दांभिक ईश्वरसाम्राज्यासमोर गुडघे टेकून स्वत:ला मूल्यहीन करुन घेणे इस्लाम सहन करु शकत नाही. इस्लाम मानवी जीवनाची एक अत्यंत सरळ व साधी पद्धत प्रदान करतो व माणसाला असे आवाहन करतो की आपल्या पालनकर्त्याची प्रसन्नता प्राप्त करण्यासाठी तन मन धनाने त्याने प्रयत्नशील राहावे. आपल्या मर्जीला त्याच्या श्रेष्ठ मर्जीमध्ये विलीन करुन टाकावे. आपल्या सर्व साधनसामग्रीनिशी साम्राज्यवाद तसेच हुकूमशाही यांच्याशी सामना करावा.

## साम्राज्यवादापासून मुक्तीचा एकमेव मार्ग

याकरिता, आपण सगळे मिळून इस्लामचे बोट घट्ट धरु या, कारण आम्ही त्यांच्याच झेंड्याखाली गोळा होऊन, साम्राज्यवादाच्या उरलेल्या सर्व खाणाखुणा नष्ट करुन टाकल्या. साम्राज्यवादरुपी या दैत्याने जोवर या भूतलाला आपल्या अत्याचाराचे केंद्र करुन ठेवले आहे, तोवर मानवतेच्या मुक्तीचा आता एकच मार्ग उरला आहे. येथूनच खऱ्याखुऱ्या स्वातंत्र्याच्या वाटा फुटतील. त्यानंतर कोणीही कोणाचा गुलाम अथवा दास राहणार नाही. सर्व माणसांना आचार,

विचार, धर्म, याचे पूर्ण स्वातंत्र्य असेल. सगळ्यांची अब्रू व प्रतिष्ठा सुरक्षित असेल. केवळ याच तऱ्हेने आम्ही खऱ्या अर्थाने मुस्लिम बनून आपल्या पालनकर्त्याचे निष्ठावान दास होऊ शकतो. त्या पालनकर्त्यानेच आमच्याकरिता इस्लाम धर्माची निवड केली.

'आज मी तुमचा 'दीन' (जीवनधर्म) तुमच्यासाठी परिपूर्ण केला. आपला कृपाप्रसाद मी तुमच्यावर परिपूर्ण केला आहे आणि तुमच्याकरिता 'इस्लाम'ची जीवनधर्म म्हणून निवड केली आहे.' (५:३)

## विश्वव्यापी सुधारणांचा कार्यक्रम

इस्लामच्या या क्रांतिकारी सुधारणांचे क्षेत्र केवळ मुस्लिमांपुरतेच मर्यादित नसून आपल्या स्थायीभावानुसार तो एक विश्वव्यापी सुधारणांचा कार्यक्रम आहे. आजच्या संकटमय जगात आपापसांतील युद्धकलहांनी ग्रासलेल्या व तिसऱ्या महायुद्धाचे संकट डोक्यावर धिरट्या घालीत असलेल्या जगाला इस्लामचे अस्तित्व एक महान वरदान वा देणगीसारखेच आहे.

## विश्वसाम्राज्यवादाचे दोन तळ

आजचे जग, दोन विरोधी तळांमध्ये भांडवलशाही व साम्राज्यवाद विभाजित असून हे दोन्ही एकमेकांविरुद्ध उभे ठाकले आहेत. कारण यातील प्रत्येक तळ, जगावर आपले अधिपत्य स्थापण्याची महत्वकांक्षा बाळगतो. जागतिक बाजारपेठा, तसेच महत्त्वाच्या युद्धाच्या जागा व ठाणी, यावर कब्जा करण्यास उत्सुक आहेत. या दोहोंचाही दृष्टिकोन साम्राज्यवादी असून त्यांच्यात जरी मतभेद असले तरी एका बाबतीत त्यांचे पूर्ण एकमत आहे की जगातील इतर राष्ट्रांना ते आपल्या प्रभावाखाली आणून त्यांना दास बनवू इच्छितात. म्हणून अधिकाधिक मानवी बळ, तसेच अधिकाधिक भौतिक साधने आपल्या अधिकारात असावीत, याकरिता दोघेही प्रयत्नशील आहेत. दुसऱ्या मागसांचे मूल्य त्यांच्या दृष्टीने मुक्या पशूपेक्षा अधिक नाही. (आपल्या परिभाषेत हे लोक माणसांना 'मानवशक्ती' किंवा 'मानव संसाधन' असे म्हणतात.) माणसांना या कार्याचे साधन समजतात व त्यांचा उपयोग करुन आपल्या घृणास्पद उद्देशांची पूर्ती करतात.

## एक तिसरा तळ

मुस्लिम जगत जर या पाशवी साम्राज्यवादी दानवाविरुद्ध एक होऊन उभे ठाकले तर जागतिक विश्वशांतीला घातक ठरणाऱ्या या आंतरराष्ट्रीय द्वेषपूर्ण संघर्षांना यशस्वी रीतीने व प्रभावीपणाने रोखू शकेल. मुस्लिम राष्ट्रांनी जर एकजूट निर्माण केली तर सहजरित्या व विनासायास एक तिसरा तळ 'मुस्लिम ब्लॉक' होऊ शकतो. अशा तऱ्हेचा एखादा ब्लॉक, जर अस्तित्वात आला, तर जागतिक राजकारणाचे महत्त्वाचे केंद्रस्थान होऊ शकतो. कारण

भौगोलिकदृष्टया हे मुस्लिम देश पृथ्वीच्या मध्यस्थानी आहेत. आपल्या अशा भौगोलिक स्थानामुळे हे मुस्लिम देश आपल्या राष्ट्रीय हिताच्या दृष्टीने अथवा आपल्या समुदायरुपी ब्लॉकच्या हिताच्या दृष्टीने कसल्याही अडथळ्याविना आपल्या मर्जीनुसार कुठल्याही दुसऱ्या तळाबरोबर राहतील व पौर्वात्य अथवा पाश्चिमात्य साम्राज्यवादाचे अस्त्र बनण्याऐवजी ते आपल्या खऱ्या हिताकरिता संयुक्तरितीने प्रयास करु शकतील.

## हर्षशक्ती, तसे प्रियजीवन

इस्लाम मानवतेची एकमात्र आशा आहे आणि इस्लामशीच मानवतेचे भवितव्य निगडीत आहे. वर्तमान सिद्धान्तातील संघर्षामध्ये इस्लामी दृष्टिकोनाला यश प्राप्त होणे, हे मानवाच्या मुक्तीची शाश्वती होऊ शकते. इस्लामचे यश इतके महत्त्वाचे असूनसुद्धा ते प्राप्त होणे म्हणजेच हे असंभवनीय नाही. जशी गतकाळात होती तशीच इस्लामी व्यवस्था स्थापित करणे आजही शक्य आहे. फक्त अट अशी की त्याच्या सीमारेषेत सामील झालेल्या सर्व लोकांनी आजच जर अशी प्रतिज्ञा केली की ते इस्लामला सबंध जगावर प्रभावी व यशस्वी केल्याविना स्वस्थ बसणार नाहीत, तरी शक्य आहे. याकरिता त्यांना कुठल्याही बाह्य शक्तीची गरज उरणार नाही. प्रत्येक क्षणी डोक्यावर असलेल्या तिसऱ्या महायुद्धाच्या भयाचा शेवट, मानसिक दडपण, रोगराई तसेच मानसशास्त्रीय ताणतणावावरील उपाय म्हणजेच दुसऱ्या शब्दात आनंद, सुखसमाधान, शांतीपूर्ण प्रिय जीवन असाच अर्थ मानवाकरिता या इस्लामी विजयाचा होईल.

## पाश्चिमात्यांच्या प्रगतीची वास्तवता

या समस्यांच्या आणखी एका पैलूवर एक दृष्टिक्षेप टाकू या, आज पाश्चिमात्यांनी विज्ञानाच्या क्षेत्रात जरी अनेक सफलता व यश प्राप्त केले असले, तरी मानवतेच्या क्षेत्रात ते अद्याप मागासलेले व रानटी आहेत. विज्ञानाने त्यांना भौतिक समृद्धी दिली परंतु सज्जन माणसे दिली नाहीत. मानवतेची प्रगती खुंटली आहे. त्यांची मने श्रेष्ठ मानवी मूल्यांनी रिक्त आहेत. आधुनिक संस्कृतीने अध्यात्मापेक्षा द्रव्यावरच अधिक जोर दिला आहे व अध्यात्माऐवजी भौतिक समृद्धीला प्रामुख्य दिलेले आहे. ह्याचा परिणाम असा निघाला की प्रत्येक व्यक्ती उच्च सामाजिक उद्देशापेक्षा व कल्याणापेक्षा आपला स्वार्थ, आपले सुख, वैभव व आपले स्वार्थपूर्ण उद्देशांची प्राप्ती अधिक महत्त्वपूर्ण मानू लागली आहे. माणूस आज शारीरिक स्वादाच्या व रुचीच्या शोधात व्यस्त असलेला दिसून येतो, त्याचे हेच खरे कारण आहे. यावरुन हे स्पष्ट होते की अशा अवस्थेला मानवाची प्रगती वा मानवतेचा विकास असे म्हटले जाऊ शकत नाही. कारण माणसाच्या व मानवतेच्या उन्नतीचा अर्थ केवळ भौतिक व वैज्ञानिक प्रगतीच नसून, भौतिकता व पाशवी इच्छा लालसेपासून मुक्ती हेही त्याच अर्थात सामील आहेत. केवळ इस्लामच मानवतेला खऱ्याखुऱ्या प्रगतीपथापर्यंत आणून सोडू शकतो, म्हणून हेच ते स्थान आहे जेथे इस्लाम आमचा मार्गदर्शक ठरतो.

## खऱ्या प्रगतीचे प्रमाण

अतिवेगवान जहाजांना, विमानांना अणुबॉंबना, रेडिओला व झगझगीत बल्बांना प्रगती म्हणत नाहीत, त्यांना प्रगती मानने चूक होईल. कारण या वस्तू प्रगतीचे मोजमाप करण्याचे कसलेही प्रमाण आम्हाला देत नाहीत. जर खरी प्रगती जाणून घ्यावयाची असेल, तर माणसाने आपल्या पाशवी भावना आपल्या काबूत ठेवल्या आहेत की त्यांच्या हातातील तो एक खेळणे बनला आहे हे पाहिले पाहिजे. जर माणूस आता आपल्या इच्छावासनांसमोर विवश व त्यांच्या अधीन असेल व त्यांच्या पलीकडे कुठल्याही गोष्टीचा विचार करुच शकत नसेल तर हे नक्की समजा की माणूस खऱ्या प्रगतीपासून फार फार दूर आहे. मानवी रुपाने वैज्ञानिक क्षेत्रामध्ये डोळे दिपविणारे अनेक यश मिळवूनसुद्धा त्याची अवस्था दयनीय आहे, त्याला प्रगत अथवा यशस्वी तर म्हटलेच जाऊ शकत नाही.

प्रगतीच्या मोजमापाचे हे प्रमाण धर्म व नीतीने स्वत: निर्मिले असे प्रमाण नाही. ते बाहेरून कोठूनतरी आणून माणसावर लादले गेले, ही अनुमानाची गोष्ट नसून, वास्तवता आहे. त्याची पाळेमुळे मानवी स्वभावधर्मात दूरवर पोहोचलेली आहेत. म्हणून हे एक अपरिहार्य सत्य आहे की या नैतिक व मानवतेचे कल्याणकारी प्रमाण सोडून देऊन, जर एखादी जात, सुख वैभवात अडकली गेली तर ती फिरुन पुन्हा कधी आपली पूर्वीची महानता, प्रतिष्ठा व वैभव टिकऊ शकेल अशायोग्य होऊच शकली नाही, अथवा मानवतेच्या सामुदायिक प्रगती व कल्याणाचे एखादे कार्य करू शकली नाही. प्राचीन ग्रीस असो अथवा इराण व रोमन साम्राज्याचा ऱ्हास असो, अथवा अब्बासी कालाच्या अखेर स्वत: मुस्लिमांच्या वैभवाचा झालेला ऱ्हास असो, या सर्वांत आम्हाला भोगविलासाचा विनाशकारी प्रभावच कार्यरत असल्याचे दिसतो. वर्तमानकाळातील इतिहासात भोगवादी फ्रान्स राष्ट्राच्या लज्जास्पद चारित्र्याला कोण विसरू शकतो, जे फ्रान्सने दुसऱ्या महायुद्धात प्रस्तुत केले. शत्रूसमोर हत्यार टाकून देण्यात त्या राष्ट्राने क्षणभरही विलंब केला नाही, उलट एका आठवड्यातच नतमस्तक होऊन, शत्रूसमोर शरण आले. तो शत्रूचा एकही वार सहन करु शकला नाही. कारण तेथील जनतेला आपल्या राष्ट्राच्या रक्षणापेक्षा कित्येक पटीने अधिक आपले प्राण, आपली मालमत्ता व आपले सुखवैभव यांचीच चिंता पडली होती. आपल्या राष्ट्राच्या महानतेपेक्षा, त्याच्या किर्ती व नावापेक्षा अधिक चिंता त्यांना या गोष्टीची होती की शक्य त्या तऱ्हेने त्यांची राजधानी पॅरीस व तेथील नृत्यगृहे, शत्रूच्या बॉंबफेकीपासून सुरक्षित राहवीत.

## अमेरिकेचे उदाहरण

काही अज्ञानी लोक, या संदर्भात अमेरिकेचे उदाहरण पुढे करतात आणि असे म्हणतात की तेथील लोक सर्व प्रकारच्या भोगविलासात, भौतिक जगाचा आस्वाद घेण्यात व सुख-वैभवात पूर्णपणे बुडालेले आहेत. परंतु असे असूनसुद्धा जगात त्यांना शक्ती, वैभव व प्रतिष्ठा प्राप्त आहे. भौतिक वस्तुंच्या उत्पादनाच्या दृष्टिने, त्यांचा देश जगातील उच्चस्थानावर आहे. खात्रीने या साऱ्या

गोष्टी खऱ्या आहेत, पण आमचे हे मित्र विसरतात की भौतिक व आध्यात्मिक दृष्टिकोनातून अमेरिका जगातील राष्ट्रसंघाच्या भावकीत अद्याप एक नवशक्ती आहे. हे सर्वांना ठाऊक आहे की यौवनामध्ये सुरुवातीला पुष्कळसे गुप्तरोग दडलेले असतात व प्रत्यक्षात त्यांचे कुठलेही चिन्ह दिसत नाही. कारण समाजव्यवस्थेत अजून एवढी प्रतिकार शक्ती शिल्लक असते की ते भिन्न भिन्न रोगांच्या बाह्यचिन्हांना, लक्षणांना प्रकट होऊ देत नाहीत. पण उघड्या डोळ्यांनी पाहून एखाद्या समाजाचे दर्शनी स्वास्थ अथवा झगमगाट पाहून फसू शकत नाही. तसेच रुचकर व मनोहर खुल्या वातावरणात लपलेल्या घातक रोगांची चिन्हे त्याच्या नजरेआड होऊ शकत नाहीत. वास्तविकपणे नैतिक दृष्टिकोनातून अमेरिकेची ही अवस्था पश्चिमेतील इतर राष्ट्रांपेक्षा काही अधिक चांगली नाही, हे खालील दोन गोष्टीवरुन सहज लक्षात येण्यासारखे आहे. त्यावरुन हेही कळून चुकते की आपण एकूण प्रगती व यश मिळविलेले असूनसुद्धा विज्ञान हे ईश्वरी कायद्याचेच एक अंग आहे. तोच ईश्वरी कायदा परिस्थिती व घटना यापासून स्वतंत्र असून अधिक श्रेष्ठ आहे.

"तर तुम्हाला अल्लाहचे विधान कधीही बदललेले आढळणार नाही." (३५:४२)

## दोन बातम्या

काही दिवसापूर्वी वर्तमानपत्रातील एका बातमीत असे दर्शविलेले होते की अमेरिकेच्या विदेशमंत्रालयाने आपल्या ३३ कर्मचाऱ्यांना संशयास्पद हालचालीकरिता व आपल्या देशाच्या गुप्त बातम्या शत्रुला दिल्याच्या आरोपासाठी नोकरीतून काढून टाकले. दुसऱ्या बातमीचा सारांश असा की अमेरिकन सैन्यात या क्षणी १,२०,००० सैनिक पळपुटे आहेत. तेव्हा अमेरिकन राष्ट्र बाल्यावस्थेत जात आहे व जगावर आपले प्रभुत्व स्थापन करुन जगाचे नेतृत्व करण्याचे स्वप्न पाहत आहे, अशा काळी अमेरिकन सैन्याची एकूण संख्या पाहता पळपुट्यांची ही संख्या फार मोठी वाटते.

हा फक्त आरंभच आहे. जीवनात आपल्या वर्तमान भौतिकवादी जीवनपद्धतीपासून कोणत्याही परिस्थितीत जर अमेरिकन राष्ट्र परावृत्त झाले नाही तर त्याचा परिणाम शेवटी असाच होईल जसा त्याच्या पूर्वीच्या राष्ट्रांचा झाला आहे. कारण हाच अटळ सृष्टीनियम आहे.

## अमेरिकन चित्राचा अंधकारमय पैलू

या वार्तेने अमेरिकन चित्राची केवळ एकच बाजू आमच्यापुढे स्पष्ट होते, दुसऱ्या बाजूकडे डोकावून पाहिले तर आम्हाला हे कळून चुकेल की अपार भौतिक उत्पादन साधने असूनसुद्धा अमेरिकन राष्ट्र उच्च नैतिकमूल्ये व सिद्धान्ताच्या क्षेत्रात आश्चर्यजनक मर्यादेपर्यंत वांझोटे सिद्ध झाले आहे. याचे कारण सबंध राष्ट्राच्या रुपाने ते भौतिक सुखवैभवामध्ये व इच्छावासनामध्ये पूर्णपणे बुडाले आहे. अद्यापपर्यंत पाशवी भावनांपासून पूर्णपणे मुक्त होऊन, अडचणीचे व समस्यांचे अवलोकन करण्याचे भाग्य त्याला फार कमी प्रमाणात मिळाले. काळ्या निग्रोशी जे

रानटीपणाचे वर्तन तेथे केले जात आहे ते त्या राष्ट्राच्या अगदी खालच्या दर्जाचे व दयनीय नैतिक पतन असल्याचे द्योतक आहे. पाशवी इच्छावासनांचा माणुसकीवर एवढा मोठा प्रभाव आहे की माणसे इच्छालालसांच्या पूर्तीतच किंबहुना तिच्या भक्तीतच रत आहेत. हा मानवतेचा घोर अपमान आहे व तिच्या अस्तित्वात तो कधीही प्रगतीच्या मार्गाने पुढे जाऊ शकत नाही.

## सदाचार व कल्याणाचा मार्ग

आजच्या जगाची ही प्रतिमा फार अंधकारमय आहे, पण मुक्तीचा एक मार्ग अजून शिल्लक आहे व तो इस्लामचा मार्ग आहे. ज्याप्रमाणे १३ व्या शतकापूर्वी, त्याने माणसाला पाशवी इच्छावासनांच्या पंजातून सोडविले, त्याप्रमाणे आजही तो माणसाला मुक्ती मिळवून देऊ शकतो. मनुष्याला त्याला इच्छावासनांच्या प्रभुत्वातून मुक्त करुन, त्याला तो असा बनवू शकतो की आपले आध्यात्मिक स्तर उंचावण्याकरिता तो आपल्या मनाची व बुद्धीची सर्व शक्ती खर्च करील, जेणेकरून त्याचे जीवन सदाचारांनी व पुण्याईने भरुन जाईल व चहूदिशांत त्याचेच कौतुक होईल.

## इस्लामच्या पुनरुज्जीवनाच्या आंदोलनाची शक्यता

इस्लामचे पुनरुज्जीवन होणे आता संभवनीय नाही व तसा प्रयत्न करणेही व्यर्थ आहे, असे काही लोक या गोष्टी ऐकून करणे संभवनीय आहे. पण या लोकांना कळायला पाहिजे की ज्याप्रमाणे गतकाळात इस्लामी जीवनपद्धतीच्या व्यावहारिक स्थापनेनंतर असे सिद्ध झाले आहे की त्याच्या मार्गदर्शनात, मानवजात आपल्या पाशवी गुणधर्मांचे दमन करु शकते. त्याचप्रमाणे आजसुद्धा या ऐतिहासिक सत्याचा पुनरुच्चार होणे संभवनीय आहे, कारण मानवी स्वभावधर्मात मूलगामी काही फरक झालेला नाही. ज्याप्रमाणे पूर्वी होता तसाच आजही आहे. इस्लामच्या उदयकाळी जगाची नैतिक तसेच धार्मिक अवस्था त्याचप्रमाणे अध:पतीत होती, जशी वर्तमानकाळाची दृष्टीस पडते. पूर्वीच्या व आजच्या अध:पतनामध्ये, कालाच्या फरकाशिवाय इतर कुठलाही फरक झालेला नाही. प्राचीन काळातील रोममधील नैतिक अध:पतन वर्तमान लंडन, पॅरीस व अमेरिकेतील शहरापेक्षा, काही कमी नव्हते व मागे नव्हते. त्याचप्रमाणे प्राचीन इराण जसा वासनांच्या गदारोळाचे भक्ष्य बनला होता त्याचप्रमाणे आजचे साम्यवादी देश, त्याचे भक्ष्य आहेत. हीच ती ऐतिहासिक पार्श्वभूमी होती, जेथे इस्लामचा जगात उदय झाला. आपल्या आगमनाबरोबरच आपल्या प्रभावाखाली असलेल्या जगताच्या नैतिक अवस्थेमध्ये क्रांती घडविली. त्याला अध:पतनापासून वाचवून बाहेर काढले. जीवनातील एका उच्च ध्येयाशी परिचय करुन दिला, मानवाला गतिमान केले. सदाचार व सत्याच्या मार्गात 'जिहाद' (धर्मयुद्ध) ची उच्च भावना निर्माण केली. मानवाची प्रगती करुन त्याला सुख-समाधान दिले व अशा एका ज्ञानपूर्ण आध्यात्मिक आंदोलनास जन्म दिला जो कित्येक दिवस पूर्वेवर व पश्चिमेवर प्रभाव टाकून होता. परिणामस्वरुप जगाला एका महान चिंतनपूर्ण क्रांतीचा परिचय झाला व इस्लामी जग हे प्रकाश,

मार्गदर्शन व प्रगतीचे उगमस्थान बनले ज्यापासून समस्त मानवजात, दीर्घकाळापर्यंत तेज, प्रकाश, मार्गदर्शन प्राप्त करीत राहिली. आपल्या या दीर्घ महत्तेच्या व वैभवाच्या काळात आज इस्लामी जग भौतिक, बौध्दिक वा आध्यत्मिक दृष्टयाही कधी इतरांच्या मागे राहिले नाही. कारण इस्लाम नैतिक भटकंतीला, वासनात्मक अस्ताव्यस्तपणाला व निरीश्वरवादाला परवानगी देत नाही व त्यांची वाढ होण्यास संधीही देत नाही. याच कारणास्तव त्या काळात सदाचार, सुसंस्कार मानवाच्या सर्व प्रयत्नांच्या क्षेत्रात मुस्लिमांना जगातील इतर राष्ट्रांचे नेतृत्व मिळाल्याचे आढळते. त्यांचे जीवन इतरांसाठी एक आदर्श जीवन ठरले होते. नंतर ते हळू हळू इस्लामी तत्त्वापासून तेथपर्यंत ढळत गेले की त्यांच्या जीवनात श्रेष्ठ उद्देशांची व सिद्धान्ताची कसलीही झलक उरली नाही व ते खालच्या दर्जाच्या वासनालालसांचे व भावनांचे गुलाम बनले. या अपराधांचा परिणाम एका अटळ, अपरिहार्य, अनिवार्य कायद्यानुसारच झाला. त्यांना सरतेशेवटी याच जगात शिक्षाही भोगावी लागली व त्यांच्या गौरवशाली महानतेचा सूर्य अस्त पावला.

## वर्तमान इस्लामी आंदोलन

प्रत्येक क्षणी पुढे पुढे सरकणारे वर्तमान इस्लामी आंदोलन अधिकाधिक दृढ होत चालले आहे. गतकाळापासूनच आध्यात्मिक पोषण प्राप्त करुन ते पुष्ट होत आहे. वर्तमानातील समग्र मंगल, शूचिर्भूत व नैतिकदृष्ट्या संमत असलेल्या साधनांचा वापर व उपयोग करते आणि आपली दृष्टी दूरवरच्या भविष्यावर ठेवून आपल्या ध्येयाच्या दिशेने पुढे जात आहे. त्याचा भविष्यकाळ तेजपूर्ण आहे. मागे येऊन गेला तसाच चमत्कार पुन्हा एकदा त्याचेकडून घडून समोर येऊ शकतो. त्यानंतर मानव पाशवी भावनांचा गुलाम राहणार नाही उलट जगाच्या उपद्व्यापात, कटकटीमध्ये असून व त्याच्या बंधनामध्ये अडकलेला असूनसुद्धा तो एका स्वतंत्र माणसाप्रमाणे मान ताट करुन चालू शकेल. कारण त्याचे ध्येय भौतिक आस्वाद घेण्याचे असणार नाही. त्याची भरारी निळ्या आकाशाच्याही पलीकडे असेल.

## एक परिपूर्ण जीवनपद्धत

परंतु याचा अर्थ असा कदापिही नाही, की इस्लाम केवळ एक आध्यात्मिक विश्वास आहे, अथवा केवळ नैतिक आचरणाची पद्धत आहे, अथवा जमीन व आकाशाच्या संदर्भात ज्ञानपूर्ण शोधांचे नाव नसून, इस्लाम मानवी जीवनातील एक व्यावहारीक पद्धत आहे. जगाच्या सर्व भागांवर व सर्व समस्यांवर प्रभावी आहे. जीवनाचा कोणताही पैलू त्याच्या वर्चस्वावाचून राहिलेला नाही. तो मानवी जीवनातील सर्व संबंध व संपर्कांना सुरळीत करतो, मग या समस्या राजकारणाच्या असोत, आर्थिक वा सामाजिक असोत व त्यांच्याकरिता यथायोग्य कायदे करुन त्यांना पूर्णपणे व्यवहारात लागू करतो. इस्लामच्या या कार्याचा एक ठळक गुण असा आहे की अशा तऱ्हेने तो व्यक्ती व समाज, बुद्धी व विवेक, कर्म व भक्ती, जमीन व आकाश तसेच इहलोक व

परलोक यादरम्यान समन्वय निर्माण करुन त्यात एक प्रकारचा समतोल निर्माण होतो. जीवनाचे अनेकानेक पैलू एका समतोल एकूणाचेच अंश बनतात. या प्रकरणामध्ये इस्लामच्या राजकीय, आर्थिक, सामाजिक पद्धतीवर विस्तृत माहिती देण्यास वाव नाही.

## इस्लामचा पहिला गुण

इस्लामच्या बाबतीत ही पहिली गोष्ट चांगल्यारितीने समजून घ्यावयास पाहिजे की तो एक रिकामा सिद्धान्त नसून एक अशी व्यावहारिक जीवनपद्धती आहे, जी मानवी जीवनातील कोणतीही गरज नजरेआड करीत नाही. त्याचप्रमाणे त्याच्या प्राप्तीकरिताही मार्ग मोकळे करते.

## इस्लामचा दुसरा गुण

दुसरा गुण असा की मानवाच्या वास्तव गरजा एकत्र करण्याचे कामी इस्लाम जीवनामध्ये पूर्ण न्याय व समतोल स्थापन करु इच्छितो तसेच मानवी स्वभावधर्माच्या मर्यादांनाही तो आपल्या दृष्टीआड होऊ देत नाही. तो आपल्या सुधारणांचा आरंभ व्यक्तीपासून करतो व त्याच्या जीवनात देह व आत्मा, तसेच बुद्धी व इच्छा-आकांक्षाच्या अनेक प्रकारच्या मागण्यामध्ये समतोल व एकोपा निर्माण करतो, जेणेकरुन यापैकी कोणीही आपल्या वैध मर्यादांचे उल्लंघन करु नये. उच्च आध्यात्मिक विकासाखातर इस्लाम पाशवी प्रवृत्तीला पूर्णपणे दडपूनही टाकत नाही. त्याचप्रमाणे वासनांच्या पूर्तीकरिता व आस्वाद प्रियतेकरिता तो माणसाला अशा तऱ्हेने डुंबू देत नाही कारण मनुष्य शुद्ध पशू बनेल. हे त्याला पसंत नाही. त्याऐवजी इस्लाम आत्मा व देह या दोहोंवर, एका उच्चस्थानाहून दृष्टिक्षेप करतो, त्यांच्यात एकजिनसीपणा निर्माण करतो, त्यांच्या सर्व गरजा पुऱ्या करतो. आत्मा व देह समन्वयाने मानव व्यक्तित्व यांच्या परस्परविरोधी संघर्षाचे रणक्षेत्र बनून मानवी व्यक्तिमत्त्वाच्या ठिकऱ्या उडण्यापासून वाचते. अशारितीने व्यक्तीचे जीवन, जेंव्हा स्वास्थ्यपूर्ण पायावर उभारलेले असते तेव्हा इस्लाम व्यक्ती व समाज यांच्या गरजांमध्ये एकजिनशीपणा निर्माण करण्याकडे आकर्षित होतो. म्हणून हा कुठल्याही व्यक्तीला इतर व्यक्तीविरुद्ध वा समाजाविरुद्ध कसल्याही संघर्षाची परवानगी देत नाही. तसेच तो समाजालाही तसा अधिकार देत नाही की त्याने दुसऱ्या व्यक्तीचा अधिकार हिसकावून घ्यावा. मानवाच्या एका वर्गाने अथवा एखाद्या राष्ट्राने मानवाच्या इतर वर्गांवर व इतर राष्ट्रांवर आपले प्रभुत्व गाजवावे ही गोष्ट इस्लाम सहन करु शकत नाही. तात्पर्य असे की सामाजिक जीवनात आढळणाऱ्या व परस्परविरोधी संघर्ष करणाऱ्या शक्तींना बांधून ठेवून इस्लाम त्याची दोरी आपल्या हातात ठेवतो. त्याचे आपापसांतील संघर्षापासून रक्षण करतो व त्यात एकजिनशीपणा निर्माण करुन त्यांना असे शिक्षण व अशी मांडणी करतो की ते सर्व एकजीव बनून मानव तसेच मानवतेच्या उच्चतम लाभाकरिता कार्य करु शकतील.

## समाजशक्तींमधील समतोल

याचबरोबर इस्लाम आध्यात्मिक व भौतिक शक्तींमध्ये तसेच आर्थिक व मानवतेच्या शक्तींमध्ये समतोल निर्माण करतो. साम्यवादाप्रमाणे इस्लाम जीवनामध्ये मानव तत्त्वावर आर्थिक तत्त्वांचे प्रभुत्व व निर्णायक श्रेष्ठत्व मान्य करीत नाही. आध्यात्मवादाचा हा सिद्धान्तही मान्य करीत नाही की ते मानवी जीवनाची घडण करण्याचे काम फक्त अध्यात्माच्या व वैचारिक सिद्धान्ताच्या बळावर केला जाऊ शकतो. कारण तो समाजाला कुठल्याही एका, अथवा काही भागाच्या समान मानत नसून त्या सर्वांचा एकजीव व मिलाफ मानतो. त्यातील सर्वांना सारखे महत्त्व देतो व त्यांच्या एकत्रित होण्याने एक संतुलित एकजीव अस्तित्वात आणतो.

## इस्लामचा तिसरा गुण

तिसरी ही गोष्ट चांगल्या तऱ्हेने लक्षात ठेवली पाहिजे की आर्थिक दृष्टिकोन व आर्थिक पद्धतीमध्ये इस्लाम आपली स्वत:ची, चिरकाल टिकणारी व वेगळी शान बाळगतो. काही बाबतीत काही अंशच समानता असूनसुद्धा त्याचा साम्यवादी पद्धतीशी कसलाही संबंध नाही, त्याचप्रमाणे भांडवलशाहीशी नाही. यामध्ये दोन्ही पद्धतींतील गुण अंतर्भूत आहेत. पण त्यातील अवगुण, कमजोरी, त्रुटी यापासून तो पूर्णपणे स्वच्छ आहे. आजच्या वर्तमान पाश्चिमात्य पद्धतीप्रमाणे व्यक्तीला तो इतके अतिमहत्त्व देत नाही जेणेकरुन समाज व्यक्तीच्या तुलनेत विवश व्हावा व कसल्याही अवस्थेत तो व्यक्तीला आवरु शकत नाही. ज्यामुळे सबंध समाजाचेच स्वातंत्र्य नष्ट होऊन जावे. मर्यादेचे उल्लंघन केलेले याप्रकारचे व्यक्तीस्वातंत्र्यच भांडवलशाही पद्धतीचा पाया आहे आणि त्याला उघड उघड अशी परवानगी देतो की तो इतर व्यक्तींच्या, किंबहुना ज्याने त्याला प्रगतीपथावर घातले व त्याला व्यक्तिमत्त्व प्रदान केले. त्या समाजालाही एक धोका बनावे आणि दुसरीकडे सामाजिक जीवनावर बोलतानासुद्धा समाजाचे महत्त्व सांगतानाही इस्लाम अतिशयोक्ती करीत नाही, जसा वर्तमानकाळात पूर्व युरोपातील साम्यवादी राष्ट्रांचा स्थायी स्वभाव बनला आहे. या शासनामध्ये जे काही महत्त्व आहे ते समूहाचे महत्त्व आहे व तोच जीवनाचा मूळ आधार आहे. त्याच्या तुलनेत व्यक्तीला कसलेही मूल्य व महत्त्व नसून समाजापासून वेगळे त्याच्या अस्तित्वाचा कसलाही विचार केला जाऊ शकत नाही. परिणामस्वरुप या देशामध्ये शक्ती व स्वातंत्र्याचे उगमस्थान केवळ समूह आहे आणि व्यक्तीला असा अधिकार प्राप्त नाही की तो समाजाच्या वर्चस्वाला आव्हान देऊ शकेल. तसेच आपल्या गरजाखातर आपले तोंड उघडून मोकळेपणाने बोलण्याचीही परवानगी आहे. अशा दृष्टिकोनाच्या पोटी कम्युनिझमने जन्म घेतला असून त्यांचा असा दावा आहे की व्यक्तीच्या भाग्याचा धनी केवळ राज्यच आहे व त्याला आपल्या व्यक्तींवर अमर्याद अधिकार प्राप्त आहेत, म्हणून राज्य व्यक्तींना हवे तसे घडविण्याकरिता समर्थ आहे.

## समाजव्यवस्थेचा पाया

साम्यवाद व भांडवलशाही पद्धतींच्या या अतिरेकांचा त्याग करुन इस्लाम सुवर्णमध्याचा अंगीकार करतो. तो व्यक्तींना तसेच समूहांना समान महत्त्व देतो व त्यांच्यात असा एकजिनशीपणा निर्माण करतो की व्यक्तीला आपले व्यक्तिमत्त्व वृद्धिंगत व विकसित करण्यासाठी लागणारे स्वातंत्र्य प्राप्त करता येते. परंतु त्याला अशी परवानगी नसते की त्याने इतर व्यक्तींचे अधिकार हिसकावून वा हिरावून घ्यावे अथवा त्यांच्यावर जुलूम वा अत्याचार करावा. तसेच दुसरीकडे इस्लाम समाजाला तसेच त्याच्या शासकीय अंगाला अर्थात राज्यशासनाला सामाजिक तसेच आर्थिक बाबींना एकत्र बांधणी करण्यासंदर्भात व्यापक अधिकार देतो, जेणेकरुन मानवी जीवनामध्ये एकजिनशीपणा व समतोल निर्माण केला जाऊ शकेल. इस्लामच्या या समाजव्यवस्थेचा पाया व्यक्ती व समूह यातील प्रेमसंबंधावर उभारलेला असून कम्युनिस्ट समाजाप्रमाणे तो तिरस्कार व वर्गकलहावर आधारित नाही.

## ईश्वरनिर्मित जीवनपद्धती

येथे ही गोष्ट समजून घेतली पाहिजे की इस्लामची ही स्पष्ट जीवनपद्धती कुठल्याही आर्थिक कारणांचा अथवा परिस्थितीचा परिणाम नाही. तसेच त्याचे अस्तित्व भिन्न वर्गांच्या स्वार्थांनी बरबटलेल्या संघर्ष व कलहापासून उपजले नाही. ती एक ईश्वरनिर्मित आदर्श व्यवस्था आहे. ती अशा एका युगात मानवाला प्राप्त झाली, जेव्हा त्याच्या जीवनात आर्थिक बाबींना काही विशेष महत्त्व नव्हते. तसेच त्याला सामाजिक न्यायाचे वर्तमान अर्थ ठाऊक नव्हते. म्हणून माणसाच्या सामाजिक व आर्थिक बाबतीतील सुधारणेच्या दृष्टीने पाहिले तर इस्लामच्या तुलनेत कम्युनिझम तसेच भांडवलशाही हे दोन्ही फार नंतरच्या काळात निर्माण झाले. ऐतिहासिक दृष्टिकोनातून इस्लामला या दोहोंच्या तुलनेत प्रथमस्थान प्राप्त आहे.

## जीवनातील मौलिक गरजा

उदाहरण म्हणून माणसाच्या जीवनातील मौलिक गरजाच घ्या. सामान्यपणे असे म्हटले जाते की कार्ल मार्क्सच पहिला माणूस होता ज्याने अन्न, निवारा व वासनांची तृप्ती या मौलिक गरजा आहेत असे म्हटले आणि सरकारचे हे अनिवार्य व बंधनकारक कर्तव्य म्हणून दाखविले की त्याने राष्ट्रातील सर्व व्यक्तींच्या गरजा एकत्र करुन त्यांची पूर्तता करावी. कार्ल मार्क्सच्या या विधानाला मानवी विचारामध्ये फार क्रांतिकारी समजले जाते. पण सत्य हे आहे की कार्ल मार्क्सच्या जन्माच्या १४ शतके आधी इस्लामद्धारा हे जग या क्रांतिपूर्ण विधानाशी चांगल्या तऱ्हेने परिचित होऊन चुकले होते. म्हणून या संदर्भात इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांनी असे उल्लेखित केले आहे की,

''ज्या व्यक्ती आमचे (इस्लामी राज्याचे) कर्मचारी म्हणून कार्य करीत आहेत व त्यांना पत्नी नसेल तर त्यांचा विवाह केला जाईल, जर त्यांचे स्वत:चे घर नसेल तर त्यांना राहण्यासाठी

घर दिले जाईल, जर चाकर नसतील तर त्यांना चाकर प्राप्त करुन दिले जातील व जर त्यांच्याकडे प्रवासाचे साधन म्हणून एखादे जनावर नसेल तर त्यांच्या प्रवासाची व्यवस्था केली जाईल."

त्यांच्या या ऐतिहासिक जाहीरनाम्यात केवळ सर्व मानवी मूळ अधिकारच आहेत असे नाही, ज्यांचे जाहीर निवेदन कार्ल मार्क्सने नंतरच्या काळात केले. अन्य बरेच काही त्यात सामील आहे. पण कम्युनिझमप्रमाणे इस्लाम त्याचे फळ, वर्गकलह, वर्गद्वेश व रक्तमय क्रांती आणि सर्व उच्च जीवनमूल्यांचा इन्कार करुन वसूल करीत नाहीत. ते अन्न, निवारा व वासनांची तृप्ती या मर्यादित क्षेत्रात कधीही बांधले जाऊ शकत नाही.

## चिरकाल टिकणारी जीवनपद्धती

इस्लामी जीवनपद्धतीचे असे काही ठळक गुण आहेत. यावरुन ही गोष्ट चांगल्यारितीने स्पष्ट होते की धर्म म्हणून इस्लामला एका अशा विशाल, व्यापक व तर्कशुद्ध नियमांचे आणि सिद्धान्तांचे नामाभिदान दिले जाऊ शकते की मानवी जीवन आपल्या झगमगाटात व सुखवैभवात असूनसुद्धा त्याच्या स्पष्ट मर्यादा नजरेस पडतात व त्याचा कुठलाही भाग मग तो भावनेच्या जगाशी असो वा विचारांशी, कर्माशी, भक्तीशी, आर्थिक बाबी व सामाजिक संबंधाशी, नैसर्गिक प्रेरणांशी अथवा आध्यात्मिक आंदोलनाशी असो, त्याच्या पकडीपासून सुटत नाहीत. या अनेकविध पैलूंमध्ये समन्वय निर्माण करुन इस्लाम त्याला एक सुंदर, समतोल तसेच वैशिष्ट्यपूर्ण जीवनपद्धतीचे रुप प्रदान करतो. अशा प्रकारची सर्वव्यापी समतोल अथवा वैशिष्ट्यपूर्ण जीवनपद्धती, कोणत्याही काळात आपली उपयुक्तता हरवून, गमावून बसू शकते काय? माणूस खऱ्या अर्थाने याकडे दुर्लक्ष करु शकतो काय? कारण आपल्या उद्देशांच्या अथवा लक्ष्याच्या दृष्टीने हे स्वत:च जीवनपर्याय आहेत किंबहुना स्वयंजीवनच आहे. म्हणून जोवर या धरतीवर जीवमात्र आढळेल तोवर ही पद्धतीही अस्तित्वात असेल व टिकून राहील आणि सतत आढळणारे त्याचे अक्षय ठसे कधीही पुसले जाऊ शकत नाहीत.

## आजच्या युगाची गरज

आज जी अवस्था आढळते व या वेळी ज्या ज्या समस्या आहेत ते पाहिल्यानंतर कोणताही बुद्धिमान माणूस असे माणने कठीण आहे की आजचा माणूस एखाद्या बौद्धिक आधारावर इस्लामशी विन्मुख होऊ शकतो व त्याने सादर केलेल्या जीवनपद्धतीशी दुर्लक्ष करुन तिची उपेक्षा करु शकतो. आज २१ व्या शतकातही मानवता तशाच प्रकारच्या सर्व दोषांमध्ये बरबटलेली आहे जशी ती मानवाच्या रानटी अवस्थेमध्ये होती. प्रगतीचा, प्रकाशाचा ध्यास ठरलेल्या या युगामध्ये मानवता, वंशद्वेष, वर्णद्वेष याच्या अत्यंत तिरस्करणीय अवस्थेत आहे. उदाहरण पाहिजे असेल तर अमेरिका व दक्षिण आफ्रिका या देशांवरच एक दृष्टी टाका. नैतिक, सदाचार, सुसंस्कार व मानवतेच्या बाबतीत या २१ व्या शतकातील माणसाला, अजून इस्लामपासून फार काही

शिकण्यासारखे आहे. इस्लामने मानवतेला सर्व प्रकारच्या वांशिक संकुचित दृष्टिकोनातून मुक्त केले, त्याला आज बराच काळ लोटला आहे. आजसुद्धा इस्लामच जगाला या द्वेष व तिरस्काररुपी दलदलीतून बाहेर काढू शकतो. कारण इस्लाम मानवाच्या समानतेची एक सुंदर प्रतिमाच सादर करीत नाही तर व्यवहारी जगातही तो एक अशी समानता निर्माण करु दाखवून चुकला आहे, ज्यासारखे जगाच्या इतिहासात दुसरे कोणतेही उदाहरण आढळत नाही. इस्लामच्या या आदर्शकाळांत कोणत्याही काळ्या माणसाला गोऱ्या माणसावर, वर्ण अथवा वंशाच्या आधारावर कसलेही प्रभुत्व नव्हते. इस्लाम जवळ प्रमुखता व श्रेष्ठत्व यांचे एकमात्र साधन म्हणजे मानवाचा चांगुलपणा व त्याचा सदाचार आहे. म्हणूनच इस्लामने गुलामांना गुलामीच्या दैन्यावस्थेपासून मुक्ती प्राप्त करून दिली व त्यांना प्रगती व सुखांचा व्यापक संभवांची सूचनाही देऊन टाकली, येथपर्यंत की गुलामांना राष्ट्राध्यक्षपदावर बसविण्याचे अधिकारही स्वीकारण्यात आले. प्रेषित मुहम्मद (स) यांनी सांगितले,

'आपल्या अमीराचे (अध्यक्षाचे) म्हणणे ऐकून घ्या व त्यांचे आज्ञापालन करा. मग हा अमीर निग्रो गुलाम जरी असला तरी त्याच्या आज्ञेचे पालन करा जोवर तो तुम्हाला 'अल्लाह'च्या शरीअतीनुसार नेत आहे.'

## नागरी स्वातंत्र्याचा आदर

आणखी एका दृष्टिकोनातूनही इस्लामच्या गरजेकडे आजचे जग अनास्था दाखवू शकत नाही, साम्राज्यवाद व हुकूमशाहीच्या हाताने आजची मानवता जे कष्ट, क्लेश व दु:ख भोगीत आहे ज्या रानटीपणाचे व क्रोर्याचे भक्ष्य बनले आहे त्या पासून वाचण्याचा, सुटकेचा, इस्लामखेरीज दूसरा कुठलाही मार्ग दृष्टीस पडत नाही. इस्लामच मानवतेला साम्राज्यवाद व हुकूमशाहीच्या शापापासून सुटका करून देऊ शकतो, कारण तो साम्राज्यवाद व साम्राज्यवादी शोषणांचा अत्यंत विरोध करणारा आहे. आपल्या उत्कर्षकालामध्ये मुस्लिमांचे इतर राष्ट्रांशी व्यवहार इतके औदार्यपूर्ण, श्रेष्ठ व सभ्यतापूर्ण होते की आजच्या युरोपाची संकुचित दृष्टीसुद्धा त्याची उंच भरारी पाहू शकते.

या संदर्भात आदरणीय उमर बिन खत्ताब (र) यांनी न्यायदानात केलेल्या एका सुप्रसिद्ध निवाड्याचे उदाहरण सादर केले जाऊ शकते. या प्रकरणात एका इजिप्शियन आदिवासीला विनाकारण मारहाण करण्याच्या व छळ करण्याच्या आरोपावरुन ज्याने इजिप्त जिंकले होते, तो प्रसिद्ध विजेता व प्रतिष्ठित गव्हर्नर आदरणीय अमर बिन आस (र) यांच्या चिरंजीवाला फटक्यांची शिक्षा दिली होती, किंबहूना त्याच्या बापालाही अशी शिक्षा देण्यास तयार झाले होते. या एका उदाहरणावरुन हे सहज अनुमान केले जाऊ शकते की इस्लामी राज्यात नागरिकांना किती मोठ्या प्रमाणात नागरी स्वातंत्र्य होते.

## भांडवलशाहीचा शाप

आज भांडवलशाही पद्धतीचा जो शाप जगावर पसलरेला आहे, ज्यामुळे सारे जीवन विषारी बनले आहे; त्यापासून सुटकेचा मार्गही इस्लामखेरीज अन्य कुठलाही नाही. व्याज घेणे, नफाखोरी हा भांडवलशाही पद्धतीचा पाया असून इस्लाम या दोहोंचा अत्यंत तीव्र विरोध करतो व त्यांना वर्ज्य घोषित करतो. दुसऱ्या शब्दांत याचा अर्थ असा की आजच्या जगात भांडवलशाहीने निर्माण केलेले अनुभव व दोष फक्त इस्लामच दूर करु शकतो.

## साम्यवादाचा उच्छेद

याचप्रमाणे भौतिकवादी व नास्तिकवादी साम्यवादाचे उच्छेदनही केवळ इस्लामच्या हस्तेच संभवनीय आहे. कारण इस्लाम केवळ पूर्ण सामाजिक न्याय स्थापन करुन त्याला टिकवून धरतो, तेवढेच तो उच्च मानवी तसेच आध्यात्मिक मूल्यांचे रक्षणही करतो. कारण तो साम्यवादाप्रमाणे कसल्याही प्रकारच्या संकुचित दृष्टीस बळी बनलेला नाही व त्याचे जग ज्ञानेंद्रियांनी जाणवणाऱ्या वस्तूपर्यंतच मर्यादित नाही. आपल्यात हे सर्व गुण असूनसुद्धा, इस्लाम आपली कुठलीही गोष्ट जबरदस्तीने लादून त्याला ती मानण्यास भाग पाडीत नाही. कारण धर्माच्या व श्रद्धेच्या बाबतीत तो आरंभीपासूनच कसल्याही जबरदस्तीशी सहमत नाही व मानत नाही. याबाबतीत त्याचा नियम असा आहे की -

"धर्माच्या बाबतीत कसलीही जुलूम-जबरदस्ती नाही. सत्य गोष्ट चुकीच्या विचारापासून वेगळी काढून ठेवली गेली आहे." (२:२५६)

या वेळी जगावर तिसऱ्या विश्वयुद्धाचे अंधकारपूर्ण ढग पसरलेले आहेत, ते दूर होण्यासाठीही इस्लामरुपी सूर्योदय होण्याखेरीज अन्य कुठलाही मार्ग दिसत नाही. पण हे त्याचवेळी शक्य आहे जेव्हा मानवजात इस्लामला आपल्या जीवनाचा मार्गदर्शक बनवून खऱ्या सुखशांतीच्या या मार्गाचा अंगीकार करण्यास तयार होईल.

तात्पर्य असे की इस्लामचा काळ संपलेला नसून तो आता सुरु झाला आहे. हा कुठलाही मृत दृष्टिकोन नसून ही क्रांतीपूर्ण जीवनपद्धती आहे. याचा भविष्यकाल तेवढाच उज्वल आहे जितका त्याचा भूतकाल वैभवशाली होता व युरोप त्या वेळी इतिहासाच्या काळोखात कालखंडात धडपडत, चाचपडत होता.

प्रकरण दुसरे

# इस्लाम आणि भांडवलशाही

भांडवलशाही पद्धत ही इस्लामी जगताची निर्मिती नसून ती युरोपची निर्मिती आहे. योगायोगाने युरोपमध्ये आविष्कार पावलेल्या यंत्राच्या आगमनाचे ते फळ होते व तेच जगातील इतर भागांत पसरले.

## इस्लाम भांडवलशाहीचे समर्थन करतो काय?

इस्लामी जगताचा जेव्हा भांडवलवादाशी परिचय झाला, त्या वेळी युरोपची विशेष छाप भांडवलवादावर पूर्णपणे पडली होती. दुसरीकडे इस्लामी जगताची अधोगती जोरात चालू होती व तीत सर्व प्रकारचे अज्ञान, हलाखी व मागासलेपणाची चिन्हे स्पष्ट दिसत होती. भांडवलशाहीची आयात झाल्यामुळे इस्लामी जगतात काही भौतिक प्रगती झाली जिच्यामुळे काही लोकांचा असा भ्रम झाला की इस्लाम भांडवलशाही पद्धतीचा समर्थक आहे. भांडवलशाहीच्या प्रचलित स्वरुपाला तिच्या सर्व दोषासहित अंगीकार करणे, कोणतीही वाईट गोष्ट नाही, असे ते समजतात. कारण भांडवलशाहीची इस्लामच्या कोणत्याही मूळ सिद्धान्ताशी व कायद्याशी टक्कर होत नाही अथवा संघर्ष होत नाही. उलट इस्लाममध्ये व्यक्तींना स्वत:ची संपत्ती करण्याचा जो हक्क प्राप्त आहे, तो या गोष्टीचा उघड पुरावा आहे की इस्लाम भांडवलशाही पद्धतीविरुद्ध नाही.

सत्य असे आहे की हा इस्लामवर एक फार मोठा आरोप आहे. यांच्या उत्तरादाखल आम्ही भांडवलवादाच्या समर्थकांना असे सांगू इच्छितो की भांडवलशाही पद्धत ही व्याज देण्याघेण्याच्या व्यवहारावर व एकाधिकार पद्धतीच्या मूळ पायावर उभारली जाते, परंतु इस्लाम या दोन्हीविरुद्ध आहे. त्याने आजपासून हजारो वर्षांपूर्वी त्याना निषिद्ध ठरविण्याची व त्यावर बंदी घालून मनाई करण्याची उघडपणे घोषनाही करुन टाकली. केवळ ही एकच गोष्ट इस्लाम व भांडवलशाही यामधील खोल सैद्धान्तिक व मौलिक भेद यांचे स्पष्टीकरण करण्यास पुरेशी आहे.

## इस्लामी जगतात यंत्राचा शोध लागला असता तर...

क्षणभर सखोलपणे या समस्येचा कसल्याही परिस्थितीत आढावा घेऊ या व असे पाहू की यंत्राचा शोध इस्लामी जगतात लागला असता व त्याचे फलस्वरुप जो आर्थिक विकास व प्रगती झाली असती तर तिच्या बाबतीत इस्लामचा व्यवहार कसा असता व श्रम तसेच उत्पादनाची योजना करताना कशा प्रकारचे कायदे व विधाने अस्तित्वात आली असती?

## भांडवलशाहीचा आरंभीचा काळ

अर्थशास्त्रज्ञांचे यावर एकमत आहे, किंबहुना कार्ल मार्क्ससारख्या भांडवलशाहीच्या कट्टर शत्रूनेही ही गोष्ट मान्य केली आहे की आरंभीच्या काळात भांडवलशाही पद्धतीमुळे मानवतेचा फार मोठा फायदा झाला. तिच्यामुळे जगाला प्रगतीची नवनव्या क्षितिजांचा

परिचय झाला. भौतिक उत्पादनात वाढ झाली, दळणवळणाची साधने अधिक चांगली झाली, मोठ्या प्रमाणावर राष्ट्रातील सर्व साधनांचा उपयोग केला गेला व श्रमिकवर्गाच्या राहणीमानाची पातळी केवळ कृषी व्यवसायावर अवलंबून असलेल्या पूर्वीच्या श्रमिकांच्या राहणीमानापेक्षा अधिक उंचावली.

## बिघाडांची सुरुवात

परंतु भाडवलवादाचे हे युग शीघ्रतेने संपले, कारण असे की स्वाभाविक प्रगतीच्या परिणामस्वरुप संपत्ती हळूहळू एकत्रित होऊन काही भांडवलशहांच्या हातात आली व गरीब लोक तसेच श्रमिकवर्ग यांची मालमत्ता व संपत्ती नष्ट झाली आणि आपल्या सर्वस्वापासून ते वंचित झाले. यामुळे भांडवलदारांना मजूर मिळविणे सोपे झाले. याच मजुरांच्या श्रमामुळे त्यांच्या व्यापारात व संपत्तीत अमर्याद वाढ झाली. असे असूनही त्यांनी श्रमिकांच्या मजुरीमध्ये कसलीही वाढ केली नाही. कम्युनिष्टांचे तर असे म्हणणे आहे की भौतिक संपत्तीचे उत्पादन केवळ श्रमिकच करतो. श्रमिकांच्या मजुरीचा दर इतका कमी होता की त्यामध्ये ते चांगल्या रितीचे व सन्मानजनक जीवन जगू शकत नव्हते. त्यांच्या श्रमापासून जो नफा मिळत असे, तो सर्व भांडवलदार गिळंकृत करीत असत व आपल्या चैनविलासाखातर व ऐषआरामाखातर तो उधळून टाकीत असत.

## भांडवलशाहीचे दुष्परिणाम

श्रमिकवर्गाच्या मजुरीचे दर कमी असण्याचा परिणाम असा झाला की या भांडवलशाहीप्रणीत देशातील लोकांची उत्पादन शक्ती घटली व त्यांनी उत्पादन केलेल्या मालाचे ढीग तसेच पडून राहू लागले. म्हणून आपला माल खपविण्यासाठी भांडवलदारांनी नवनवीन बाजारपेठा शोधण्यास आरंभ केला व त्या शोधून काढल्या. या शोधामुळे वसाहतवादाचा जन्म झाला. तसेच कच्च्या मालासाठी आंतरराष्ट्रीय चढाओढ निर्माण झाली व पुढे जाऊन तर्कशास्त्राच्या अटळ निष्कर्षानुसार सर्वनाश करणाऱ्या लढाया व युद्धे यांची अधिकता झाली.

## बाजारपेठेत सतत मंदी

हेच कारण आहे की भांडवलवादी पद्धतीला सतत मंदीच्या भयाने ग्रासलेले असते व अशी मंदी, अपुरे मजुरीचे दर व वाढते उत्पादन यामुळे मालाला मागणी कमी झाल्याने होत असते. म्हणूनच काही काळानंतर राहून राहून भांडवलशाही पद्धत सतत या वस्तुस्थितीला बळी पडत आली आहे.

## कमजोर युक्तिवाद

काही भौतिकवादी लेखकांचे असे म्हणणे आहे की हे सारे दोष संपत्तीचे स्वाभाविक अवगुण आहेत. जेथे संपत्ती असेल तेथे हे दोष असणारच. ते दोष असण्याचा व भांडवलदारांच्या दुष्ट

हेतूशी व त्यांच्या अनुचित शोषणाच्या लालसेशी, कसलाही संबंध नाही. हा निष्कर्ष इतका फोल आहे की तो जरा मानला तर असे मानावे लागेल की बौद्धिक शक्ती व विचारांचे सर्व प्रकारच्या बळांनी सुसज्ज असूनसुद्धा माणूस आपल्या आर्थिक परिस्थितीच्या व घडामोडीच्या अधीन असून त्यांच्यासमोर तो हतबल आहे.

## इस्लामचे तत्व, समान लाभ

भांडवलशाही पद्धतीच्या सुरुवातीच्या काळांत तिच्यापासून मानवतेला जो लाभ झाला व जी भौतिक प्रगती, विकास व समृद्धी झाली, इस्लाम त्यापैकी कशाचाही निषेध करीत नाही. तसेच तो त्यापैकी कशाच्याही विरुद्ध नाही. परंतु जरी इस्लामी जगतात भांडवलशाही असती तरी इस्लामने त्यांना असे मोकळे सोडले नसते. उलट असे कायदे व नियम केले असते की ज्यामुळे अनुचित शोषणास कसलाही वाव राहिला नसता व त्याची भीती राहिली नसती. मग ते शोषण भांडवलदाराच्या दुष्ट व स्वार्थी हेतूने असो किंवा संपत्तीच्या अटळ स्वाभाविक व उपजत अवगुणामुळे असो. म्हणूनच या संदर्भात इस्लामने आम्हाला जो सिद्धान्त दिलेला आहे, त्यानुसार भांडवलदाराबरोबर मजुरांनाही नफ्याचा वाटा मिळावयास हवा. म्हणून इमाम मालिक (र) तर मजुरांना नफ्यात मालकाइतका समान हक्क असल्याचे समजत होते. कारण उत्पादन करण्यामध्ये भांडवलदाराच्या भांडवलास जेवढे श्रेय आहे तेवढेच श्रेय व हिस्सा मजुराच्या श्रमाचाही आहे, याकरिताच नफ्यामध्ये दोघांना समान हिस्सा मिळायला पाहिजे.

इस्लामी 'फ़िक़ह' (धर्मशास्त्र) च्या या सिद्धान्ताने हे स्पष्ट होते की सामाजिक न्याय स्थापन करण्यामध्ये इस्लामला किती खोल स्वारस्य आहे, पण सामाजिक न्याय स्थापन करण्याची ही प्रेरणा इस्लाममध्ये कोणत्याही भौतिक आवश्यकतेमुळे अगर विवशतेमुळे अथवा वर्गीय संघर्षामुळे (ज्याला काही लोक आर्थिक संबंधाचे व संपर्काच्या विकासाचे व प्रगतीचा एकमात्र प्रभावशाली प्रेरक तत्त्व मानतात.) यांचे परिणामस्वरुप वाढली नसून ती पूर्णपणे त्याच्या अंतर्गत आंदोलनाचेच फळ होते.

आरंभीच्या काळात उद्योगधंदे अगदी सरळ व सोपे होते. शक्यतो आपली सर्व कामे लोक हातानेच करीत असत. इस्लामच्या वर दर्शविलेल्या नियमाच्या उजेडात, जर त्या काळी श्रम व भांडवल या दरम्यानचे नाते सुदृढ केले गेले असते तर त्यांना एक न्यायोचित आधार मिळाला असता व युरोपात निर्माण झालेले दोष त्यांच्यात निर्माण झाले नसते.

## व्याजावर चालणाऱ्या बँका व कर्जे

अर्थशास्त्रज्ञ आम्हाला असे दर्शवितात की भांडवलशाही पद्धत जेव्हा आपल्या प्रारंभीच्या 'चांगल्या काळातून' निघून आपल्या प्रस्तुत 'वाईट काळात' दाखल झाली, तेव्हा राष्ट्रीय कर्जावर त्याचा आधार जास्त वाढला. म्हणून बँका स्थापन झाल्या व त्यांनी आपला व्यवहार अशा तऱ्हेने

सुदृढ केला की त्या व्याज घेऊन शासनाकरिता कर्जे गोळा करु लागली. बँकाच्या व्यवहारातील आर्थिक व तांत्रिक पेचामध्ये न पडता आम्ही वाचकासमोर जे सत्य ठेवू इच्छितो, ते केवळ इतकेच आहे की ही कर्जे व बँकांचा अधिकांश व्यवहार व्याजाच्या आधारावर चालला आहे, ज्याची इस्लामने स्वच्छ व स्पष्ट शब्दात मनाई केली आहे.

## भांडवलशाही पद्धतीचा दुसरा आधार

भांडवलशाही पद्धतीचे दुसरे वैशिष्ठय म्हणजे व्यवहारातील जबरदस्त चढाओढ आहे. या चढाओढीच्या परिणामस्वरुप छोटे छोटे व्यवहार करणाऱ्या संस्था नष्ट होऊन जातात, अथवा त्या सर्व एकत्र मिळून मोठमोठ्या व्यवहारी संस्था स्थापन करतात. असे करुन इतर संस्थांच्या चढाओढीत काम करु शकतात. येथूनच एकाधिकाराचे आस्तित्व उदयास येते, परंतु इस्लाम या एकाधिकार पद्धतीचाही विरोध करतो. म्हणून इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांनी सांगितले आहे की,

"एकाधिकार स्थापन करणारे पापी आहेत." (मुस्लिम, अबूदाऊद, तिर्मिजी)

भांडवलशाही पद्धतीचे हे दोन पायाभूत आधार आहेत. या दोन्हींचा सैद्धान्तिक दृष्टीने इस्लाम विरोध करतो व अशा विरोधानंतर इस्लाम भांडवलशाही पद्धतीचा विरोध असण्यात काही संशय उरत नाही. जर भांडवलशाही पद्धत इस्लामच्या कृपाछत्राखाली वाढली असती, तर तिचे आधुनिक 'वाईट काळाचे' दोष प्रकट झाले नसते व भांडवलशाही पद्धत याप्रकारे अयोग्य शोषण वसाहतवाद तसेच युद्धे व सर्वनाश या सर्वांचा पर्याय होऊन राहिली असती.

## इस्लामी जगतात जर औद्योगिक क्रांती आली असती तर इस्लामने तिचे स्वागत कसे केले असते?

पहिली गोष्ट अशी आहे की जर इस्लामी जगतात औद्योगिक क्रांती झाली असती तर इस्लामला आपणाला अनुरुप असे तिचे स्वरुप करण्यास कोणताही पेच पडला नसता. तो उद्योगधंद्याना छोट्या छोट्या कारखान्यापर्यंतच मर्यादित ठेवण्याचा आग्रह केला नसता. या कारखान्याचे मालक व मजूर यांनी आपसात नफ्याचा वाटा वाटून घेतला असता. उलट इस्लामी अंमलाखाली उत्पादन वाढले असते. परंतु मालक व मजूर यांच्यातील संबंधाचे स्वरुप १९ व्या २० व्या शतकात युरोपात आढळते तसे मालक व मजुराचे संबंध आम्ही वर इशारा केल्याप्रमाणें या सिद्धान्ताच्या आधारावर ठेवले गेले असते व हा सिद्धान्त मालकांना तसेच मजुरांना नफ्यामध्ये समसमान हक्क असल्याचे घोषित करतो.

या इस्लामी पद्धतीची अंमलबजावणी केल्यावर व्याज व एकाधिकार पद्धती अगदी संपुष्टात येते व श्रमिकांना त्या अन्यायाला, हलाखीला व विषमतेला तोंड द्यावे लागले नसते. अशा अवस्थांना त्यांना युरोपच्या भांडवलशाही पद्धतीमध्ये वेळोवेळी तोंड द्यावे लागते.

## कम्युनिस्टांच्या प्रतिपादनाचे व दाव्यांचे खंडन

या प्रकारच्या सामाजिक न्यायाच्या स्थापनेसाठी इस्लामला कम्युनिझमप्रमाणेच कसोट्या, वर्गीय संघर्ष व आर्थिक दडपण यांना अटळपणे तोंड द्यावे लागले असते व त्यानंतर त्याच्या कायद्यामध्ये आपोआपच काही फेरबदल झाला असता, असा इस्लामसंबंधी विचार एक मूर्खपणा आहे. आम्ही अगोदरच हे दाखविले आहे की इस्लामला, गुलामी, जहागिरी व प्रारंभिक भांडवलवादी समस्या उकलण्यात व तिची सोडवणूक करण्यात जगातील इतर सर्व पद्धतीपेक्षा श्रेष्ठत्व प्राप्त झाले आहे. इस्लामने येऊन जितक्या सुधारणा केल्या त्यांची प्रेरणा एखाद्या बाह्य दडपणाखाली कदापिही नव्हती. उलट त्यापाठीमागे इस्लामचे आपले सत्य व न्याय यांचे शाश्वत नियम कार्यान्वित होते, ज्यांचा उपहास कम्युनिस्ट लेखक आपल्या लेखात सरावाने करीत असतात. याउलट सत्य असे आहे की ज्याला आदर्श कम्युनिस्ट देश म्हटले जाते तो रशियासुद्धा स्वत: जहागिरदारी काळातून बाहेर पडल्यानंतर पुढील टप्प्यात म्हणजे भांडवलशाहीच्या काळातून गेल्याविना कम्युनिझमच्या युगात दाखल झाला. जणूकाही रशिया, जो कार्ल मार्क्सच्या तत्त्वांचा प्रचार करतो, स्वत: आपल्या प्रत्यक्ष व्यावहारिक उदाहरणाने कार्ल मार्क्सच्याच खालील दृष्टिकोनाचे त्याने खंडन केले आहे की प्रत्येक मानवी समाज आपली प्रगती करताना अनिवार्यपणे काही प्रमुख काळातूनच त्याला जावे लागते.

## इस्लाम व वसाहतवादी पद्धत

वसाहतवादी पद्धत, युद्धे इतर जातींचे शोषण व भांडवलशाही पद्धतीने निर्माण केलेले आणि जगभर पसरलेल्या दोषांच्या संबंधी इस्लाम या सर्वांच्या विरुद्ध आहे. आपल्या वसाहती स्थापन करण्यासाठी अथवा इतरांना आपल्या स्वार्थाचे साधन बनविण्याच्या त्यांच्या उद्देशाशी त्यांच्याविरुद्ध युद्ध करणेसुद्धा इस्लामला पसंत नाही. इस्लाम केवळ एकाच युद्धाला अनुमती देतो व ती म्हणजे अत्याचार व दडपशाहीच्या विरुद्धचे युद्ध. शांततापूर्ण उपायांचा अंगीकार करण्याच्या मार्गात अडसर होण्याच्या स्थितीत सत्याचा व न्यायनिष्ठा उंचावण्याकरिता जिहाद.

## एक निराधार कल्पना

कम्युनिस्ट व त्यांचे समर्थक वसाहतवादी पद्धत मान, प्रतिष्ठा व प्रगतीचा एक अनिवार्य टप्पा समजतात, वसाहतवादी पद्धत ही शुद्ध आर्थिक समस्येच्या रुपात प्रकट झाली. प्रगतीशील देशात औद्योगिक उत्पादनामध्ये अधिक वाढ झाली. हा उत्पादित झालेला माल खपविण्यासाठी परदेशी बाजारपेठांच्या गरजेच्या भावनेतूनच ती निर्माण झाली. म्हणून हे माणसाच्या प्रगतीचे एक अनिवार्य आर्थिक प्रदर्शन आहे, ज्याला कोणत्याही नैतिक दृष्टिकोनातून अथवा सिद्धान्ताचे सहाय्य घेऊन ती निर्माण होणेही रोखले जाऊ शकत नाही व ती टाळलीही जाऊ शकत नाही.

## एक प्रश्न

येथे आम्हाला या गोष्टीचा पुनरुच्चार करण्याची गरज नाही, की इस्लाम वसाहतवादी पद्धतीच्या संदर्भात हे कथित विचार कदापिही मान्य करीत नाही की वसाहतवाद हा मानवी प्रगतीचा एक अनिवार्य टप्पा आहे. कम्युनिझमला पाठिंबा देणारे असाही दावा करतात की रशिया आपल्या उत्पादनवाढीची समस्या, कामगारांची कामाची वेळ कमी करुन तसेच उत्पादनात मानवी श्रमाची बचत करुन तिची सोडवणूक करुन घेईल. प्रश्न असा आहे की जर कम्युनिस्ट रशिया त्याने शोधून काढलेल्या मार्गाच्या सहाय्याने या प्रश्नाची सोडवणूक करु शकतो तर इतर पद्धती त्याचेच सहाय्य घेऊन आपल्या समस्या का सोडवू शकत नाही? त्यांना वसाहतवादी पद्धतीच्या टप्प्यातून जाणे का भाग पडत आहे व ते का अनिवार्य आहे?

## एक जुनी समस्या

इतिहास या गोष्टीची साक्ष देतो की वसाहतवादी पद्धत ही मानवी स्वभावधर्माचा एक फार जुना कमकुवतपणा आहे. तिची सुरुवात भांडवलशाहीच्या कृपाछत्राखाली झाली नाही. तरी आधुनिक प्राणघातक हत्यारांनी सजलेले हे भांडवलवादी येथे येऊन, तिचे शोषण पहिल्यापेक्षा अधिकच वाढविले. जिथे भयभीत जातींच्या अनुचित शोषणाच्या संदर्भात प्राचीन युगातील रोमन वसाहतवादी साम्राज्य, आधुनिक युरोपियन साम्राज्यापेक्षा कोणत्याही दृष्टीने व दर्जाने मागे नव्हते.

## इस्लाम व शोषण

इतिहास आम्हाला हेही दाखवितो की युद्धांच्या संदर्भात 'इस्लाम' जगातील सर्वांत पवित्र पद्धत आहे. इस्लामी युद्धाच्या कारणस्वरुप कधीही एखाद्या जातीला शोषणाचे लक्ष्य केले गेले नाही व तसेच कोणावर धिक्कारणीय गुलामीही लादली नाही. यावरुन हे सिद्ध होते की इस्लामी जगतामध्ये औद्योगिक क्रांती आली असती तर उत्पादन वाढीची समस्या इस्लामने शांततेच्या मार्गाने सोडवून घेतली असती व हा उद्देश साध्य करण्यासाठी जगाला युद्धाच्या खाईत झोकून देण्याची गरजही इस्लामला भासली नव्हती. तसेच वसाहतवाद व वसाहतवादी साम्राज्य लादण्याचीही गरज भासली नसती. उत्पादन वाढीची समस्याही भांडवलशाही पद्धतीच्या बिघडलेल्या आधुनिक रुपाची देणगी आहे, हेच सत्य आहे. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे जर भांडवलशाहीचे महत्त्वाचे सिद्धान्त बदलले गेले तर उत्पादन वाढीची समस्या मुळातच निर्माण होणार नाही.

## संपत्तीचा संचय व इस्लाम

भांडवलशाही पद्धतीमध्ये, शासन संपत्तीच्या संचयाच्या बाबतीत अगदी विवश व असहाय्य असते. परंतु इस्लामी पद्धतीत शासन या बाबतीत असे असहाय्य व उदास प्रेक्षक होत नाही. उलट या गोष्टीची हमी देतो की संपत्तीचा अशा तऱ्हेने संचय होऊन ती अशा तऱ्हेने काही

कुटुंबामध्येच मर्यादित राहू नये व इतर सर्व देश दारिद्र्याला व हलाखीला बळी पडू नये. अशी अवस्था निर्माण होणे इस्लामी शरिअतच्या मनिषेविरुद्ध आहे. कारण तिची अशी इच्छा आहे की संपत्तीचा संचय काही लोकापुरताच मर्यादित न राहता, तिचा इतका प्रसार व्हावा की सर्व लोकांना तिचा लाभ मिळावा. इस्लाममध्ये शासनाचे हे कर्तव्य असते की त्याने जुलूम व जबरदस्ती न करता इस्लामी शरीअत त्यांच्यावर लागू करावी. या उद्देशासाठी त्याला अल्लाहने ठरविलेल्या मर्यादेत राहून, पर्याप्त अधिकार मिळालेले असतात, जेणेकरून त्याने ईश्वराचा तो कायदा लागू करावा. तो कायदा लागू झाल्यानंतर संपत्ती फक्त काही लोकांच्याच हातात साठून राहू शकत नाही. इस्लामचा वारसा कायदा इस्लामी शरिअतचा हाच गुणधर्म दाखवितो ज्याची मागणी अशी आहे की एका वंशाने आपल्या पश्चात जी धन व संपत्ती मागे ठेवली आहे, तिचे वाटप यथोचित तऱ्हेने नंतरच्या वारसांमध्ये व्हावे. हीच अवस्था जकातची आहे. जकातमध्ये वार्षिक उत्पन्नाच्या व नफ्याच्या अडीच टक्के हिस्सा गरिबांच्या कल्याणाकरिता दान म्हणून ठरविला जातो. याशिवाय इस्लाम उघड व स्पष्ट शब्दांत धनसंचय करण्यास मनाई करतो व त्याचबरोबर व्याजाची पद्धत ही धनसंचयाला कारणीभूत होते, तिलासुद्धा निषिद्ध ठरवितो. एवढेच नसून इस्लाम समाजातील भिन्न भिन्न व्यक्तींच्या परस्परांतील संबंधाना परंपरागत शोषणाऐवजी आपसातील जबाबदारीच्या मूळ आधारावर ठेवून त्यांना मजबूत करतो.

## जीवनातील मूलभूत गरजांची हमी

येथे ही गोष्ट समजून घेतली पाहिजे की प्रेषित मुहम्मद (स) यांच्या कथनानुसार, इस्लामी राज्यातील कर्मचाऱ्यांच्या जीवनावश्यक मूलभूत गरजा भागविण्यासाठी त्या सर्व वस्तु गोळा करण्याची जबाबदारी शासनावर असते, म्हणून त्यांचे सांगणे असे आहे की,

"जी व्यक्ती आपल्या (अर्थात इस्लामी राज्याच्या) एखाद्या सेवेतर नेमलेली जर अविवाहित आहे तर त्या व्यक्तीचा विवाह केला जाईल. जर त्याला राहावयास घर नसेल, तर घर दिले जाईल, त्याच्याकडे चाकर नसतील तर चाकर दिला जाईल व जर स्वारीकरिता त्याच्याकडे जनावर नसेल तर स्वारीकरिता जनावरही दिले जाईल."

जीवनावश्यक मूलभूत गरजांची ती हमी राज्याच्या कर्मचाऱ्यांपुरती मर्यादित नाही. कारण यावर प्रत्येक माणसाच्या जीवनावश्यक गरजा आहेत. इस्लामी राज्याची अथवा कोणत्याही समाजाची सेवा कोणत्याही श्रेणीत करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला ते मिळविण्याचा हक्क आहे. म्हणूनच जे लोक वार्धक्यामुळे, आजारामुळे अथवा अपंगत्वामुळे स्वत: आपले अन्न मिळविण्यास अगर कमाई करण्यास अपात्र असतात त्यांना याच कारणासत्व इस्लामी राज्य सरकारी खजिन्यातून या सर्व व्यक्तीच्या खर्चाचा भार सहन करीत असते. त्याचप्रमाणे ज्यांची उत्पन्नाची साधने मर्यादित असतात व ज्यांची कमी असतात अशांनाही सरकारी खजिन्यातून अशाच तऱ्हेचे आर्थिक सहाय्य दिले जाते.

ही सर्व सत्ये असे सिद्ध करतात की इस्लामी राज्य आपल्या राज्यात राहणाऱ्या सर्व माणसाच्या जीवनावश्यक मूलभूत गरजांच्या वस्तू गोळा करण्यास बांधील असते. हा उद्देश साध्य करण्यासाठी ते ज्या कार्यपद्धतींचा व कायद्यांचा अंगीकार करते ती जास्त महत्त्वाची नाहीत, मूळ महत्त्व जे आहे ते इस्लामी राज्याच्या त्या मूळ तत्त्वाचे आहे, तो राष्ट्रातील नफ्यात व तोट्यात राज्यातील सर्व व्यक्तींना समान रितीने भागीदार ठरवितो. यामुळे कर्मचारी व मजूर केवळ इतरांच्या शोषणापासून वाचतात एवढेच नाही तर उलट स्वच्छ व निर्मळ जीवनही व्यतीत करु शकतात.

इस्लामच्या कृपाछत्राखाली भांडवलशाहीचे असे किळसवाणे स्वरुप निर्माणच होऊ शकत नव्हते, जे आज 'सभ्य' पाश्चिमात्यांच्या भांडवलशाही पद्धतीत दिसून येते. इस्लामी शरिअतच्या कोणताही कायदा मग तो इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) कडून घेतला गेला असो वा नंतरच्या परिस्थितीच्या निकडीनुसार शरिअतच्या मर्यादेत राहून 'इज्तिहाद' (निर्णय) करुन केलेला असो, भांडवलशाहांना अशी परवानगी देत नाही की धन्याच्या लोभाखातर त्याने श्रमिकांचा बळी द्यावा. इस्लाममध्ये भांडवलशाहीची धिक्कारणीय परिणती जसे वसाहतवादी साम्राज्यवादी युद्धे व गुलामी वगैरे, कधीही डोके वर काढू शकत नाहीत.

## एक समतोल जीवनपद्धत

आर्थिक बाबतीत इस्लाम केवळ चांगले कायदे करण्यालाच पुरेसे मानत नाही तर उलट त्याच्याबरोबर तो माणसातील नैतिक व आध्यात्मिक भावनांना आवाहन करतो. याच भावनांची कम्युनिस्ट असे म्हणून त्यांची टर उडवितात की त्याची व्यवहारी उपयुक्ततेची कोणतीही लक्षणे युरोपच्या इतिहासात बिल्कुल आढळत नाहीत. कसल्याही अवस्थेत, इस्लाममध्ये नैतिक व आध्यात्मिक मूल्य माणसांच्या व्यवहारी जीवनापासून वेगळी होत नाहीत. या दृष्टीने इस्लाम एक वैशिष्ट्यपूर्ण जीवनपद्धत आहे की तो आत्म्याचे पावित्र्य व सामाजिक संगठन यांना एकमेकात सुसंबद्ध करुन त्यांना एक रुप देतो. तो समाजाकडे डोळेझाक करीत नाही, तसेच व्यक्तीलाही असे म्हणून वाऱ्यावर सोडत नाही की तत्व व व्यवहार यांचा समन्वय साधने त्याला अशक्य आहे. इस्लामच्या कायद्याचा मूळ पाया नैतिकपणावर उभारलेला असतो. याच कारणामुळे इस्लाममध्ये कायदा व नैतिकपणा यामध्ये कधीच झुंज वा संघर्ष होत नाही, उलट ते एकमेकांत समरस होतात. खांद्याला खांदा जोडून वाटचाल करतात व एकातील उणीव दुसरा भरुन काढतो. त्यांच्यात संघर्षाची अथवा झुंजीची अवस्था कधीही निर्माण होत नाही.

## भोगविलास व संपत्तीचा अपव्यय यावर बंधने

संपत्तीचा संचय काही लोकांजवळ झाल्याने अटळपणे होणारी फलनिष्पत्ती, अर्थात भोगविलासाची लालसा, वासना इस्लामच्या नैतिकदृष्टीने मुळातच वैध अगर कायदेशीर

नाहीत. या सर्व गोष्टी वर्ज्य असल्याचे इस्लाम घोषित करतो. त्याचबरोबर तो मालकांना ताकीद देतो की त्यांनी आपल्या चाकरांशी अन्याय करु नये, व त्यांच्या श्रमाच्या रास्त मोबदल्यात कसलीही कपात करु नये, व त्यांना त्यांचा हक्क पुरेपूर द्यावा. संपत्तीचा संचय हेच श्रमिकावरील अन्याय, शोषण व अत्याचाराचे एक स्वरुप आहे. म्हणून अन्याय नष्ट होण्यासाठी त्यांच्यावरही प्रतिबंध आवश्यक आहेत. या कारणाकरिताही इस्लाम संपत्ती संचयाविरुद्ध आहे. इस्लाम लोकांमध्ये ईश्वरीमार्गात संपत्ती खर्च करण्याची अशी भावना जागृत करतो की त्याकरिता आपले सर्वस्व जरी लुटले गेले तरी हरकत नाही. इस्लामी समाजातील सुस्थितीतील लोक ईश्वराखातर इतरांवर संपत्ती खर्चतात. तेथे दारिद्रय व हलाखी स्वार्थ लोलुपतेपासून उत्पन्न होतात व त्यामुळेच समाजातील संपन्न व समृद्ध व्यक्ती आपली सर्व धनसंपत्ती केवळ स्वत:च्या चैनीसाठीच खर्च करतात.

## आध्यात्मिक श्रेष्ठत्व व ईश्वराचे सान्निध्य

याशिवाय इस्लाम माणसांना इतक्या आध्यात्मिक उंचीप्रत नेऊ इच्छितो की तेथे पोचल्यावर त्यांना ईश्वराचे सानिध्य प्राप्त होते, तसेच अल्लाहच्या प्रसन्नतेच्या प्राप्तीसाठी व परलोकातील फायद्यासाठी, ते हलाखी व नष्टचर्यही सहन करतात. अल्लाहची प्रसन्नता मिळविणारा तसेच परलोक व त्यातील शिक्षेवर तसेच पुण्यफलांवर श्रद्धा बाळगणारा माणूस, कधीही संचयरुपी रोगाला बळी पडूच शकत नाही. तसेच आपल्या उद्दिष्टांच्या पुर्ततेकरिता इतरावर कधीही जुलूम, अत्याचार व शोषण करु शकत नाही.

## कायद्याचे स्वेच्छेने बंधन

इस्लाम माणसाला ज्या आध्यात्मिक उंचीप्रत पोचवतो, त्यामुळे अशा प्रकारचे आर्थिक कायदे करणे सुलभ होते, ज्यामुळे भांडवलवादी पद्धतीतील सर्व दोषांचे निर्मूलन शक्य होते. म्हणून इस्लामी समाजात जेव्हा प्रत्यक्षात कायद्यांची अंमलबजावणी केली जाते, तेव्हा समाजातील सर्व व्यक्ती त्यावर खुशीने आचरण करतात. त्यांच्या अशा आचरणाची प्रेरणा शिक्षेच्या धाकापासून नसून त्यांची अशी भावना व धारणा असते की अंतरात्म्याची जी मागणी असते तीच कायद्याची निकडही असते.

## शेवटची गोष्ट

शेवटी आम्ही ही गोष्टही स्पष्ट करु इच्छितो की वर्तमान काळातील इस्लामी जगतावर, भांडवलशाही पद्धतीचे जे किळसवाणे स्वरुप आज प्रभावशाली आहे, त्यांचा व इस्लामी पद्धतीचा लांबचाही कसला संबंध नाही. म्हणून त्यांच्याद्वारा फैलावलेल्या देशात इस्लामला कसल्याही रितीने जबाबदार ठरविता येणे शक्य नाही.

**प्रकरण तिसरे**

# इस्लाम व खाजगी मालमत्ता

खाजगी मालमत्ता ही माणसाची एक स्वाभाविक भावना आहे काय? कम्युनिस्ट या प्रश्नाचे नकारात्मक उत्तर देतात व असा दावा करतात की मानवाच्या प्रारंभिक युगांत कम्युनिझमचा काळ होता. या युगात माणसांच्यां खाजगी मालमत्तेचा निर्देश आढळत नाही. त्याकाळी सर्व वस्तू सार्वजनिक व समाईक मालमत्ता असत व तिचा उपभोग सर्वजण सहभागाने करीत असत. त्यांच्यात प्रेम, सद्भाव व सहकार्य होते व ते भावाभावाप्रमाणे मिळून मिसळून राहत असत. परंतु खेदाची गोष्ट अशी की हे सामुदायिक युग लवकरच संपले. कारण कृषी पद्धतीच्या आरंभीपासूनच धान्य पिकविण्यायोग्य जमीन व उत्पादन साधनासाठी आपापसांत लढाई-झगडे सुरु झाले व त्यांना पुढे पुढे युद्धांचे स्वरुप आले. कम्युनिस्टांच्या दृष्टिकोनातून या प्रश्नाची उकल, माणसाने प्रथम 'कम्यनिझम'कडे वळविण्याकडेच आहे. ज्यामुळे खाजगी मालमत्ता व तिच्या अनुषंगाने निर्माण होणारे झगडे थांबतील. सर्व वस्तु सर्व माणसांची सामुदायिक मालमत्ता होतील व सर्वजण त्यांचा लाभ घेऊ शकतील. कम्युनिझमजवळ केवळ याचरितीने जगांत शांती प्रेम व समानता निर्माण केली जाऊ शकण्याचा पर्याय आहे.

## मानसशास्त्र व खाजगी मालमत्तेची कल्पना

परंतु माणसांच्या स्वाभाविक भावनामध्ये, विचारांमध्ये व चालीरीतीत काय फरक असतो? मानसशास्त्रज्ञांनी या प्रश्नांची वेगवेगळी उत्तरे दिलेली आहेत, कारण या बाबतीत त्यांच्यामध्ये तीव्र मतभेद आहेत. हीच समस्या खाजगी मालमत्ता या संस्थेचीही आहे. काही समाजशास्त्र व मानसशास्त्रज्ञ ह्यास मानवाची स्वाभाविक उपजत भावना मानतात व असेही समजतात की ती परिस्थितीच्या अधीन किंवा तिच्यापासून निर्माण झालेली नाही. पण काही तज्ञांच्या मते ती एक प्राप्त केलेली भावना असून ती वातावरणाच्या प्रभावाने माणसांत निर्माण होते. उदाहरणार्थ, जेव्हा एक लहान मूल आपले खेळणे देऊन टाकण्यास नकार देते, तेव्हा त्याच्या नकारामागे, असे केल्यास त्याची खेळणी कमी होण्याची भीती कार्यान्वित असते व दुसरे एखादे मूल त्याची उरलेली इतर खेळणीही हस्तगत करील. म्हणून जर दहा मुले असतील व खेळणे जर एकच असेल तर त्यांच्यात आपापसात भांडण होणे अनिवार्य आहे. परंतु जर त्यातील प्रत्येकाला एक एक खेळणे मिळाले तर त्यांना सर्वांना आनंद होईल व त्यांच्यात आपापसांत भांडण होणार नाही.

कम्युनिस्ट व त्यांचे समर्थन करणाऱ्या मानशास्त्रज्ञांच्या व समाजशास्त्रज्ञांच्या अशा युक्तिवादाच्या उत्तरादाखल आम्ही काही सांगू इच्छितो, ते खालीलप्रमाणे -

## अपुरा पुरावा

आजतागायत कोणीही शास्त्रज्ञ असा भक्कम व पक्का युक्तिवाद समोर आणू शकला नाही, ज्यावरुन असे शाबीत व्हावे की खाजगी मालमत्ता ही माणसाच्या उपजत स्वभावधर्मात नसते. खाजगी मालमत्तेचा विरोध करणारे जास्तीत जास्त एवढेच म्हणू शकतात की त्यांच्याजवळ खाजगी मालमत्ता माणसाचा स्वाभाविक गुणधर्म असण्याचा खंडन न करता येण्याजोगा, कसलाही पुरावा नाही.

## मुले व खेळणी

कम्युनिस्ट आपल्या दृष्टिकोनातून जे सिद्ध करण्याचा प्रयत्न करतात व काढू इच्छितात तसे निष्कर्ष मुलांचे व त्यांच्या खेळण्यांचे उदाहरण देऊन कदापि निघत नाहीत. दहा खेळणी असताना दहा मुलांचे आपापसात भांडण न होणे, मानवी स्वभावातील खाजगी मालमत्तेच्या भावनेला विरोध नसतो. उलट यावरुन केवळ इतकेच स्पष्ट होते की शांततापूर्ण वातावरणात खाजगी मालमत्तेच्या इच्छेची पूर्तता संपूर्ण समानता स्थापन केल्यानेही होते. या उदाहरणाने या मानवी इच्छेचे मुळात आस्तित्वाच नसते असे सिद्ध होत नाही. उलट त्यावरुन तिच्या अस्तित्वाचे ज्ञान होते. काही मुले आपले खेळणे असतानासुद्धा आपल्या सवंगड्याची खेळणी पळवितात व त्यांच्यावर सक्ती करुन अशी संवय सोडायला भाग पाडेपर्यंत ती सोडीत नाहीत, ही वस्तुस्थिती असून कोणीही तिचा इन्कार करु शकत नाही.

## तो काळ

या सामूहिक जीवनाचा काळ, कम्युनिस्टांच्या म्हणण्याप्रमाणे सर्व मानवी समाजातील वैशिष्ट्य होते. पण वस्तुस्थिती अशी आहे की त्यांच्या आस्तित्वाचा असा भक्कम पुरावा आजही उपलब्ध नाही, ज्यामुळे असा सामूहिक जीवनकाल मानवाच्या प्रारंभिक अवस्थेत होऊन गेला, असे निश्चितपणे समजू शकू. त्यांचे आस्तित्व होते असे जरी क्षणभर मानले तरी या सामूहिक जीवन कालात उत्पादन साधनांचे मुळात अस्तित्वच नव्हते तर मग त्यांच्याकरीता माणसांत आपापसात झगडे का होत असत हे ही मानावे लागले. त्या काळात माणसाला आपले अन्न मिळविण्यास कसलाही त्रास नव्हता. हवे तेव्हा झाडाची फळे तोडू शकत असत, जंगली श्वापदांची शिकार करण्यासाठी टोळ्या करुन निघत असत. परंतू शिकार केलेल्या प्राण्यांचे मांस साठविण्याचा प्रश्नच उद्‌भवत नव्हता. कारण ते कुजत असे व जास्त वेळपर्यंत टिकवून ठेवले जाऊ शकत नव्हते. म्हणून ते प्राण्यांचे मांस सांभाळून ठेवीत नसत, याउलट शक्य तितक्या लवकर ते उपयोगात आणायचा प्रयत्न करीत. जर या युगांत मानवी जीवनात कोणताही संघर्ष असल्याचे आढळत नाही, तर त्यामुळे खाजगी मालमत्तेच्या स्वाभाविक भावनेचे खंडनही होत नाही. याचे कारण व मूळ रहस्य असे की त्या काळी कोणतीही अशी वस्तू नव्हती जी माणसाच्या

आपापसातील भांडणास कारणीभूत होवू शकत होती. म्हणूनच कृषी उद्योगाबरोबरच संघर्षाचाही आरंभ झाला. अन्न पिकविण्याच्या शोधाने माणसांतील उपजत भावनेला जागृत केले व त्यापासूनच पहिल्यांदा तिला प्रेरणा मिळाली.

## सामुदायिक वस्तु ही संघर्षाच्या अभावाचा युक्तिवाद नाही

प्रारंभिक युगांत स्त्री सर्वांची सामुदायिक मालमत्ता असे हा कम्युनिस्ट दृष्टिकोन जरी मानला, तरी त्याकाळात माणसामध्ये स्त्रीकरिता पुरुषांमध्ये भांडणे होतच नव्हती, अगर त्याकरिता बळाची कसोटी होतच नव्हती, असा अंतिम दावा केला जाऊ शकत नाही. कारण एक स्त्री दुसऱ्या स्त्रीपेक्षा अधिक सुंदर असल्यामुळे, ती सामुदायिक मालमत्ता असूनसुद्धा, पुरुषातील भांडणाचे कारण होऊ शकत असे. आम्हाला ही गोष्टही समजून घेतली पाहिजे की प्रकरण जर समान व एकसारख्याच वस्तुंचे असेल, तर त्यांच्याबाबतीत नक्कीच कसलेही भांडण निर्माण होऊ शकत नाही. परंतु जेथे वस्तूंच्या मूल्यांबाबत व त्याच्या श्रेष्ठत्वाच्या व निकृष्ठतेच्या बाबतीत लोकांच्या दृष्टिकोनातील स्पष्ट फरक व भेद आढळतो, तेथे मतभेद व संघर्ष आढळणे अनिवार्य आहे. मग तो आदर्श समाज असो किंवा कम्युनिस्टांच्या भविष्यकालीन स्वप्नांचे केंद्र असोत.

## आविष्काराची भावना

प्रारंभिक युगापासून माणसात आपल्यासारख्याच इतर लोकांपेक्षा विशेष मान व प्रतिष्ठेची इच्छा वसत आली आहे. म्हणूनच काही लोक शौर्य, शारीरिक बळ अथवा अशाच इतर साधनाद्वारे आपले व्यक्तिमत्त्व प्रदर्शित करण्याचा प्रयत्न करीत राहिले आहेत. ज्यांचे नवीन 'प्राथमिक कम्युनिझम'च्या आदर्श युगाचे एक उदाहरण आहे अशा काही जुन्या टोळ्या आजसुद्धा आपल्या मुलींचे विवाह केवळ अशाच युवकाशी करतात जे क्लेषोपीडेचे अथवा दु:खाचे कसलेही चिन्ह आपल्या चेहऱ्यावर दिसू न देता आपल्या पाठीवर शंभर चाबकाचे फटके खाण्यास तयार असतात. प्रश्न असा आहे की शेवटी कोणती गोष्ट या युवकांना ही जोखीम व हे विकतचे श्राद्ध घेण्यास प्रवृत्त करते ज्यामुळे हे कसल्याही दु:खाची व कष्टाची परवा करीत नाहीत? स्पष्ट आहे की तो आपले व्यक्तिमत्त्व प्रदर्शित करण्याच्या भावनेचाच एक चमत्कार आहे. जगात सर्व वस्तु समान असण्याचा नियम कार्यान्वित आहे हा विचार जर खरा आहे, तर एका माणसास दुसऱ्याला, मी तुझ्यासारखा नाही, तुझ्यापेक्षा श्रेष्ठ व अधिक चांगला आहे असे म्हणण्यास भाग पाडणारी भावना काय आहे? मानवी स्वभावधर्माचे हे अंग फार महत्त्वाचे आहे. कारण कम्युनिस्टांच्या म्हणण्यानुसार, जर खाजगी मालमत्ता एक स्वाभाविक भावना नाही असे मानले तरी त्याचा परस्पराशी वागण्याचा स्वाभाविक गुणधर्म व भावना म्हणजेच वैशिष्ट्य प्राप्त करण्याच्या भावनेशी खोलवर संबंध आहे व जो माणसाच्या जगातील उत्पत्ती काळापासून मानवी स्वभावधर्माचा एक अंश असल्याचे दृष्टीस पडतो.

या तात्त्विक चर्चेशिवाय इस्लाममध्ये खाजगी मालमत्तेला कोणते स्थान प्राप्त आहे ते आता पाहू या.

कम्युनिस्टांचा असा दावा आहे की खाजगी मालमत्ता व अन्याय हे दोन्ही एकमेकास अनिवार्य सतत राहिले आहे म्हणून माणूस जर जुलूम, अन्याय व अत्याचार यापासून सुटका करून घेऊ इच्छितो तर त्याला खाजगी मालमत्तासुद्धा समाप्त करावी लागेल.

## दोन महत्त्वाची सत्ये

परंतु असा दावा करताना हे लोक दोन महत्त्वाची सत्ये विसरतात. पहिले असे की मानवाचा विकास व त्याची प्रगती पूर्णपणे व्यक्तींच्या प्रयत्नावरच अवलंबून असते व दुसरे असे की 'प्राथमिक कम्युनिझम' च्या तथाकथित आदर्श युगात मानवाचा विकास शून्य होता. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे तर जेव्हा खाजगी मालमत्तेच्या कारणास्तव संघर्षाचा आरंभ झाला केवळ याचवेळी माणसाने आपली प्रगती करण्यास आरंभ केला. यावरून हे कळते की अशा प्रकारचा संघर्ष, मानवी हितासाठी वाईट नसून जर त्याने उचित मर्यादांचे उल्लंघन केले नाही तर ती एक अनिवार्य मानसशास्त्रीय, सामाजिक व आर्थिक गरज आहे.

## अन्यायाचे खरे कारण

जगामधील जुलूम, अत्याचार व अन्यायाचे खरे कारण खाजगी मालमत्ता आहे, हा विचार इस्लामसमीप बरोबर नाही. युरोप व इतर मुस्लिमेत्तर देशांत अन्यायाची जी उदाहरणे आढळतात, त्यांचे वास्तविक कारण असे की या देशांमध्ये शासन व कायदे करण्याचे सर्व अधिकार सुस्थितीत असणाऱ्या वर्गाच्या हातात होते, ज्यांचा उपयोग करुन त्यांनी असे ठराविक कायदे केले की त्यांचा खरा हेतू भांडवलशहांच्या स्वार्थाचे व हितांचे रक्षण करण्याचा होता व असे करताना इतर वर्गावर जुलूम व अत्याचार करावा लागला अथवा त्याच्या हिताला हानी पोचवावी लागली तरी हरकत नाही.

## इस्लाममध्ये राखीव वर्गाचे अस्तित्व नाही

इस्लाम मुळातच एखादा शासकवर्ग मानत नाही. इस्लामी पद्धतीत कायदे करण्याचे काम एखादा विवश श्रेष्ठ वर्ग करीत नसतो. उलट सर्व मानवी वर्गांना निर्माण करणाऱ्या अल्लाहकडे त्याचे सर्व अधिकार असतात. त्याच्या दृष्टीने सर्व मानव समान आहेत. कोणताही माणूस अथवा वर्ग असा अधिक प्रिय नाही की त्यांच्याखातर इतरावर अन्याय करण्यास त्याने तयार व्हावे. इस्लामी पद्धतीत सर्व मुस्लिम स्वतंत्र निवडणुकीद्वारा आपल्या शासकांची निवड करतात केवळ एक विशेष वर्गाशी अगर समूहाशी संबंध असल्यामुळेच त्यांची शासक म्हणून नियुक्ती केली जात

नाही. शासनाचा अधिकार प्राप्त झाल्याच्या पश्चातही एक मुस्लिम शासक स्वत: बनविलेले कायदे लागू करीत नाही. तो अल्लाहकडून अवतरलेल्या कायद्याचे आज्ञापालन करतो व त्यांचीच अंमगलबजावणी करतो. इतर मुस्लिम त्याच्या हुकूम पाळण्यास तोवरच बांधलेले असतात, जोवर शासक असे करीत राहतात. यासंदर्भात पहिले खलीफा माननीय अबू बक्र सिद्दीक (र) यांचे हे कथन किती स्पष्ट आहे -

'माझ्या आज्ञेचे तुम्ही तोवरच पालन करा जोवर मी स्वत: तुमच्याबाबतीत ईश्वराचे आज्ञापालन करीत राहतो. मी जर ईश्वराची अवज्ञा करु लागलो तर तुमच्यावर माझे आज्ञापालन करण्याचे कोणतेही बंधन नाही.'

इस्लाम शासकांना स्वत: कायदे करण्याचे अथवा इतरांना कायदे करण्याचे अधिकार देण्याचे, अधिकार देत नाही. कायद्याच्या दृष्टीने एका वर्गाला दुसऱ्या वर्गावर प्राधान्य देण्याचा अधिकारही शासकाला असत नाही. तसेच भांडवलशहांच्या प्रभावाखाली राहून सुस्थितीतील लोकांचे हित करण्याच्या हेतूने व इतर वर्गावर अन्याय करुन त्यांचे अहित करण्याच्या हेतुने कोणताही कायदा करण्याचा शासनाला अधिकार असत नाही.

आम्ही जेव्हा इस्लामी राज्याचे नाव घेतो तेव्हा आमच्या मनात इस्लामी सिद्धान्तानुसार व त्याच्या शिकवणीचा खऱ्या अर्थाने अंमलबजावणी करणाऱ्या इस्लामी इतिहासाचा अर्थ अभिप्रेत असतो. ही गोष्टही चांगल्यारितीने लक्षात ठेवली पाहिजे. इस्लामी राज्य म्हणताना आमचा मानस अधोगती पावलेल्या त्याकाळाचा निर्देष करण्याचा नसतो ज्यामध्ये इस्लामी राज्याचे राजेशाहीत रुपांतर झाले. इस्लाम अशाप्रकारच्या राजेशाहीचा व बादशाहीचा स्वीकार करीत नाही त्यांना मानतही नाही व त्यांच्या दोषाकरिता इस्लामला जबाबदार ठरविले जाऊ शकत नाही.

इस्लामी राज्याचे आदर्श युग फार अल्पसे होते. परंतु यावरुन कोणाचा असा भ्रम होता कामा नये की इस्लामी पद्धत केवळ अशी एक सैद्धान्तिक पद्धत आहे जी प्रत्यक्ष व्यवहारी जीवनाकरिता उचित नाही. याचे कारण असे की एकदा जिचा यशस्वीरितीने अंगीकार केला गेला होता त्या पद्धतीचा दुसऱ्यांदा अंगीकार करणेही शक्य आहे. उलट माणसांचे हे कर्तव्य ठरते की त्या पद्धतीची पुन्हा स्थापना करण्याकरिता सगळ्यांनी मिळून प्रयत्नांची पराकाष्ठा करावी. इस्लामी जीवन पद्धतीकरिता वातावरण आज जितके अनुकूल आहे, तितके यापूर्वी कधीही नव्हते.

## कायद्याची समानता

इस्लामी पद्धतीत संपन्न व समृद्ध वर्गाला आपल्या इच्छेनुसार कायदे करण्याचा हक्क असणार नाही. इस्लामसमोर माणसामाणसांत हक्कांच्या दृष्टीने कसलाही भेदभाव करणे योग्य नाही. तो सर्वांना इस्लामी कायद्यानुसार समान वागणूक देतो. इस्लामी कायद्यांच्या काही

अंगांची व्याख्या करण्याचे व त्यांचे अर्थ लावण्याची गरज भासली, जशी गरज जगातील प्रत्येक कायद्यांना भासते. इस्लामी कायद्यांच्या तज्ञांचे मत शेवटचे मानले जाईल. इस्लामी कायदा तज्ञांचे हे कर्तृत्व अभिमानास्पद आहे की त्यांनी संपन्न व समृद्ध लोकांच्या हितारवातर इस्लामी कायद्यांना ठोकून ठाकून त्यांचे असे विकृत स्वरुप सादर केले नाही, की जो कायदा संपन्न लोकांच्या स्वार्थाची पूर्ती करणारा व इतर वर्गावर जुलूम व अत्यचारांचा रंगमंच ठरावा. याउलट त्यांचा नेहमी असा प्रयत्न असे की श्रमिक वर्गाच्या मुलभूत गरजांवर पुरेपूर लक्ष दिले जावे. ते इतपर्यंत दिले गेले की काही धर्मशास्त्रज्ञांनी मजूर व किसानांच्या नफ्यामध्ये मालकाइतकाच समान हक्क असल्याचे ठरविले.

## मानवी स्वभाव निकृष्ठ दर्जाचा नाही

इस्लामसमोर मानवी स्वभाव खाजगी संपत्तीचे फल निश्चितपणे अन्याय व अत्याचाराच्या रुपानेच मिळावे इतका निकृष्ठ दर्जाचा नाही. माणसांच्या शिक्षणाच्या व संस्कृतीच्या संदर्भात इस्लामला अपूर्व सफलता प्राप्त झालेली आहे. म्हणून धन व संपत्तीचे मालक असतानाही मुस्लिमांची अशी अवस्था होती की -

'स्थलांतर (हिजरत) करुन त्यांच्याकडे आलेल्या लोकांवर हे लोक प्रेम करतात व त्यांना जे काही द्यावे लागते त्याची गरजसुद्धा हे लोक आपल्या मनात बाळगत नाहीत व स्वत: वर हलाखी जरी आली तरी स्वत:पेक्षा दुसऱ्यांनाच प्राधान्य देतात.'

आपल्या संपत्तीत इतरांना वाटेकरी करुन त्यांना आनंद होत असे परंतु असे करण्यात त्यांचा कुठलाही उद्देश इहलोकांतील लाभ प्राप्त करण्याचा नव्हता उलट त्याचा मोबदला ते फक्त अल्लाहकडून मिळण्याचे व त्याची क्षमा प्राप्त करण्याचे ते इच्छुक होते.

ही श्रेष्ठ व पवित्र उदाहरणे आम्हाला सतत डोळ्यांसमोर ठेवली पाहिजेत. अशी उदाहरणे सामान्यपणे इतिहासात आढळत नाहीत. ही उदाहरणे आम्हाला असा प्रकाश दाखवितात की ज्यामध्ये आमचे भविष्य उज्वल होऊ शकते. तसेच मानवाचे पद व त्याचे स्थान किती उच्च आहे याचीही कल्पना येते.

## एक स्वास्थपूर्ण समाज

येथे आम्हाला ही गोष्टही चांगल्यारितीने समजून घेतली पाहिजे की माणसांनी केवळ काल्पनिक जगातच दंग राहावे असा इस्लामचा कदापिही मानस नाही. म्हणून इस्लाम सार्वजनिक हिताला केवळ सदिच्छावर व तिच्या दयेकृपेवर सोडून देत नाही. इस्लाममध्ये प्राप्त होणाऱ्या आत्म्याच्या पावित्र्याला सर्व प्रकारे महत्त्व असूनही इस्लाम जीवनातील व्यवहारी व प्रत्यक्ष

समस्याकडे कधी डोळेझाक करीत नाही. कायद्याद्वारे संपत्तीचे वाटप सर्व समाजामध्ये न्यायतत्त्वाप्रमाणे व्हावे याची इस्लाम व्यवस्था करतो. आत्मिक पावित्र्य एकत्र करतानाच तो आम्हाला न्यायोचित कायदाही देतो. अशातऱ्हेने एका कल्याणकारी मानवी समाजाची वेल मांडवावर चढवितो. इस्लामचे तिसरे खलीफा माननीय उस्मान बीन अफ्फान (र) यांनी आपल्या कथनात स्पष्ट केल्याप्रमाणे कदाचित हेच ते सत्य होते की,

'कुरआनद्वारा या गोष्टींना अवरोध शक्य होत नाही, बेशक त्या गोष्टींचा अवरोध अल्लाह बलाने करीत असतो.'

## इतिहासाची साक्ष

खाजगी संपत्तीच्या संदर्भात कोणत्याही परिस्थितीत असे म्हणणे खरे नाही की तिच्यापासून नक्कीच अन्यायाचा जन्म होतो. कारण काही काळ असाही आढळतो की ज्यामध्ये तिचे अस्तित्व कोणालाही अन्यायास कारणीभूत झाले नाही. या संकटास थोपविण्यासाठी इस्लामने असे आर्थिक व सामाजिक कायदे केले की ज्यामुळे जहागिरदारी पद्धतीची वाढ होऊ शकली नाही. ज्या लोकांची मुळातच कोणती जमीन नव्हती असे लोकसुद्धा सन्मानजनक दर्जाचे आयुष्य जगू शकत होते. हेच ते संरक्षण होते ज्यामुळे इस्लामी पद्धतीत सुस्थितीतील संपन्न लोकांना गरीबावर कोणताही अत्याचार करण्याची शक्यता नव्हती.

## खाजगी मालमत्तेचा अधिकार अमर्याद नसून तो मर्यादित आहे

याउलट इस्लामध्ये भांडवलदार वाढणे शक्य होते, असे जरी मानले गेले तरी याबरोबरच हेही सत्य आहे की इस्लाममध्ये लोकहिताची सेवा करणारी भांडवलवादी पद्धतच टिकू शकते. एकीकडे इस्लाम मानवी स्वभावाला सुसंस्कृत बनवितो व दुसरीकडे असे कायदे करतो ज्यांच्यामुळे भांडवलदारी पद्धत, अनुचित शोषण, जुलूम व अत्याचारांची किळसवाणी रुपे धारण होऊच शकत नाहीत. इस्लामी पद्धतीला कार्यान्वित होण्याची संधी मिळाली असती तर तो आपल्या अशा कायद्यांनी पाश्चिमात्य जगताला त्याच्या आधुनिक दोषांपासून मुक्त करुन त्यांना केव्हाचे स्वच्छ करुन ठेवले असते. याखेरीज इस्लाममध्ये ज्या लोकांना खाजगी संपत्तीची परवानगी मिळते तीसुद्धा काही बंधनावर आधारलेली असते. सार्वजनिक साधने सार्वजनिक संपत्ती आहे हा इस्लामचा सिद्धान्त त्याचे एक उदाहरण होय. म्हणून न्यायाखातर जेथे आवश्यक वाटले तेथे इस्लाम खाजगी संपत्तीला परवानगी दिली नाही. जेव्हा परवानगी दिली ती फक्त अशा वेळी दिली की ती इतरावर जुलूम, अत्याचार व अन्यायाचे साधन होणार नाही, या गोष्टीला त्याचे पूर्ण समाधान झाले.

## स्कँडीनेव्हिया

काही मुस्लिमेतर देशांचे उदाहरण दिल्याने याबाबतीत स्पष्टीकरण अधिक सुलभ होऊ शकते. इंग्रज, अमेरिकन व फ्रेंच जे वंशभेद व जातीभेद मानणारे आहेत, ते सर्व हेही मानतात की स्कँडिनेव्हियातील लोक जगातील शिष्ठ व सुसंस्कृत आहेत. पण ही गोष्ट स्पष्ट करावीशी वाटते की स्कँडीनेव्हियात, अर्थात नार्वे व स्वीडनमध्ये खाजगी मालमत्ता अद्यापपर्यंत वर्ज्य केली गेली नाही. उलट संपत्तीचे न्यायोचित वितरण करण्याची व्यवस्था केली गेली आहे. अशा उद्देशासाठीच सामाजिक संरक्षण ठेवले गेले आहे. ज्याचा उद्देश भिन्न भिन्न वर्गातील एकमेकांतील अंतर कमी करावे, व कामाच्या मोबदल्याच्या प्रमाणात एक उचित समन्वय साधावा. स्कँडिनेव्हियाच्या या गुणांना नजरेसमोर ठेवून इस्लामी कायद्याच्या काही अंगाना कार्यान्वित करण्याच्या संबंधात हा देश जगातील इतर देशांच्या तुलनेत अधिक सफल ठरला आहे.

## आधुनिक आर्थिक पद्धतीतील मूळ नियम

एखाद्या आर्थिक पद्धतीला त्या सामाजिक दृष्टिकोनापासून वेगळे केले जाऊ शकतच नाही, ज्यांच्या आधारावर त्या आर्थिक पद्धतीची इमारत उभारलेली असते. वर्तमानकाळातील महत्त्वाच्या तीन चालू पद्धती भांडवलदार, कम्युनिझम व इस्लाम यावर नजर टाकल्याने आम्हाला ही गोष्ट स्पष्ट होऊ शकते. या तिन्ही आर्थिक पद्धतींचा व संपत्तीच्या बाबतीतील त्याच्या दृष्टिकोनाचा त्याच्या विशिष्ट सामाजिक पार्श्वभूमीशी खोलवर संबंध आहे.

## भांडवलदार

भांडवलवादी पद्धतीचा मूळ पाया या कथित कल्पनेवर आधारीत आहे की व्यक्तींचे स्वत्व पवित्र असते व त्या पावित्र्यावर कोणत्याही परिस्थितीत आघात केला जाऊ नये व त्याच्यावर कसलेही सामाजिक बंधन लावले जाऊ नये. यावरुन हे उघड आहे की भांडवलवादी पद्धत निर्बंध व अनिर्बंध खाजगी मालमत्तेचे समर्थन करते व त्यावर कसल्याही प्रकारचे बंधन घालू इच्छित नाही.

## कम्युनिझम

या उलट कम्युनिझमचा महत्त्वाचा दृष्टिकोन असा आहे की 'समूह' हाच खरा मूलभूत पाया आहे. व्यक्तीचे अस्तित्व वेगळे अथवा स्वतंत्र नाही. म्हणून कम्युनिझममध्ये समूहाचे आदर्श डोळ्यांपुढे ठेवून संपत्तीचे सर्व अधिकार शासनाकडे सोपविलेले असतात व व्यक्तीचे खाजगी मालमत्तेचे सर्व अधिकार हिरावून घेतलेले असतात.

### इस्लाम

या विषयाशी इस्लामचा सामूहिक दृष्टिकोन अगदी वेगळा आहे. त्यामुळे या दोन्ही पद्धतीपेक्षा त्याची आर्थिक व्यवस्थाही संपूर्णपणे वेगळी आहे. व्यक्ती व समाज यांच्या आपापसातील संबंधातील प्रश्नाबाबत इस्लाममध्ये व्यक्तीच्या एकाचवेळी दोन भूमिका मानण्यात येतात. वैयक्तिक भूमिका व सामाजिक भूमिका. यानुसार व्यक्ती ही समाजातील एक सदस्य मानली जाते. व्यक्तीने आपल्या या दोन्ही भूमिकांमध्ये अनुकूलता निर्माण करावी अशी इस्लामची तिच्याकडे मागणी असते.

### इस्लामचे वैशिष्ट्य

इस्लामचा हा सामाजिक दृष्टिकोन व्यक्तीला समाजापासून वेगळेही करीत नाही. तसेच व्यक्ती व समाज अशा दोन परस्परविरोधी शक्तीचे नाव आहे असेही तो मानीत नाही. त्यामध्ये एक दुसऱ्यावर मात करण्याची नेहमी चिंता करीत असतो. व्यक्ती एकाचवेळी स्वतंत्रही असते व समाजाचा एक सदस्यही असते. इस्लामी कायदा एक बाजूने व्यक्ती व सामाजिक प्रवृत्ती आणि दुसऱ्या बाजूने व्यक्तीचे आणि समाजाचे व इतर व्यक्तींच्या हितामध्ये समानता आणू इच्छितो. परंतु अशा समानतेसाठी तो व्यक्तीचे हितही नजरेआड करीत नाही, तसेच सामाजिक हिताकडेही डोळेझाक करीत नाही. त्याचा कायदा समाजाखातर व्यक्तीला नष्ट करण्याचेही समर्थन करत नाही. तसेच एक किंवा काही व्यक्तींच्या हिताखातर समाजात अशांती फैलावण्याचीही परवानगी देत नाही. तो एकीकडे व्यक्तीचे रक्षण करतो तर दुसरीकडे समाजाला भंग पावण्यापासून वाचवितो.

### दोहोंमधील एक सुंदर मार्ग

भांडवलदार व कम्युनिझम या दोन्हीही अतिरेकांच्या दरम्यान एक सुप्रिय व समतोल बिंदु असलेल्या धारणेवर इस्लामची आर्थिक पद्धतीची समानता व त्याची समरसपणा आधारलेली असते. त्यामध्ये दोन्ही पद्धतीतील गुण आहेत. पण त्यांच्या चुका, दोष व मार्गभ्रष्टतेपासून तो निष्कलंक आहे. सैद्धान्तिक दृष्टीने तो खाजगी मालमत्तेला परवानगी देतो, परंतु तिच्यावर बंधने घालून तिला दोष विरहित करतो. दुसरीकडे इस्लाम शासक व समाजाला समूहाचा प्रतिनिधी असल्याच्या नात्याने खाजगी मालमत्तेच्या बांधणीकरिता, आवश्यक ते कायदे करण्याकरिता व सामाजिक कल्याणाकरिता त्यामध्ये आवश्यकतेनुसार फेरबदल करण्याचा पूर्ण अधिकार देतो.

## तुटींची सुधारणा

इस्लाम खाजगी मालमत्तेचे समर्थन करतो कारण तिच्याद्वारे निर्माण होणारे दोष व तुटीमध्ये सुधारणा करण्याचीही क्षमता तो बाळगतो. या उद्देशाकरिता तो निरनिराळ्या उपायांचा अवलंब करतो. यावरुन हे स्पष्ट होते की सैद्धान्तिक दृष्टीने खाजगी मालमत्तेची परवानगी देऊन समाजाला तिच्या बांधणीचा व हस्तांतराचा आवश्यक अधिकार देणे, खाजगी मालमत्तेला संपूर्णपणे समाप्त करण्याचे कितीतरी अधिक चांगले व यथोचित रुप आहे. मुख्यत्वेकरुन जेव्हा, खाजगी मालमत्तेची भावना हे मानवस्वभावाचे अंग नसून ती मानवी जीवनातील एखादी महत्त्वाची गरजही नाही, अशा कल्पनेवर ही समाप्ती आधारलेली असते. स्वत: रशियामध्येसुद्धा मर्यादित खाजगी संपत्तीची परवानगी द्यावी लागली. ही गोष्ट या सत्याचा उघड पुरावा आहे की मानवी स्वभावधर्मांच्या निकडीमध्ये एकरुपता असणे व्यक्ती व समाज या दोहांच्या हितास्तव अधिक चांगले असते.

शेवटी प्रश्न असा येतो की खाजगी मालमत्ता का वर्ज्य करण्यात यावी व कोणत्या कारणाच्या आधारे इस्लामशी अशी मागणी केली जाते की त्याने तिला अवैध घोषित करावे.

## कम्युनिष्ठ अनुभवाची असफलता

कम्युनिष्टांचा असा दावा आहे की लोकांमध्ये समानता निर्माण होण्यासाठी खाजगी मालमत्तेचा अंत होणे अनिवार्य आहे, कारण केवळ याच तऱ्हेने माणसांची आपल्यासारख्याच माणसांच्या दास्यत्वातून व गुलामीतून सुटका करुन दिली जाऊ शकते. रशियामध्ये उत्पादन साधनातील खाजगी मालमत्ता समाप्त करण्यात आली आहे. परंतु ती समाप्त करताना जे उद्देश त्याच्या मनात होते ते सर्व त्यांनी प्राप्त केले आहेत काय? स्टॅलीनच्या शासनकाळात रशियन शासनाला मजुरांकडून अधिक काम करुन घेण्यासाठी वाढीव मोबदल्याची लालूच द्यावी लागली होती व अशा तऱ्हेने त्याने श्रमिकांची मजुरी एकसारखी करण्यात स्वत:च प्रत्यक्षरुपाने तिचा निषेध करुन टाकला.

## विचार करण्यासारखी गोष्ट

खाजगी मालमत्ता रोखल्याने रशियन लोकांमध्ये परस्परांत चढाओढ करण्याची व स्वत:चे व्यक्तिमत्त्व प्रदर्शित करण्याची भावना नष्ट झाली आहे काय? जर ही सारी वैशिष्टे समाप्त झाली आहेत, तर तेथे ट्रेड युनियनचे नेते कारखान्यातील व्यवस्थापक, उच्च प्रशासक, वेगवेगळ्या विभागातील अध्यक्षांची निवड कशा तऱ्हेने केली जाते? व खुद्द कम्युनिस्ट पार्टीमध्ये साधे सभासद व सक्रिय सभासद यामधील फरक शेवटी कोणत्या आधारावर केला जातो.

खाजगी मालमत्तेच्या औचित्याची व अनौचित्याची चर्चा बाजूला ठेवून, इतरांवर सर्वश्रेष्ठता प्राप्त करणे व त्यांच्या तुलनेत वैशिष्ट्य प्राप्त करणेची भावना मानव स्वभावधर्माचे एक अनिवार्य अंग आहे, ही गोष्ट सत्य नाही काय? कम्युनिझमने खाजगी मालमत्तेचा अंत करुन टाकला, पण असे असूनसुद्धा मानवतेला अशा मोठ्या बिघाडापासून तो स्वच्छ करु शकला नाही, जे त्यांच्या मताने केवळ खाजगी मालमत्तेनेच निर्माण होतात. कम्युनिझमच्या या अशा अपयशानंतर, त्याने रुळविलेल्या मार्गावर आम्ही चालावे व त्यांच्या पद्धतीचा अंगीकार करावा, जी गोष्ट मानव स्वभावाच्या अगदी प्रतिकुल आहे व ज्यांना प्राप्त करणे अशक्य आहे, अशा उद्देशाकरिता आपली शक्ती नष्ट करावी, ही गोष्ट उचित नाही.

## पोकळ तर्क

रशियामध्ये जी वर्गीय वैशिष्ट्ये आढळतात, त्यांच्यासंबंधी काही कम्युनिष्ट असे म्हणतात की ही वैशिष्ट्ये इतक्या कमी संख्येत आहेत की त्यांच्या परिणामस्वरुप सुस्थितीतील वर्ग मदमस्त होऊन भोगविलासात मग्न होऊ शकत नाहीत. तसेच खालचा वर्ग दारिद्रयाला, हलाखीला, अभावाला बळी पडू शकत नाही, पण प्रश्न असा आहे की खाजगी मालमत्ता पूर्णपणे समाप्त झाल्यानंतरही अशीच काही अवस्था प्राप्त होणे असेल तर तिच्यासाठी एवढे आकाश-पाताळ एक करण्याची काय गरज आहे? आजपासून तेरा शतकांपूर्वी, जेव्हा कम्युनिझमच्या जगाचे अस्तित्वही नव्हते, तेव्हा इस्लामने जगाला जे सिद्धान्त शिकविले, त्यापैकी एक महत्त्वाचा सिद्धान्त असा होता की समाजातील व्यक्तीमध्ये आर्थिक विषमतेचे अंतर कमीतकमी केले जावे जेणेकरून काही लोकांना इतरांचे उचित हक्क व अधिकार हिरावून घेऊन भोगविलासाचा डामडौल करणे अशक्य व्हावे. पण या उद्देशांच्या पूर्ततेसाठी इस्लामने केवळ कायद्याच्या बडग्याचा आधार घेतला नाही. उलट लोकांच्या मनात अल्लाहने चांगुलपणा व मानवजातीच्या प्रेमाची भावना जागृत केली. त्यानंतर त्याच्यावर कायद्याने बंधने लादण्यासाठी कोणत्याही बाह्यशक्तीची आवश्यकता उरत नसते.

**प्रकरण चौथे**

# इस्लाम व वर्ग व्यवस्था

"व अल्लाहने तुमच्यापैकी काहींना काहीपेक्षा उपजीविकेच्या साधनांमध्ये प्राधान्य दिले आहे." (अन-नम्ल, ७१)

"व आम्ही एकाला दुसऱ्यापेक्षा दर्जामध्ये उंची देऊन ठेवली आहे" (अज-जुरुफ, ३२)

शंकाकुशंका काढणारे कम्युनिस्ट असे म्हणतात की कुरआनमध्ये अशा आयती असताना, कोणता मुस्लिम इस्लाममध्ये वर्गीय पद्धतीच्या अस्तित्वाचा इन्कार करु शकतो?

## वर्गीय पद्धतीचा अर्थ

मध्यकालीन युरोप तीन ठळक वर्गांत विभागलेला होता. १) प्रतिष्ठित वर्ग २) धर्मोपदेशकांचा वर्ग ३) सामान्य प्रजा

धर्मोपदेशकांच्या वर्गाला ओळखण्याची खूण त्यांच्या पेहरावात होती. सत्तेच्या व शक्तीच्या दृष्टीने हा वर्ग मोठमोठ्या बादशहांच्या, किंबहुना सम्राटांच्या तोडीचा होता, म्हणूनच चर्चचा सर्वेसर्वा पोप, बादशहाला नियुक्त करण्याचा अगर त्यांना पदच्युत करण्याचा स्वत:ला अधिकार असल्याचे समजत होता. अशी अवस्था त्या बादशहांना कोणत्याही प्रकारे स्वीकारार्ह होऊ शकत नव्हती, म्हणून त्यांनी चर्च व पोपच्या बंधनातून मुक्त होण्याचे शक्य ते सर्व प्रयत्न केले. चर्चच्या आर्थिक साधनांची स्थिती अशी होती की त्यांच्या बळावर तो स्वत:ची नियमित फौज बाळगू शकत असे.

उरला प्रतिष्ठित वर्ग तर त्यांना वाडवडिलांकडून वारसाहक्काने प्रतिष्ठा प्राप्त होत असे त्यांच्या स्वत:च्या कर्तृत्वाचा अगर चारित्र्याचा प्रतिष्ठेशी कसलाही संबंध नव्हता. त्यांच्या मते प्रतिष्ठितांना जन्मानेच प्रतिष्ठा मिळत असे व त्याने कितीही नीचाहून नीच कृत्य केले अगर वाईटापेक्षा वाईट कुकर्म केले तरी ते प्रतिष्ठितच राहात असत व त्यांच्या जन्मसिद्ध प्रतिष्ठेला कसलीही बाधा पोहचत नसे.

## कायदे करण्याचा एकाधिकार

जहागिरदारी काळात या प्रतिष्ठितांच्या समूहाला, आपल्या जहागिरीत राहणाऱ्या लोकांवर पूर्ण अधिकार प्राप्त असत. तेच सर्व न्यायालयीन व शासकीय अधिकारांचे धनी होते व त्यांच्या इच्छेने त्यांच्या मुखातून निघालेल्या शब्दांना कायद्याचा दर्जा प्राप्त होता. त्याकाळी जी प्रातिनिधिक मंडळे असत. त्यांच्यातही या प्रतिष्ठित वर्गातील व्यक्तींचाच समावेश असे. याची स्वाभाविक फलनिष्पत्ती अशी झाली की जेव्हा हे लोक कायदे करीत त्या कायद्यात त्यांच्या

व्यक्तिमत्त्वाची, त्यांच्या स्वार्थाची व त्यांच्याच संरक्षणाची तरतूद असे. त्यांना या लोकांनी पावित्र्याचा असा मुलामा चढविला होता की त्यांना समाप्त करण्याचा विचारही कोणाच्या मनात येवू शकत नव्हता.

## सामान्य जनतेची दयनीय अवस्था

सामान्य जनतेला कोणतेही संरक्षण उपलब्ध नव्हते. व त्यांना पूर्ण अधिकारही मिळाले नव्हते, उलट दारिद्रय, गुलामी व मानखंडना त्यांना वाडवडिलांकडून वारसाहक्कानेच येत असे व हाच वारसा ते आपल्या नंतरच्या वंशजांना देत असत.

## श्रीमंत मध्यमवर्गाचा (बुर्जवा) जन्म

नंतर जी स्पष्ट आर्थिक प्रगती झाली, तिच्या परिणामस्वरुप श्रीमंत मध्यमवर्ग अस्तित्वात आला व हळू हळू त्याला तेच महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले जे अगोदरच्या काळातील प्रतिष्ठित वर्गाचे वैशिष्ट्य होते. याच वर्गाच्या नेतृत्वाखाली जनतेने फ्रान्समध्ये क्रांती केली व या क्रांतीनेच प्रत्यक्षांत वर्गीय भेदभावांचा शेवट केला व जगाला स्वातंत्र्य, बंधुत्व व समानतेची घोषणा दिली.

## वर्तमान युगातील भांडवलशहा

वर्तमानकाळात जुन्या प्रतिष्ठित लोकांची जागा आता भांडवलशहांनी घेतलेली आहे. हा बदल अगदी न कळत रितीने झाला. त्याच बरोबर आर्थिक प्रगतीमुळे होणारे पुष्कळसे इतर बदलही झाले. परंतु या सर्व घडामोडीत, महत्त्वाच्या नियमांत कसलाही फेरबदल झाला नाही. म्हणून आजसुद्धा धन व दौलत, सत्ता व शक्ती सर्वकाही भांडवलशाही वर्गाच्याच हातात आहे व त्यांना हवा तसा ते सरकारी यंत्रणेचा उपयोग करतात. लोकशाही देशातील निवडणुकांचे स्वरुप पहाता असे कळते की जनतेला पुरेपूर स्वातंत्र्य प्राप्त आहे. पण तेथेही काही अशा चोरवाटा असतात की ज्यांच्याद्वारे भांडवलशहा लोकसभा-विधानसभांवर व सरकारी कार्यालयांवर कब्जा करतात. तसेच सर्व उचित-अनुचित मार्गांनी आपल्या सर्व निंद्य उद्देशांची पूर्तता करुन घेऊ शकतात.

## ब्रिटन

या संदर्भात हेही लक्षात ठेवले पाहिजे की लोकशाहीचा सर्वांत मोठा राखणदार असणाऱ्या खुद्द ब्रिटनमध्येच आजतागायत "हाऊस ऑफ लॉर्डस्" च्या नावाने एक वरचे भवन अस्तित्वात आहे. तेथे आजसुद्धा प्राचीन काळातील जहागिरीचा एक असा कायदा प्रचलित आहे की जहागिरदाराच्या मृत्यूनंतर त्याची संपूर्ण इस्टेट ज्येष्ट पुत्राला मिळते. या कायद्याचा हा उघड उघड उद्देश इस्टेट व मालमत्ता काही प्रभुत्व लोकांच्या हातात राखण्याचाच आहे, जेणेकरुन कुटुंबातील सर्व मालमत्ता व धन एकाच ठिकाणी केंद्रित राहावे व त्यामुळे मध्यकालीन जहागिरदारांना असलेल्या सामाजिक प्रतिष्ठेचा दर्जा त्यांच्या कुटुंबात शिल्लक राहावा.

## वर्गीय पद्धतीचा मूळ पाया

धन हीच खरी शक्ती आहे. या कथित विचाराच्या मूळ पायावरच वर्गीय पद्धत उभारलेली आहे, म्हणून ज्या वर्गाजवळ धन असते तोच वर्ग निश्चितपणे राजनैतिक शक्तीचा ही धनी होतो. देशाचे कायदे करण्यात त्याचा हात असतो. तो प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष रितीने असेच कायदे करीत असतो की त्यांचा मानस त्यांच्याच हितांचे रक्षण करण्याचा व दुसऱ्या वर्गाचे सर्व कायदेशीर हक्क हिरावून घेऊन त्यांना सदैव आपल्या अधीन ठेवण्याचा असतो.

वर्गीय पद्धतीच्या व्याख्येच्या उजेडात पूर्ण विश्वासाने असे म्हणू शकतो की इस्लाममध्ये अशा तऱ्हेच्या वर्गीय पद्धतीला कसलाही वाव नाही. अशी वर्गीय पद्धत इस्लामी इतिहासात कधी आढळलीही नाही. या सत्याचे स्पष्टीकरण खालील वास्तवतेपासूनही होते.

## धनसंचय करण्यास अवरोध

संपत्ती व मालमत्ता, काही प्रमुख व्यक्तींच्याच हातात मर्यादित ठेवण्याचा उद्देश असणारा कोणताही कायदा, इस्लामी कायद्यामध्ये अस्तित्वात नाही. कुरआन मजीदमध्ये स्वच्छ व स्पष्ट शब्दात असे सांगितले आहे,

'जेणेकरुन धन तुमच्यातील धनिकांच्याच दरम्यान फिरत राहू नये.' धनाचे सतत भ्रमण राहावे व त्याचे सतत विकेंद्रीकरण व वाटप व्हावे, हा उद्देश सतत नजरेसमोर ठेवूनच इस्लामने मानवी जीवनासाठी सर्व कायदे केले, त्याचे हेच कारण आहे. इस्लामच्या वारसा कायद्यानुसार मृताच्या पश्चात उरलेली सर्व संपत्ती, त्याच्या सर्व वारसांमध्ये, मग ती संख्या कितीही मोठी असो, वाटली गेली पाहिजे.

इस्लाममध्ये वारसाहक्क कोणत्याही एकाच व्यक्तीला मिळत नाही. याला अपवाद असा की जेव्हा मृताचे कुणी भाऊ बहीण अगर नातेवाईक आस्तित्वात नाहीत असा आहे. परंतु अशा अपवादामध्येही इस्लामने अशीही व्यवस्था केली आहे की साऱ्या संपत्तीचा व मालमत्तेचा धनी एक व्यक्तीच होऊन बसू नये. उलट त्यामध्ये अशा इतर हक्कदारांसाठीही काही हिस्सा काढला जावा ज्यांचा मृताशी नात्याचा कसलाही संबंध नाही. आधुनिक युगात वारसाचा कर आढळतो. हे त्याचेच एक प्रारंभिक रुप आहे. कुरआनस्पष्टोक्ती आहे,

"आणि जेव्हा (वारसामध्ये संपत्तीचे) वाटपाचे वेळी (लांबचे) नातेवाईक अस्तित्वात असतील आणि अनाथ व गरीब लोक असतील तर त्यांनाही (त्या संपत्तीत) त्यातून काही द्या व त्यांच्याशी चांगुलपणाने वातचित करा." (अन निसा : ८)

धनसंचयाने निर्माण होणाऱ्या समस्यांची इस्लामने अशा तऱ्हेने सोडवणूक केली. इस्लामी वारसा कायद्यानुसार मालमत्ता एखाद्या विशेष वर्गाला वारसाहक्काने मिळत नाही. उलट मृतांच्या

वारसामध्ये तिचे वाटप होते व त्यांच्यानंतर याच धनाचे व संपत्तीचे पुढे त्यांच्या वारसामध्ये वाटप होत राहते. म्हणूनच इस्लामी समाजात धन काही व्यक्तींच्या जवळच साठून राहिले नाही तर सर्व समाजामध्ये चलन असते. या गोष्टीला इतिहास साक्ष आहे.

## कायद्याच्या संरक्षणाचा शेवट

इस्लाममध्ये कायदे करण्याचा अधिकार केवळ एका विशिष्ट वर्गापर्यंत मर्यादित नाही या त्याच्या वैशिष्ट्याकडे नेणारा इस्लामचा हा स्वभाव आहे. इस्लामी पद्धतीत कोणीही कोणताही कायदा करण्याचा अधिकार बाळगत नाही. याचे कारण असे की इस्लाम सर्व माणसांना एकाच ईश्वरी कायद्याखाली आणू इच्छितो. हा कायदा ईश्वराने उतरविलेला आहे व तो माणसामाणसात कोणताही भेदभाव करण्याला उचित समजत नाही.

## वर्गविरहित समाज

याचा अर्थ असा आहे की इस्लामी समाज एक वर्गविरहित समाज असतो. कारण वर्गाचे अस्तित्व व कायद्याची संरक्षणे यांचा आपसांत खोल संबंध असतो. जेथे कायद्याची संरक्षणे नसतील व कोणताही वर्ग आपल्या इच्छेनुसार कायदे करून आपल्या स्वार्थाखातर इतरांचे नुकसान करण्याची ताकद बाळगत नसेल, तर तेथे वर्गीय भेदभावसुद्धा कधीही जन्म घेत नाही.

## कुरआन आयतींचा अर्थ

क्षणभर त्या दोन आयतींचा अर्थ समजून घेण्याचा प्रयत्न करु या, ज्या आयती या प्रकरणाच्या सुरुवातीला दिलेल्या आहेत, त्यांचा वरवरचा अभ्यास काही लोकांच्या मनात शंका व भ्रम निर्माण होण्यास कारणीभूत होऊ शकतो.

कुरआनमध्ये असे सांगितले आहे,

"व अल्लाहने तुमच्यातील काहीना काहीपेक्षा उदरनिर्वाहाच्या साधनामध्ये प्राधान्य दिले आहे."

"व आम्ही एकाला दुसऱ्यापेक्षा दर्जामध्ये श्रेष्ठता देवून ठेवली आहे."

## यामध्ये एकाच सत्याचा उल्लेख आहे

या आयतीत केवळ एकच सत्य वर्णन केले गेले आहे, जे कोणत्याही इंस्लामी पद्धतीत अगर बिगर इस्लामी पद्धतीत आढळू शकते. यामध्ये जे काही वर्णन केले गेले आहे, ते केवळ इतकेच आहे की माणसामध्ये निर्वाहाच्या साधनांच्या बाबतीत व त्यांच्या दर्जाच्या बाबतीत भिन्नता अस्तित्वात आहे. रशियाचेच उदाहरण घ्या. तेथे सर्व लोकांना सारखाच मोबदला मिळत असतो काय किंवा काहींना इतरांच्या तुलनेत अधिक मोबदला मिळत असतो? सैन्यात दाखल

होणाऱ्या सर्वच सैनिकांना समान हुद्दे दिले जातात की काहींना इतरापेक्षा श्रेष्ठत्व प्राप्त होत असते. जर हा भेद तेथेही अस्तित्वात आहे, तर त्याचे कारण माणसामध्ये आढळणाऱ्या अनिवार्य भिन्नतेखेरीज दुसरे काय असू शकते? वरील आयतीमध्ये अशी भिन्नता असण्याचे कोणतेही विशेष कारण दाखविले गेले नाही, व तिची उत्पत्ती संपत्तीपासून आहे, कम्युनिझमपासून आहे अथवा इस्लामपासून आहे हेही दाखविले गेले नाही. तसेच या श्रेष्ठता (अगरभिन्नता) इस्लामी मानदंडाच्या दृष्टीने न्यायपूर्ण आहेत की अन्यायकारक आहेत या बाबतीतही या आयतीमध्ये मौन आहे. ही गोष्ट बाजूला ठेवून ही गोष्ट केवळ एक सत्य या स्वरुपात सांगितली गेली आहे की जगात प्रत्येक ठिकाणी कशारीतीने आढळून येते. ही गोष्ट उघड आहे की जगात जे काही घडत आहे की जगात जे काही घडत असते ते सर्व ईश्वराला चांगल्या तऱ्हेने ज्ञात असते.

## एक महत्त्वाचा फरक

आतापर्यंत ही गोष्ट स्पष्ट झाली पाहिजे की इस्लामी समाज एक असा समाज आहे, ज्यामध्ये वर्ग आढळत नाही व कायद्याचे संरक्षणही त्यात नाही. संपत्ती व मालमत्तेचे सदर्भांत लोकांमध्ये जो फरक आढळतो त्याचा वर्गीय पद्धतीची गोंधळ करता कामा नये. याचे कारण असे की जोपर्यंत जगातील साधनांची व मालमत्तेची ती तफावत एखाद्या कायद्याच्या अथवा वैयक्तिक श्रेष्ठत्वाच्या रुपात प्रकट होत नाही तोपर्यंत त्याचे परिणाम स्वरुप कोणताही वर्ग निर्माण होऊ शकत नाही. जर कायद्याच्या दृष्टीने सर्व माणसे सैद्धान्तिक दृष्टिकोनातून समान आहेत तसेच तथ्यांच्या बाबतीतही समान तर धन व संपत्तीची ही तफावतसुद्धा वर्गीय भेदभावाच्या रुपाने प्रकट होऊ शकत नाही.

येथे ही गोष्ट स्पष्ट व्हावी की इस्लामने व्यक्तीना जमिनीच्या मालमत्तेचा जो अधिकार दिला आहे त्यांच्या परिणामस्वरुप जमीनमालकांना कसलेही असे विशेष संरक्षण प्राप्त नाही की ज्याच्या बळावर त्यांनी दुसऱ्याना गुलाम बनवावे किंवा त्यांना आपल्या उद्देशपूर्तीचा रंगमंच बनवावे. जर खऱ्या इस्लामी पद्धतीत भांडवलवादी पद्धतीचा जन्म झाला असता तर तेथे ही अशीच अवस्था निर्माण झाली असती, कारण इस्लाममध्ये शासकांना शासन करण्याचा अधिकार भांडवलशहाच्या वर्गाचे समर्थन करण्याच्या उपकारात प्राप्त होत नाही तर तो संबंध राष्ट्राच्या पाठिंब्याने व निवडीने होतो. ईश्वरी आदेशांचे पालन करणे हे इस्लामी शासकाचे कर्तव्य असते.

सत्य तर असे आहे की सर्व व्यक्ती संपत्तीच्या दृष्टीने समान आहेत, असा कोणताही समाज या जगात अस्तित्वात नाही. कम्युनिष्ट समाजातही अशी समानता आढळत नाही. तरीसुद्धा त्याचा असा दावा आहे की त्याने सर्व वर्ग नष्ट करुन टाकले आहेत. त्याचे सारे कर्तृत्व केवळ इतकेच आहे की त्याने छोट्या छोट्या भांडवलशहाना नष्ट करुन एका शासकांच्या अशा वर्गाला जन्म दिला ज्याने दुसरे वर्ग नष्ट करुन टाकले.

**प्रकरण पाचवे**

# इस्लाम व दान पुण्य

कम्युनिस्ट व साम्राज्यवादी इस्लामवर असा एक आरोप करीत असतात की तो साधारणजणांना व गरिबांना धनवानांच्या दानावर जगण्याची शिकवण देतो. त्यांच्यातील आपल्या बाहूबळावर जीवन कंठण्याची धमक हिरावून घेतो. या लोकांचा इस्लामवर ह्या आरोपाचे कारण त्यांचा असा गैरसमज आहे व त्यामुळे ते असे समजत आहेत की जकात एक दान आहे व असे दान धनवान व्यक्ती उपकाराखातर निर्धनांना वाटत असतात.

## जकात व दान यामधील फरक

या आरोपातील सत्य जाणण्याकरिता आम्हाला दान व जकात यातील फरक चांगल्यारितीने लक्षात ठेवावा लागेल. दान ही स्वेच्छेने केली गेलेली एक कृती व ते करण्याला एखादा कायदा अगर सरकार कोणत्याही माणसाला भाग पाडू शकत नाही. परंतु या उलट जकात एक कायद्याचा आदेश आहे व जे लोक जकात देण्यापासून इन्कार करतात. इस्लामीराज्य त्यांचे विरुद्ध लढा सुरु करतो. तसे करुनही त्यांनी मानले नाही तर तो त्यांना मृत्यूदंडाची शिक्षा देतो कारण असा इन्कार केल्यानंतर हे लोक मुस्लिम राहत नाहीत. त्यांना मुर्तद (इस्लामविन्मुख व्यक्ती) ठरविले जाते. दानाच्या बाबतीत इस्लामी राज्य अशा तऱ्हेचे कठोर पाऊल उचलत नाही, उलट ते लोकांच्या इच्छेवर व त्यांच्या पुण्यभावनेवर सोडून देतो. ही गोष्ट येथे सांगण्याची गरज नाही.

## पहिला नियमित कर

अर्थशास्त्राच्या दृष्टीने जकात हा पहिला कायदेशीर कर होता. जो जगात एखाद्या जातीवर लावला गेला. याच्यापूर्वी कोणताही नियम अगर कायदा करांच्या बाबतीत नव्हता व शासनच आपल्या इच्छेने ते ठरवित असत. करांची वसुलीसुद्धा शासकांच्या उत्साहावर, स्वार्थावर तसेच त्यांच्या गरजांवर अवलंबून असे. या करांचे खरे ओझे व भार किंबहुना सगळा भार श्रीमंताऐवजी गरिबांवर असे. इस्लामने आपल्या आगमनानंतर करांच्या वसुलीबाबत एक नियमबद्ध पद्धत स्थापन केली व सामान्य परिस्थितीमध्ये कराचे प्रमाण एक टक्का असे ठरविले. त्याने हे कर धनिकांवर व वरच्या दर्जाच्या लोकांवर लागू केले व गरीब लोक त्यातून वगळल्याचे घोषित केले.

## इस्लामी राज्यातील जामदारखाना

इस्लाममध्ये जकातीचे वाटप गरिबांमध्ये खुद्द शासन करते व श्रीमंत लोक स्वत: ते करीत नसतात. असे समजा की जकात एक असा कर आहे की ज्याची वसुली तसेच त्याचे जनतेमधील वाटप, शासनच करीत असते. आजच्या शासनामध्ये वित्त मंत्रालयाचे जे स्थान आहे, तेच इस्लामी पद्धतीत शासनाच्या जामदारखान्याचे व खजिन्याचे असते. एकीकडे तो जनतेकडून कर व देणग्या वसूल करतो, तर दुसरीकडे तो जनतेच्या सुखसोईला जबाबदार असतो. तसेच स्वत:चा उदरनिर्वाह स्वत: करण्याची क्षमता नसलेल्या. तसेच ज्याच्या उत्पन्नाचे साधन मर्यादित व अपुरे असते. अशा सर्व लोकांच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था करतो. हे उघड आहे की अशा असहाय्य व विवश लोकांना, तसेच तिला पात्र असलेल्यांना मदत केवळ उपकार म्हणून करीत नसतो, की जिचा स्वीकार केल्यास लोकांना मानहानीस्पद वाटावे. सरकारी नोकरीतून निवृत्त होऊन पेन्शन घेण्याऱ्यांना तसेच सामाजिक कल्याण खात्यातर्फे मदत घेणाऱ्या कामगारांना, ते धनिकांकडून दान घेत आहेत, असा टोमणा जर मारता येणे शक्य नाही, तर विवश अनाथ बालकांना तसेच उदरनिर्वाहासाठी स्वत: कष्ट करण्याची क्षमता नसलेल्या वृद्धांना ते भिक्षेच्या स्वरुपात शासनाकडून मदत व सहाय्य घेत आहेत असे कसे म्हटले जाऊ शकते? अशा लोकांची विवशता व असहाय्य अवस्था पाहून सरकार त्यांना आर्थिक सहाय्य देत असेल. तर असे सहाय्य हे शासनाच्या मानवी कर्तव्यापैकी एक असून, त्यामुळे त्या लोकांची कसलीही मानहानी अगर क्षुद्रपणा होत नाही.

## सामाजिक कल्याण पद्धत व इस्लाम

आजकाल सामाजिक कल्याणाच्या रक्षणाची जी पद्धत चालू आहे, ती मानवतेने शतकानुशतके घेतलेल्या कटू अनुभवानंतर, तसेच सामाजिक अन्यायाच्या एका दीर्घ इतिहासानंतर अवलंबली गेली आहे.

जेंव्हा युरोप सामाजिक दृष्टीने अंधकारात चाचपडत होते, अशा काळात इस्लामने समाज कल्याणची पद्धत स्थापन करुन आपल्या महानतेचा व उदात्तपणाचा युक्तिवाद पुढे केला आहे. पण पूर्वेकडून अगर पश्चिमेकडून आयात केलेल्या पद्धतींची प्रशंसा करण्यात ज्या लोकांना कसलीही दिक्कत वाटत नाही, त्यांची मानसिक दास्यत्वाची अवस्था अशी आहे, की त्यांना प्रिय असलेली एखादी पद्धत जरी इस्लामने आंरभिली तरी त्या आवडत्या पद्धतीलाही असंस्कृत व मागासलेल्या पद्धतीपासून निपजलेली म्हणून टर उडवतील व इस्लामबद्दल त्यांना झालेला भ्रम व गैरसमज जाणार नाही.

## जकातचे वाटप व इस्लाम

इस्लामने आपल्या आरंभीच्या काळात त्या वेळची विशिष्ट परिस्थिती नजरेसमोर ठेवून जकात वसूल करण्याची रोखीच्या अगर इतर स्वरुपात कायदेशीर पद्धत ठरविली होती. परंतु याचा असा अर्थ होऊ शकत नाही की जकात वाटपाची एवढी एकच पद्धत होती की गरजुंनी स्वत:च जाऊन जकात गोळा करीत फिरावे व दुसरी कसलीही पद्धत अवलंबली जाऊच शकत नाही. इस्लामी कायद्यात अशी कोणतीही गोष्ट अस्तित्वात नाही, ज्यामुळे असा निष्कर्ष काढणे शक्य व्हावे. इस्लाम जकातच्या रकमेतून शाळा, इस्पितळे वगैरे जनकल्याणाच्या संस्था स्थापन करण्यास रोखत नाही. तसेच अशा रकमेतून सहकारी संस्था व कारखाने निर्माण करण्यातही अडचण असू शकत नाही. दुसऱ्या शब्दांत सांगायचे तर जकातची रक्कम सामाजिक कल्याणाच्या सर्व हितकर कामाकरिता खर्च केली जाऊ शकते. जकातच्या मालातून रोख रकमेचे सहाय्य फक्त वृद्धांना, बालकांना व रुग्णांना दिले जाते आणि इतरांना निर्वाहाची साधने उपलब्ध करण्यासाठी अगर त्यांना हितावह असणाऱ्या योजनाच्या पूर्ततेसाठी असे सहाय्य दिले जाऊ शकते, कारण इस्लामी समाज एक असा समाज आहे ज्यामध्ये निव्वळ जकातीच्या सहाय्यावर सतत निर्वाह करणारा दरिद्री वर्ग आढळून येत नाही.

## इस्लामी समाजाचा आदर्श काळ

माननीय उमर बिन अब्दुल अजीज (र) खलीफा असताना जो काळ होता, तो इस्लामी समाजाचा आदर्श काळ होता. त्या काळात लोकांच्या सुस्थितीची अवस्था अशी होती की जकात गोळा करणाऱ्या शासकवर्गाला गरजुंना हुडकण्यासाठी हिंडावे लागत असे, तरीसुद्धा ते घेण्यास पात्र असलेला माणूस त्यांना सापडत नसे. माननीय उमरबिन अब्दुल अजीज (र) यांनी जकात वसुलीच्या कामावर नेमलेल्या याह्या बिन सईद नावाच्या एका कर्मचाऱ्याचे असे कथन आहे,

'माननीय उमरबिन अब्दुल अजीज (र) यांनी मला जकात वसूल करण्यासाठी आफ्रिकेला धाडले, मी जकात गोळा करुन गरिबांचा शोध केला, पण मला कोणीही गरीब आढळला नाही व जकात घेणारा कोणी गरजूही आढळला नाही, कारण माननीय उमर बिन अब्दुल अजीज (र) यांनी लोकांना सुस्थितित आणून सोडले होते. प्रत्येक समाजात गरीब तसेच गरजू लोक निस्संशय असतातच म्हणून त्यांच्या समस्या सोडविण्यासाठी आवश्यक कायदे अस्तित्वात असणेही अनिवार्य गोष्ट आहे. इस्लामचा वेळोवेळी ज्या जातीसमुहांशी संबंध आला, त्यांची सांपत्तिक स्थितीही भिन्न भिन्न स्तरांची होती. म्हणूनच ज्या कायद्याचे परिणामस्वरुप माननीय उमर बिन अब्दुल अजीज (र) यांना एक आदर्श समाज निर्माण करता आला. असा कायदा इस्लामने निर्माण करणे, अगदी स्वाभाविक होते.

## दान व पुण्य याची वास्तवता

जकात व तिची वास्तवता अशी आहे. या उलट दान व खैरात हे असे द्रव्य असते, जे श्रीमंत व सुस्थितीत असलेले लोक स्वेच्छेने लोकांना देतात. इस्लामने दान-पुण्य, खैरात यांना पसंत ठरविले असून, त्यांना प्रोत्साहन दिले आहे. खैरात वेगवेगळ्या प्रकारे दिली जाऊ शकते. आपल्या माता-पित्यांचे, प्रियजनांचे, नातेवाईकांचे सहाय्य करण्याच्या स्वरुपातही असू शकते. तसेच इतर गरजूंच्या सर्वसाधारण गरजा भागविण्यासाठीही असू शकते, इतकेच नव्हे तर, सत्कर्म व गोड वाणीसुद्धा दान पुण्यात गणले जाऊ शकते.

## दान पुण्य कशासाठी

आपल्या नातेवाईकांना सहानुभूतीच्या व कळवळ्याच्या पोटी जर आपण मदत केली, तर त्यांचा स्वाभिमान अगर भावना दुखावल्या जाऊ शकत नाही हे उघड आहे. आपल्या भाऊबंधाचे अशा प्रकारचे औदार्यपूर्ण वर्तन प्रेमाच्या सहानुभूतीचे फळ असते. अशाच तऱ्हेने आपल्या भावालाच जर कोणीतरी भेट वस्तू देतो अथवा आपल्या नातेवाईकांना भोजनाकरिता आमंत्रण देतो, तेव्हा नंतर ज्याचा तिरस्कार व विरोध करावा अशा प्रकारचा कसलाही अनादर अगर अपमान तो करत नसतो.

## वस्तूच्या स्वरुपात जकात

वस्तुंच्या रुपाने गरजूंना दिल्या जाणाऱ्या दानाच्या संदर्भात तोच नियम व कायदा त्याच्याकरिताही होता, जो इस्लामने आपल्या आरंभाच्या काळात जकातकरिता तयार केला होता. त्या काळी परिस्थिती अशी होती की गरजवंताच्या गरजा भागविण्यासाठी वस्तूंच्या रुपात देणग्या देणे, हेच उचित ठरविले गेले होते. दान केवळ अशाच स्वरुपात दिले जाऊ शकते, असे इस्लामने एखादे तत्त्व आहे, असा निष्कर्ष यावरुन काढला जाऊ शकत नाही. उलट असे दान समाजकल्याणाचे कार्य करणाऱ्या संस्था व संघटनाही वसूल करु शकतात. अशाच तऱ्हेने जकातची रक्कम निरनिराळ्या सार्वजनिक योजना पूर्ण करण्याकरिता इस्लामी शासनालाही दिली जाऊ शकते. इस्लामचा असा दृष्टिकोन आहे की जोवर समाजात गरीब लोक आहेत, तोवर प्रत्येक शासनाने आपली सर्व साधने वापरुन त्यांच्या जीवनास लागणाऱ्या जास्तीतजास्त सुविधा एकत्रित कराव्यात. परंतु समाजात कायमच्या दरिद्री व लाचार वर्ग व्हावा असे इस्लाम कदापिही इच्छित नाही. उलट इस्लामची अशी इच्छा असते की समाजात दरिद्री व लाचार कोणी राहू नये. म्हणूनच आदर्श इस्लामी समाजात जकात घेणारे लोक शोधूनही सापडत नव्हते. म्हणून माननीय

उमर बिन अब्दुल अजीज (र) यांचा काळ इस्लामी समाजाचे असे वैशिष्ट्य उघड करुन दाखवितो की त्यामध्ये दरिद्री व लाचार माणूस शोधूनही सापडत नव्हता. जेव्हा अशी स्थिती निर्माण होईल तेव्हा जकात व दान यांची रक्कम स्वत:चे उदरनिर्वाह करण्यास कोणत्याही कारणामुळे अक्षम असणाऱ्या लोकाकरिता व सार्वजनिक कल्याणाच्या व हिताच्या कामाकरिता खर्च केली जाईल.

## हा उपकार नसून कर्तव्यपूर्ती आहे

इस्लाम लोकांना दान पुण्य व खैरात यावर अवलंबून राहण्याची शिकवण देत नाही. आपल्या राज्यातील असे नागरिक जे स्वत:चे उदरनिर्वाह करण्यास असमर्थ आहेत, अशा नागरिकांना सन्मानजनक आयुष्य कंठण्याकरिता लागणाऱ्या सुखसोई व सवलती गोळा करण्याची जबाबदारी इस्लामी शासनावर टाकण्यात आली आहे. हे खरे आहे. अशा लोकांना सहाय्य करुन इस्लामी शासन त्यांच्यावर उपकार अथवा मेहबरबानी करते असे नसून उलट आपले कर्तव्य पार पाडीत असते.

## उद्योग-व्यवसाय व इस्लाम

या शिवाय, उद्योग करण्याची क्षमता असणाऱ्या सर्व व्यक्तींना उद्योग उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी ही इस्लामी राज्यावर येते. इस्लामी शासनावरील या जबाबदारीचे स्पष्टीकरण इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांच्या खालील हदीसने सुलभ रितीने होते. त्यात असे सांगितले गेले आहे,

"एक माणूस प्रेषित मुहम्मद (स) यांच्याकडे आला व निर्वाहाकरिता मदत मागितली. प्रेषितांनी त्याला एक कुऱ्हाड व एक दोरी देऊन असा आदेश दिला की त्याने जंगलातून लाकडे तोडून व ती विकून आपला उदरनिर्वाह करावा आणि काही दिवसानंतर आपल्या स्थितीविषयी खबर द्यावी."

काही शंकेखोर माणसे या हदीसला केवळ वैयक्तिक बाब म्हणून टाळतील, हे शक्य आहे. कारण वर्तमान शतकाशी तिचा कसलाही संबंध नाही. कारण या हदीसमध्ये कुऱ्हाड, दोरी व एक अगदी बेकार माणूस यांचा उलेख आहे. या उलट वर्तमान युगात आमचा संपर्क व संबंध मोठमोठ्या कारखानदारांशी, लाखावर बेकार मजुरांशी, संघटित शासनांशी व त्यांच्या विभागांशी आहे. अशा प्रकारच्या गोष्टी केवळ मूर्खपणाच्या आहेत, कारण हजारो वर्षांपूर्वी, जेव्हा कारखानदारीचे जगात अस्तित्वही नव्हते, तेव्हा इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांनी या विषयाबाबत गोष्टीं सांगून त्यापासून निर्माण होणाऱ्या समस्या सोडविण्यासाठी, नियम व कायदे

करणे, हे त्यांचे कामच नव्हते. तसे त्यांनी केले असते, तर त्या काळातील कोणीही माणूस त्यांची गोष्ट समजला नसता.

अशी पद्धत अवलंबण्याऐवजी इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांनी मानवी जीवनातील मूलतत्त्वे ठरविणे पुरेसे मानले व ती तत्त्वे जीवनात उद्‌भवणाऱ्या समस्यांची सोडवणूक करताना प्रत्यक्ष व्यवहारात कशी आणावीत हे भविष्य काळातील पिढ्यावर सोडून दिले. जेणेकरुन त्यांनी या मूलतत्त्वाच्या मार्गदर्शनाने जीवनातील बाबींचा तपशीलवार स्वत:च निर्णय ठरवावा.

## इस्लामी राज्याच्या कल्याणकारी जबाबदाऱ्या

वर ज्या हदीसचा आधार दिला गेला आहे, त्यावरुन इस्लामी शासनाच्या खालील जबाबदाऱ्यावर प्रकार पडतो.

१) इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांना (अर्थात इस्लामी शासनातील प्रधानमंत्री) ही जाणीव होती की बेकारांना उद्योग उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी त्यांच्यावर आहे.

२) त्या काळच्या परिस्थितीनुरुप प्रेषित मुहम्मद (स) यांनी त्या माणसाला उद्योग उपलब्ध करुन दिला.

३) प्रेषित मुहम्मद (स) यांनी त्या माणसाला पुन्हा एकदा येवून आपल्या स्थितीची खबर देण्यास सांगितले, ही गोष्टसुद्धा याच जबाबदारीच्या जाणिवेची सूचक आहे.

राज्याच्या प्रधानमंत्र्यांना असलेल्या जबाबदारीच्या जाणिवेची जी झलक इस्लामी जगताला आजपासून तेराशे वर्षापूर्वी दिसली ती वर्तमान काळातील सर्वात आधुनिक अर्थशास्त्रीय व राजनैतिक तत्त्वाशी व सिद्धान्ताशी पूर्णपणे एकरुप आहे.

राज्यातील बेकारांना उद्योग उपलब्ध करुन देता आला नाही तर त्यांचो आर्थिक स्थिती सुधारेपर्यंत त्यांच्या उदरनिर्वाहाचा भार शासनाच्या खजिन्यावर असे. कारण मुस्लिम तर त्यांचा स्वत:चा प्रश्न असो अथवा राज्य व इतर नागरिकांचा, सर्वाशी औदार्यपूर्ण वर्तन करीत आले आहेत.

प्रकरण सहावे

# इस्लाम व स्त्री

पूर्वेकडील देशात सद्या स्त्रियांना पुरुषाइतके समान हक्क देण्याच्या बाबतीत फार जोरदार चर्चा चालू आहे. या चर्चेत स्त्रियांच्या हक्काचे जोरदार समर्थन करणाऱ्या स्त्री पुरुषांत, मुख्यत्वेकरुन उल्लेखनीय तेच लोक आहेत, जे इस्लाम बद्दल काही मूर्खपणाच्या गोष्टी बोलत आहेत व लिहीत आहेत. यापैकी काहीजण केवळ खोडसाळपणाने असे म्हणतात, की इस्लामने सर्व दृष्टीने स्त्री-पुरुषात समानता स्थापन केली आहे व काहीजण आपल्या अज्ञानामुळे व अडाणीपणामुळे असा दावा करतात, की इस्लाम स्त्रीला तुच्छ लेखतो व तिचा बौद्धिक दर्जा कमी आहे असे सांगून तिला खालचे स्थान देतो. ह्यानंतर स्त्रीमध्ये व इतर पशूमध्ये कोणताही फरक उरत नाही म्हणून इस्लाम स्त्रीचा शत्रू आहे. स्त्री ही मुलांना जन्म देणारे एक यंत्र होऊन राहिली आहे. यावरुन हेच सिद्ध होते की इस्लाममध्ये स्त्रीचा सामाजिक दर्जा पुरुषांपेक्षा फारच निकृष्ट आहे. म्हणून पुरुष हा स्त्रीचा शासनकर्ता बनून जीवनातील प्रत्येक क्षेत्रात आपल्या प्रभुत्वाची धमकी व दडपण दाखवीत असतो.

खरे तर हे दोन्हीही समूह इस्लामबद्दल आपले अज्ञान प्रकट करतात किंवा समाजात अराजकता व अशांती पसरुन त्यामध्ये आपल्या दुष्ट उद्दिष्टांची पूर्तता होण्यास मार्ग मोकळा व्हावा, म्हणून जाणूनबुजून खोटे बोलून, सत्य व असत्य यांची भेसळ करतात.

## युरोपातील स्त्रीमुक्ती चळवळ

इस्लाममधील स्त्रीच्या दर्जावर सविस्तरपणे चर्चा करण्याअगोदर आम्ही युरोपच्या स्त्री मुक्ती चळवळीवर एक विहंगम दृष्टी टाकू इच्छितो. कारण आधुनिक पूर्वदेशात आढळून येणाऱ्या सर्व बंडखोर प्रवृत्तीचे मूळ ही चळवळच आहे.

## गत काळातील स्त्रीचा दर्जा

प्राचीन युरोपात किंबहुना सर्व जगभर स्त्रीला कसलाही आदर व प्रतिष्ठा प्राप्त नव्हती. गतकाळातील विद्वान व तत्वज्ञ या संदर्भात स्त्रीला आत्मा असतो किंवा कसे, अशा प्रकारचा विचार करण्यात बऱ्याच काळापर्यंत आपली बौद्धिक शक्ती शिणवीत राहिले. तसेच जर आत्मा आहे तर तो मानवी आहे की जनावराप्रमाणे आहे? जर तो आत्मा मानवी असेल, तर पुरुषांच्या तुलनेत त्याचा सामाजिक दर्जा काय? स्त्री ही जन्मत:च पुरुषांची गुलाम आहे की गुलामापेक्षा तिचा दर्जा थोडा उच्च आहे?

## ग्रीस व रोम

अशी अवस्था की जिच्यात स्त्रीला समाजाच्या केंद्रबिंदूचे महत्त्व प्राप्त होते व असे प्राचीन ग्रीस व रोममध्ये दिसून येते, इतिहासात अल्पकाळापर्यंत जशीच्या तशीच राहिली. परंतु स्त्रीचीही सर्व प्रतिष्ठा व आदर तिच्या स्त्रीत्वाचा आदर किंवा एकूण सर्व स्त्रीवर्गाचा आदर नसून काही मोठमोठ्या शहरात वास्तव्य करणाऱ्या व काही वैशिष्ट्ये प्राप्त असलेल्या स्त्रीयांपुरतेच मर्यादित होते. अशा स्त्रियांना केवळ त्यांच्या स्वगुणामुळेच समाजात प्रमुख भूमिका मिळत असे. त्यांचे हे स्थान काही विलासी लोकांना केवळ मनोरंजनाचे साधन झाले होते म्हणून ते मोकळ्या मनाने त्यांना प्रोत्साहन देत असत, परंतु हा मानसन्मान स्त्री कोठपर्यंतचे पुरुषाच्या भोगविलासाचे साधन होऊ शकते, यावर आधारलेला असून तो स्त्रीच्या स्थानाचा मानसन्मान नव्हता.

## जहागीरदारी काळात

युरोपात स्त्रीचा असा दर्जा कृषी-गुलामीच्या व जहागीरदारी काळातही उरला होता. अदूरदर्शीपणामुळे जगातील झगमगाटाने, स्त्रीची जीवनामध्ये वारंवार फसगत होत आली आहे, व खाणे-पिणे, मुलांना जन्म देणे आणि रात्रंदिवस जनावरासारखे काबाडकष्ट करीत राहण्यास आपले जीवन कर्तव्य मानून, हेच जीवन आहे असे समजू लागली.

युरोपात झालेली औद्योगिक क्रांती तर स्त्रीला अति हाल-अपेष्टांचे व दु:खाचे आमंत्रणच सिद्ध झाली. या वेळी तिला जी दु:खे यातना व हाल अपेष्टा भोगाव्या लागल्या त्यांनी त्यापूर्वीच्या जुलूम व अत्याचाराच्या सर्व कहाणीवर कडी केली होती.

युरोपच्या सार्वजनिक स्वभावधर्म आजतागायत समोर आला आहे तो वक्रपणा व क्रौर्य यांच्या संयोगाने निर्माण झालेली असून, त्यामुळेच युरोप औदार्य व निष्ठा या दोन्ही गुणापासून रिकामा दिसतो. त्याने प्रत्येक ठिकाणी माणसांना कठोर यातनांचे भक्ष बनविले, परंतु तसे करुनही त्यांना मोबदल्यात कसलाही तात्कालिक किंवा दीर्घकालीन भौतिक लाभ झाला नाही.

गुलामी व जहागीरदारीच्या काळात कोणत्याही प्रकारे स्थिती काहीशी अशी होती व त्या काळाची कृषी पद्धत काही अशी होती, की पुरुषालाच स्त्रीच्या सर्व खर्चाचा भार वाहावा लागत असे. त्यावेळच्या परिस्थितीत स्वभावानुसार हे ठीक होते; परंतु त्या वेळीही स्त्री काही अशा गृहउद्योगात व घरगुती कामात सहभागी असे. ते प्रत्येक कृषिप्रधान समाजात आढळतात जणू असे घरगुती उद्योग करुन ती पुरुषांना तिच्याकरिता वाहाव्या लागणाऱ्या खर्चाच्या भाराचा मोबदला देत होती.

## औद्योगिक क्रांतीनंतर

औद्योगिक क्रांतीनंतर खेडी काय व शहरे काय सर्वत्र परिस्थिती बदलली. कौटुंबिक जीवन संपुष्टात आले व कुटूंबियांना एकमेकांशी जोडणारे नातेही नष्ट झाले. कारण औद्योगिक

क्रांतीने आणलेल्या परिवर्तनानंतर पुरुषांबरोबरच स्त्रियांना व मुलांनाही घरदार सोडून कारखान्याची वाट धरावी लागली, जेणेकरून त्यांना नोकरी करुन आपला उदरनिर्वाह करणे शक्य व्हावे. श्रमिक लोक हळूहळू खेडी सोडून शहराकडे येवू लागले, ग्रामीण जीवनात जबाबदारीच्या, मदत करण्याच्या भावनेचा व सहकार्याचा आत्मा आढळत असे; पण आता शहरी जीवनाशी त्यांना झगडावे लागले. कोणीकोणाची विचारपुस करीत नव्हते, तसेच कोणालाही दुसऱ्याशी, इतकेच नव्हे तर शेजाऱ्याशीही कसले व स्वारस्य नव्हते. स्वत्व हेच प्रत्येक माणसाच्या जीवनाची धुरा होती व त्याखेरीज माणसांना कशातही स्वारस्य नव्हते व स्वत:खेरीज इतर कोणाचाही भार सहन करण्यास तो तयार नव्हता. शहरामध्ये कोणताही नैतिक नियम नव्हता, तसेच कसल्याही नैतिक तत्वाच्या बंधनाचा विचारही नव्हता. म्हणून कामवासनेची व स्त्रीपुरुषांच्या लैंगिक संबंधाची अशी जोरदार साथ पसरली की, स्त्री व पुरुष आपली कामवासना भागविण्यासाठी मिळेल त्या सर्व संधीचा लाभ घेऊ लागले. याचा एक परिणाम असा झाला की लोकांमध्ये विवाह करुन कुटुंब करण्याची इच्छा क्षीण होत गेली व ज्यांची तसे करण्याची इच्छा होती, त्यांनासुद्धा असे वाटे की हे संकट आणखी लांबणीवर पडले तर अधिक बरे?

अशा प्रकारच्या पुराव्यावर विश्वास ठेवून भौतिकवादाचे तसेच मार्क्सवादाचे ध्वजवाहक असा दावा करतात, की केवळ आर्थिक परिस्थितीच सामाजिक परिस्थिती निर्माण करते व मानवाचे संबंध ठरवितात. इस्लामी जीवनात आम्हाला अर्थशास्त्राच्या महत्वाचा इन्कार नाही, परंतु केवळ आर्थिक तत्वेच माणसांचे विचार, भावना व कार्यपद्धत घडवितात, असे म्हणणे चूक आहे. युरोपमध्ये अर्थशास्त्राला जे असाधारण महत्त्व प्राप्त झाले याचे खरे कारण असे की युरोपजवळ दुसरे श्रेष्ठ व उच्च असे ध्येय नव्हते. इस्लामी जगताप्रमाणे युरोपला आध्यात्मिक उच्चतेशी परिचित करणे व तेथील आर्थिक प्रश्नांची घडी शुद्ध मानवतेच्या मूळपायावर उभारुन ती मजबूत होण्यास मदत करणे शक्य झाले असते तर केवळ युरोपचेच सर्व आर्थिक व भौतिक प्रश्नाची सोडवणूक झाली असती असे नाही तर शेष जगातील लोकही युरोपियनांच्या मर्यादेबाहेर वाढलेल्या हव्यासाला, लोभाला व शोषणाला बळी पडले नसते.

## स्त्रीचे वास्तव्य व वंचितपणा

येथे युरोपच्या इतिहासावर सखोल चर्चा करण्याचा आमचा उद्देश नाही. आम्ही याअगोदर असे म्हटले आहे की औद्योगिक क्रांतीमुळे स्त्रियांवर व मुलावर कमाई करण्याची जबाबदारी येऊन पडली व त्यामुळे कौटुंबिक नाते कमकुवत बनून ते विस्कटले गेले. परंतु या क्रांतीत जास्त दु:खे स्त्रीलाच भोगावी लागली. म्हणून स्त्रीचे भाग्य घडविण्याच्या दृष्टीने महत्त्व असणाऱ्या युरोपियन इतिहासातील तत्त्वाशीच आम्हाला स्वारस्य आहे. तिला आता पूर्वीपेक्षा कितीतरी अधिक कष्ट करावे लागत. तिचा स्वाभिमान व प्रतिष्ठा लोप पावले होते. इतके करुनही

स्त्री मानसशास्त्राच्या अगर भौतिकशास्त्राच्या दृष्टीने सुखी नव्हती. पुरुषाने मातांचे तसेच पत्नींचेही आर्थिक सहाय्य करण्याचे नाकारले, एवढेच नसून उलट तिची कमाई तिने स्वत:च करण्याची जबाबदारी तिच्यावर टाकली. याशिवाय ती कारखानदाराच्या अत्याचारालाही बळी पडली होती. तिला कष्ट अधिक करावे लागत पण मजुरीचे दर पुरुषापेक्षा कमी मिळत.

## युरोपियन स्त्रीच्या हालअपेष्टांचे खरे कारण

ज्याला कंजुषपणा, क्रूरपणा व बेमुर्वतखोरपणा म्हणता येईल असा युरोपचा सामाजिक स्वभावधर्म नजरेसमोर ठेवला, तर स्त्रीशी केल्या गेलेल्या त्या व्यवहाराचे कारण समजणे कठीण होत नाही. त्यांनी कधी माणसाला, माणूस या दर्जाने आदर व सन्मान दिला नाही व त्यांच्या हातून कधी कोणाचे कल्याण झाले नाही. उलट त्यांचे स्वत:चे नुकसान होण्याचा संभव नसेल तर प्रत्येक संधी हाती येताच त्यांनी दुसऱ्याचे नुकसान करण्याचे प्रयत्न केले होते. युरोपचा ह्या स्वभावधर्मात भविष्यकाळातही परिवर्तन होण्याचा संभव नाही. होय, जर अल्लाहने त्यांच्यावर कृपादृष्टी करुन त्यांना सत्यमार्गाने जाण्याचे भाग्य प्रदान केले व त्यांना आत्म्याचे पावित्र्य दिले तरच अधिक चांगली अवस्था होण्याची आशा केली जाऊ शकते. ज्या काळाचा आम्ही उल्लेख करीत आहोत त्या काळात जुलमी कारखानदारानी निर्बल बालकांना व स्त्रियांना निस्संकोचपणे आपल्या जुलूम, अत्याचार व अन्यायाला बळी दिले होते.

## समाजसुधारक व स्त्री

काही स्वाभिमानी लोकांना वस्तीतील कमकुवत वर्गावर केले जाणारे हे अन्याय व अत्याचार फार दिवस सहन झाले नाहीत. म्हणून त्यांनी त्यांच्याविरुद्ध आवाज उठविला. बालकांवरील (स्त्रियावरील नव्हे) अमानुषपणा व कौर्य बंद करण्याचे प्रयत्न सुरु केले गेले. या समाज सुधारकांनी अल्पवयीन मुलांना कारखान्यात नोकरी ठेवण्यास विरोध केला. कारण तसे केल्याने त्यांचा स्वाभाविक विकास खुंटतो व मजुरीच्या जो आपल्या मोबदला त्यांना मिळत असे तो त्यांना कराव्या लागणाऱ्या कठीण व अनुचित कामाच्या मानाने अपुरे असे. सामाजिक अन्यायाविरुद्ध हा विरोध परिणामकारक ठरला. म्हणून नोकरीची वयोमर्यादा वाढविण्यात आली, मजुरीचे दर वाढविण्यात आले व कामाचे तास कमी केले गेले.

परंतु स्त्री अद्याप अत्याचाराची बळी होती. तिच्यावतीने आवाज उठवणारे कोणी नव्हते व तिच्या हक्काचे रक्षण करण्याची कोणाला काळजी नव्हती. कारण त्यासाठी जे आत्म्याचे पावित्र्य व नैतिक श्रेष्ठपणा आवश्यक असतो त्याचा युरोपात अभाव होता. म्हणूनच स्त्रीच्या नष्टचर्याचे दिवस संपले नाहीत. तिला रात्रंदिवस काबाडकष्ट करावे लागत तेव्हा कोठे ती आपले पोट भरु शकत होती. कारण तशाच कामाचा पुरुषाला जेवढा मोबदला मिळे त्यापेक्षा फारच कमी मोबदला स्त्रीला मिळे.

## जागतिक महायुद्धाचे परिणाम

पहिल्या जागतिक महायुद्धात युरोप व अमेरिकेतील लाखो पुरुष ठार झाले व त्यांच्या मागे उरलेल्या त्यांच्या विधवांना अनेक आपत्तींना व संकटांना तोंड द्यावे लागले. त्यांना कसलाही आधार नव्हता. जे लोक त्यांचे पाठीराखे होते व ज्यांच्या संरक्षण छत्राखाली त्यांनी आपले जीवन कंठावे अशा लोकांपैकी काही ठार झाले होते. काही लोक भय, ताण व विषारी वायुमुळे कायमचे निरुपयोगी करुन टाकले होते. काही कित्येक वर्षे तुरुंगवास भोगून नुकतेच सुटून आले होते व आपला ढळलेला मानसिक समतोल परत प्राप्त करण्याकरिता स्वत:ला जगातील आकर्षणामध्ये हरवू इच्छित होते. लग्ने करण्याची त्यांची इच्छा नव्हती, कारण लग्न करुन शारीरिक कष्ट व भौतिक गरजांच्या कटकटीत अडकवून घेण्याची त्यांची स्वत:ची तयारी नव्हती.

## स्त्री व असहाय्यपणा

युद्धामुळे पुरुषांच्या संख्येत जी ठळक उणीव निर्माण झाली होती. तिची भरपाई जिवंत उरलेल्यांनी करणे त्यांच्या आवाक्याबाहेरचे होते. मजुरांच्या व कामगारांच्या कमतरतेमुळे कारखान्याच्या उत्पादनावर फार वाईट परिणाम झाला व त्यामुळे युद्धात झालेले नुकसान भरुन काढणे अशक्य झाले. म्हणून स्त्रियांना विवश होऊन घराबाहेर पडून पुरुषांच्या जागा घ्यावा लागल्या, त्यांनी तसे केले नसते तर त्या स्वत:व त्यांच्यावर अवलंबून असणाऱ्या वृद्ध स्त्रिया व मुले अन्नाशिवाय तडफडून भुकेने मरुन गेली असती. परंतु कारखान्यात जाऊन काम करण्याचे परिणामस्वरुप स्त्रीला आपले चारित्र्य, वर्तन तसेच आपले शील अर्पण करावे लागले. कारण ते तिच्या प्रगतीच्या मार्गात अडसर बनले होते. हे जर जतन केले असते तर तिला मोकळेपणाने चरितार्थ मिळवणे कठीण झाले असते. त्यांना फक्त काम करणारे हातच हवे होते असे नव्हे तर त्यांची कामवासना शमविण्याची साधनेही त्यांना हवी होती. ज्या प्रकारच्या विवशतेने स्त्री वेढली गेली होती तिने, या लोकांना आपली कामवासना तृप्त करुन घेण्याची नामी संधी मिळवून दिली व त्या संधीचा त्यांनी पुरेपूर लाभ घेतला. अशा तऱ्हेने कारखान्यात काम करण्याची व कारखानदारांना खूष ठेवण्याची दुहेरी जबाबदारी बिचाऱ्या स्त्रियावर येऊन पडली. आता फक्त भूक भागवणे एवढीच स्त्रीची समस्या उरली नसून आपली कामवासना व संभोगेच्छा तृप्त करणे हा अति गंभीर प्रश्न बनला. युद्धामुळे पुरुष मोठ्या संख्येत नष्ट झाल्याने प्रत्येक स्त्रीला विवाहबद्ध होऊन उचित रीतीने आपली कामवासना शमविणेही अशक्य होते. दुसरीकडे युरोपमध्ये प्रचलित असलेल्या धर्मात इस्लामने अडचणीच्या काळात आयोजित केलेली बहुपत्नित्वाच्या पद्धतीला ही वाव नव्हता. याची फलनिष्पत्ती अशी झाली की बिचारी युरोपियन स्त्री आपल्या इच्छा वासनाच्या कृपेवर सोडण्यात आली. एका बाजूला उंची पोषाख, सौंदर्य प्रसाधने व साजशृंगार करण्याची इच्छा, या सर्व गोष्टीत गुरफटून ती एका विशिष्ट मार्गाने जाऊ लागली.

युरोपीयन स्त्रीला आता फक्त एकच काम उरले होते व ते म्हणजे पुरुषांचे मनोरंजन करणे, कारखान्यात व दुकानातून नोकरी करणे आणि आपल्या इच्छा वासनांची तृप्ती सर्व उचित अनुचित मार्गाने करणे. परंतु जसजशी तिची साधन संपत्ती वाढत गेली तसतशी तिच्या वासनांची लालसा व हव्यासही वाढत गेला. या वाढलेल्या वासनांची तृप्ती करण्यासाठी जास्तीतजास्त वेळ कारखान्यात देऊन कमाई करणे हा एकच मार्ग शिल्लक होता. कारखानदारांनी स्त्रीच्या या कमकुवतपणाचा भरपूर फायदा घेतला व उघड उघड अन्याय करुन पुरुषांपेक्षा त्यांच्या कामाचा मोबदला फार कमी ठेवला, जेणेकरुन जास्तीतजास्त नफा त्यांना मिळावा.

अशा अवस्थेत ती महान क्रांती घडून येणे, अगदी स्वाभाविक होते व त्या क्रांतीने जुलूम व अत्याचारावर आधारलेल्या शतकानुशतका पूर्वीच्या या जुनाट पद्धतीचा शेवट करून टाकला.

## सामाजिक क्रांतीनंतर

या क्रांतीने स्त्रीला काय मिळाले? शारिरीक दृष्टीने आता ती पूर्वीपेक्षा अधिक थकलेली होती. समाजात तिला कसलीही प्रतिष्ठा नव्हती. ती आपले शीलही गमावून बसली होती. आता तिचे कुटुंब नव्हते व ज्याच्याकरिता सर्व प्रकारचे त्याग करून आपल्या व्यक्तित्वाला महानता प्राप्त व्हावी व मनाला वास्तविक समाधान प्राप्त व्हावे. या क्रांतीचा फायदा मात्र असा झाला की तिला पुरुषा इतकाच मजुरीचा दर मिळाला व एवढाच काय तो वास्तविक हक्क युरोप आजपर्यंत स्त्रीला देवू शकला नाही.

युरोपातील पुरुष इतक्या सहजपणे आपला सर्वश्रेष्ठपणा सोडावयास तयार नव्हता व स्त्रीच्या तुलनेत तो आपल्या अहंकाराचा पराजय मान्य करण्यास तयार नव्हता. स्त्रीच्या समानतेचे तत्वही त्याने एका दीर्घकाळ चाललेल्या तीव्र संघर्षानंतर स्वीकारले व असा प्रयोग सर्व साधारणपणे युद्धामध्ये केला जात असे.

आपल्या हक्काखातर केलेल्या या संघर्षात स्त्रीला संपही करावे लागले, तसेच सहकार्य व परस्पर सहाय्य यांचेही प्रदर्शन करावे लागले. या उद्दिष्टाकरिता स्त्रीने सभासंभेलने भरविली, तसेच वृत्तपत्राचाही उपयोग केला, मग यानंतर हे समजले की सुधारणा करण्यासाठी स्त्रीला पुरुषाबरोबर देशातील कायदे करण्यातही समान हिस्सा घेतला पाहिजे. म्हणून अगोदर मतांचा हक्क मागितला गेला व मग हळूहळू हा आवाज इतका वाढत गेला की स्त्रीला पार्लमेंटचे सभासदत्व मिळाले पाहिजे. जीवनातील कर्तृत्वामध्ये स्त्री व पुरुषांत कसलाही भेदभाव न मानणाऱ्या शिक्षण पद्धतीत वाढ, त्यामुळे पुढे पुढे स्त्री पुरुषाबरोबर समान राजकीय हक्काची मागणी करु लागली.

युरोपमध्ये स्त्रीला आपल्या हक्काकरिता कराव्या लागलेल्या संघर्षांची ही अशी कहाणी आहे. आपसात गुंतागुंत असलेल्या अनेक घडामोडींतूनच या कहाणीची गुंफण झालेली आहे. पुरुषांना ही नवी अवस्था पसंद आहे किंवा नाही हा प्रश्न बाजूला ठेवून कसल्याही परिस्थितीत

स्त्रीला हे लवकरच कळून चुकले की या बिघडलेल्या समाजाचे नेतृत्व तर तिने पुरुषाकडून यशस्वीरितीने हिरावून घेतले, परंतु त्यात पुरुषाइतकीच स्त्रीही विवश होती.

वाचकाना हे ऐकून आश्चर्य वाटेल की, लोकशाहीचे माहेरघर म्हटल्या जाणाऱ्या तसेच तेथील स्त्रीची प्रगती अनेक प्रतिष्ठित महिलांना पार्लमेंटचे सभासदत्व मिळण्यापर्यंत झाली आहे, त्या इंग्लंडमध्ये आजसुद्धा सरकारी खात्यामध्ये स्त्रीला पुरुषापेक्षा कमी वेतन दिले जाते. अशाप्रकारच्या घटनांच्या पुराव्याच्या आधारावर मार्क्सवादी असे प्रतिपादन करतात की केवळ आर्थिक तत्त्वच जीवनातील मूळतत्त्व आहे, जे युरोपातील स्त्रीमुक्ती आंदोलनाने सिद्ध केले. या पुस्तकात एके ठिकाणी आम्ही यापुर्वी असे लिहिले आहे की आम्ही जीवनात धनसंपत्तीचे महत्वाचा इन्कार करीत नाही, परंतु हे मात्र चांगले जाणतो की हर प्रकारच्या परिस्थितीत स्त्रीच्या उदरनिर्वाहाची व पोषणाची जबाबदारी पुरुषावर टाकणारी अगर विवशतेमुळे स्त्री काम करुन कमाई करण्यास बाहेर पडली व तिला पुरुषाइतकेच वेतन मिळवून देणारी इस्लामी व्यवस्था आहे. त्याचप्रमाणे संकटकाळातील अडचणींना हातावेगळे करण्यासाठी व समाप्त करण्यासाठी आणि त्यामुळे स्त्रीला केवळ आर्थिक संरक्षणच मिळते असे नाही. युद्धानंतरच्या काळात आपली कामवासना उचित, नैतिक व स्वच्छ तऱ्हेने भागविण्याकरिता मार्ग उपलब्ध करुन देणारी इस्लामसारखे एखादे ध्येय व जीवनपद्धत जर युरोपवासीयांजवळ असती तर तेथील स्त्रीच्या समस्येमध्ये अशी गुंतागुंत झाली नसती.

इस्लाम स्त्रीला समाजात कोणते स्थान देतो ते पाहू या आणि त्या सामाजिक स्थानाबरोबरच अशी एखादी ऐतिहासिक भौगोलिक, आर्थिक, तात्त्विक व कायद्याची विवशता, जिच्यामुळे येथील स्त्रीपुढे तिच्या पाश्चिमात्य भगिनींना करावा लागला तसा संघर्ष आपल्या हक्काकरिता करण्याखेरीज दुसरा पर्याय आहे की नाही हेही पाहू या. त्यानंतरच आम्ही पूर्वीच्या स्त्री हक्काची ध्वजा धारण करणाऱ्याचा सध्या जो गाजावजा व कल्लोळ तसेच सभासंमेलने एखाद्या सत्यावर आधारलेले आहेत की तो केवळ तिच्या हीन अभिरुचीचाच चमत्कार आहे.

## इस्लामचे बहुमूल्य वैशिष्ट्य-समानता

इस्लामी जीवनपद्धतीचे बहुमूल्य वैशिष्ट्य असे आहे, की तो स्त्रीला पुरुषाइतकेच मानवतेमध्ये अंग असल्याचे मानतो जसे तो पुरुषासारखाच आत्मा स्त्रीलाही असल्याचे मानतो.

म्हणून कुरआन मजीदमध्ये असे सांगितले आहे,

“हे लोकांनो ! ज्याने तुम्हाला एकाच जीवापासून निर्माण केले व त्यापासूनच स्त्री पुरुषांची जोडी निर्माण केली व त्यापासूनच अनेक पुरुष व स्त्रिया पसरविल्या, त्या आपल्या पालनकर्त्यांचे भय बाळगा.” (कुरआन ४:१)

आपल्या आरंभबिंदूच्या उत्पत्तीस्थानाच्या तसेच अंत व परिणामाच्या दृष्टीने स्त्री व पुरुषांना समान हक्क प्राप्त असतात. इस्लामने स्त्रीला पुरुषाप्रमाणेच जिवंत राहण्याचा, आदर-सन्मानाचा तसेच धन व संपत्तीचे अधिकार दिले आहेत. त्याने स्त्रीचा जीव आदरणीय असल्याचे घोषित केले, तसेच कोणीही परस्पर स्त्रीची निंदा करावी हे अनुचित ठरविले. त्याचप्रमाणे स्त्रीला आपल्या देखरेखीखाली ठेवण्याचा व स्त्रीकर्तव्ये करावी लागल्यामुळे तिला तुच्छ लेखण्याचाही कोणाला अधिकार दिला नाही. हे सर्व हक्क पुरुषाप्रमाणेच स्त्रीलाही प्राप्त आहेत. त्या बाबतीत स्त्री-पुरुषांत कसलाही भेदभाव नाही. उलट या संदर्भातील प्रस्तुत कायदे दोहोंवर समान रितीने लागू होतात.

'हे श्रद्धावंतांनो ! पुरुषांनी पुरुषांना हसता कामा नये, तसेच स्त्रियांनी स्त्रियांना हसता कामा नये, कारण ते (ज्यांना आम्ही हसतो) त्यांच्यापेक्षा (अल्लाहजवळ) अधिक भले असतील तर त्यात आश्चर्य काय? म्हणून एकमेकांना टोमणे व दुषने देवू नका, वाईट नावाने अगर उपाधिने कोणाला बोलावू नका, अहंकारात राहू नका व कोणीही कोणाची चहाडी चुगली करू नका.' (कुरआन ४९:११)

'हे श्रद्धावंतांनो ! स्वत:च्या घराखेरीज इतरांच्या घरात त्यांची परवानगी प्राप्त होईपर्यंत व त्यांच्या कुटुंबियाला सलाम करेपर्यंत प्रवेश करु नका.' (कुरआन २४:२७)

'एका मुस्लिमांने दुसऱ्या मुस्लिमांचे रक्त, अब्रू व संपत्ती घेणे निषेधाई व मनाई केलेले आहे.' (बुखारी, मुस्लिम)

त्याचप्रमाणे परलोकमध्ये सत्कर्माच्या मोबदल्याच्या दृष्टिने ही इस्लामने स्त्री व पुरुष समान असल्याचे म्हटले आहे.

अल्लाहचे सांगणे असे आहे,

'म्हणून त्यांच्या पालनकर्त्यांनि, त्यांची करुणा व प्रार्थना मान्य केली. मी तुमच्यापैकी कोणाचेही कृत्य निष्फळ करीत नाही, मग तो पुरुष असो की स्त्री असो तुम्ही परस्पर एकदुसऱ्याचे अंग आहात.' (कुरआन ३:१९५)

## संपत्तीच्या हक्कात समानता

धन व संपत्तीच्या हक्काच्या बाबतीतही इस्लामने स्त्री पुरुषांतील समानता लक्षात ठेवली आहे, म्हणून स्त्री तसेच पुरुष आपल्या मालमत्तेची खरेदी-विक्री किंवा तिची देखरेख करण्यास अगदी स्वतंत्र असतात. त्याना वाटेल त्यास ते आपली मालमत्ता गहाण, भाड्याने, वारसाहक्काने विक्री करून देऊ शकतात, किंवा अधिक जमीन खरेदी करण्याचे एक साधन बनवू शकतात, किंवा आपल्या गरजा भागविण्यासाठी तिचा उपभोग घेऊ शकतात. या सर्व बाबतीत स्त्री व पुरुषांचे हक्क समान आहेत.

'पुरुषांचाही वाटा आहे, त्या वस्तूत जिला आई-वडील अगर जवळचे नातेवाईक आपल्या पश्चात सोडतात व स्त्रियांचाही वाटा आहे, त्या वस्तुत जिला आईवडील अगर जवळचे नातेवाईक आपल्या पश्चात सोडतात.' (कुरआन ४:७)

'पुरुषांसाठी त्यांच्या कर्माचे फळ आहे, व स्त्रियासाठी त्यांच्या कर्माचे फळ'.

(कुरआन ४:३२)

## युरोप व मालमत्तेचा हक्क

स्त्रीच्या संपत्तीच्या हक्काबाबत व त्यांच्या स्वतंत्र उपभोगाबाबत, आम्हाला दोन गोष्टी लक्षात ठेवल्या पाहिजे.

'सुसंस्कृत' युरोपच्या कायदा पद्धतीत आजपर्यंत स्त्रीला मालमत्तेचा कसलाही हक्क नव्हता. कायदेशीर रितीने आपल्या हक्काचा प्रत्यक्ष उपभोग घेण्याचा हक्कही नव्हता; उलट अप्रत्यक्षपणे कोणाही पुरुषांच्या बाप, पति अगर पालक या माध्यमातूनच या मालमत्तेचा उपभोग घेत असे.

दुसऱ्या शब्दांत सांगायचे असे, की इस्लामकडून स्त्रीला हे सर्व हक्क व अधिकार प्राप्त झाल्यानंतर सुद्धा अकरा शतकाहून अधिक काळपर्यंत युरोपातील स्त्री आपल्या त्या सर्व हक्कांपासून वंचित होती. तो हक्क प्राप्त करण्यासाठी तिला संघर्ष करावा लागला व त्यामध्ये तिचे स्त्रीत्व, तिचा मान व प्रतिष्ठा व तिची अब्रू व शील सुरक्षित राहिले नाही. तिला या सर्वांचा बळी देणे भाग पडले, एवढेच नव्हे तर कठोर यातना, हत्याकांड, हलाखी, दारिद्रय व दुर्भाग्याचा एका करुणाजनक प्रक्रियेतून जावे लागले. इतके करुन इस्लामने स्त्रीला फार फार पूर्वी जे हक्क व अधिकार दिले तेव्हा तिला स्वतंत्र दर्जा कदापिही नव्हता. तिला स्वतंत्र माणसाचा दर्जा तेव्हा प्राप्त झाला जेव्हा ती आर्थिकदृष्ट्या स्वतंत्र झाली व तिला हवा तसा उपयोग करु लागली.

## स्त्रीचा स्वतंत्र दर्जा

ज्यामुळे मानवी जीवन जनावराप्रमाणे आर्थिक पातळीवर मोजले जाऊ लागते, तो कम्युनिस्टांचा अगर भांडवलवाद्यांचा मानव जीवनासंबंधी असलेला दृष्टिकोन जरी आम्ही मानला नाही, तरी आमची कम्युनिस्टांच्या व पाश्चिमात्य विचारवंतांच्या या विचाराशी तात्त्विक सहमती आहे, की माणसाच्या विचारांवर, भावनावर व त्याच्या स्वाभिमानाच्या प्रगतिवर सुदृढ आर्थिक स्थितीचा खोलवर ठसा उमटतो व परिणामकारक होतो. माध्यमाविना आपल्या मालमत्तेचा हवा तसा उपयोग करण्याचा अधिकार प्रदान करून या दृष्टीने इस्लामने एक स्वतंत्र शान मिळविली आहे. एवढेच नाही तर स्त्री जीवनातील सर्वांत महत्त्वाचा प्रश्न विवाहच्या बाबतीत स्त्रीचा स्वतंत्र दर्जा ठरवून टाकला व हे घोषित करुन टाकले की स्त्रीच्या इच्छेविना तिच्याशी विवाह

करता येणार नाही. विवाह विधिचे पावित्र्य राखण्यासाठी स्त्रीची संमती एक आवश्यक अट आहे. इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांचे असे सांगणे आहे,

'कोणत्याही विधवेचा विवाह तिच्या संमतीविना केला जाऊ नये व कोणत्याही कुमारीकेचा विवाह तिच्या संमतीविना करु नका. तिचे मौन तिची संमती आहे.'

(बुखारी, मुस्लिम)

इस्लामने स्त्रीच्या अनुमतीला इतके महत्त्व दिले की विवाहानंतरही एखाद्या स्त्रीने जर म्हटले, की तिचा विवाह तिच्या संमत्तीने झालेला नाही तर तो विवाह (निकाह) मोडतो.

## वेगळे होण्याचा अधिकार

इस्लामच्या पूर्वी, एखाद्या स्त्रीला जर पतीपासून वेगळे होण्याचा वा घटस्फोट घेण्याची इच्छा झाली तर तिला अनुचित व चुकीच्या मार्गाचा अवलंब करणे भाग पडत होते. देशातील कायद्यात घटस्फोटाची तरतूद नव्हती म्हणूनच ती पतीच्या अधीन असून पतीला तिच्यावर सर्वाधिकार प्राप्त होता. इस्लामने स्पष्ट शब्दांत स्त्रीला हा अधिकार दिला, की तिने हवा तेव्हा या अधिकाराचा उपयोग करावा. उलट एक पाऊल पुढे टाकून त्याने स्त्रीला असा अधिकार दिला, की तिने आपल्या मर्जीने विवाह करावा व आपल्याला पसंत असलेला संदेश पाठवावा. युरोपात फार फार नंतर, अठराव्या शतकात जेव्हा स्त्रीला हा अधिकार प्राप्त झाला तेव्हा त्याला प्राचीन परंपरेवर मिळालेला मोठा विजय असे म्हटले गेले.

## ज्ञान प्राप्त करण्याचा हक्क

जेव्हा जगात अज्ञान व अंधकाराचे युग होते, तेव्हा इस्लामच असा धर्म होता, ज्याने मानवजातीकरिता ज्ञानाच्या महत्त्वावर जोर दिला व ज्ञान मिळविणे हे कोणा एका विशिष्ट वर्गाचा अधिकार असल्याचे घोषित केले नाही. उलट सर्वांची ती एक अनिवार्य निकडीची गरज आहे असे दाखवून दिले. सर्व मुस्लिमांना ज्ञान प्राप्त करणे ही इस्लामच्या आवश्यक अटींपैकी एक व श्रद्धा प्राप्त करण्यासाठी एक आवश्यक अट असल्याचे ठरवून टाकले. इस्लामने स्त्रीचे स्वतंत्र अस्तित्व व दर्जा घोषित करुन ज्ञानाविना तिच्या व्यक्तिमत्त्वाचा पूर्ण विकास अशक्य आहे हे दाखवून दिल्याचे श्रेयही इस्लामला प्राप्त आहे. ज्ञान प्राप्त करणे हे जसे पुरुषांचे कर्तव्य आहे; तसेच ते स्त्रीचेही आहे. कारण इस्लाम असे इच्छितो की स्त्रीने आपल्या शारीरिक विकासाबरोबरच आपला बौद्धिक तसेच आध्यात्मिक विकासही करावा; जेणेकरून तिला अधिक चांगले जीवन जगणे शक्य व्हावे. या उलट युरोपने आजतागायत स्त्रीला या प्रकारचा कोणताही हक्क देण्याचे मान्य केले नाही व आर्थिक परिस्थितीने अगदी हतबल होऊन निसटून जाण्याचा कोणताही मार्गच उरला नाही, त्याच वेळी युरोपने स्त्रीचा हा अधिकार मान्य केला.

वर जे काही सांगितले गेले आहे ते या असत्याचे हे आवरण फाडून टाकण्यास अगदी पुरेसे आहे, की इस्लाम स्त्रीला दुय्यम दर्जाचा जीव मानतो. तिला पुरुषाच्या अधीन व ताब्यात ठेवू इच्छितो, अथवा इस्लामच्या दृष्टीने तिच्या जीवन कर्तृत्वाचे मुळात कसलेही महत्त्वच नाही. या आरोपात थोडे जरी तथ्य व सत्य असते तर इस्लामने स्त्रीसाठी ज्ञानाच्या आवश्यकतेवर इतका भर कधीही दिला नसता. स्त्रीच्या ज्ञानार्जनावर इतका भर दिल्याने हेच स्पष्ट होते की इस्लामच्या दृष्टीने स्त्रीला इस्लामी समाजामध्ये त्याचप्रमाणे परमेश्वरापाशी एक उच्च आदरणीय स्थान व दर्जा प्राप्त आहे.

## स्त्री व पुरुषातील भेदाचा आधार

मानवी दर्जाने स्त्री व पुरुषात संपूर्ण समानता मानल्यानंतर व त्यांना समान अधिकार असल्याचे घोषित केल्यानंतर जीवनातील त्यांच्या कार्य व कर्तव्यातील फरकाकडे इस्लाम डोळेझाकही करीत नाही. काही स्त्री संघटना व त्यांचे समर्थन करणारे साहित्यिक, तसेच समाजसुधारक व युवक संघटना, इस्लामविरुद्ध जो आरडाओरडा करतात, त्यांचे खरे कारण इस्लामी विचारप्रणालीच आहे.

ज्या पैलूने इस्लाम स्त्री व पुरुषातील फरक मानतो, त्यावर दृष्टीक्षेप टाकण्यापूर्वी शरीरशास्त्र व त्याचे औषधोपचार शास्त्र, तसेच मानसशास्त्राच्या दृष्टीने मूलभूत समस्यांचा अभ्यास करु या. यानंतर आम्ही इस्लामी दृष्टिकोन प्रस्तुत करु.

## मूळ समस्या

स्त्री व पुरुष एकाच वर्गापैकी आहेत की वेगवेगळे आहेत? हा प्रश्न जरी गुंतागुंतीचा असला तरी त्यावरच स्त्री-पुरुषाच्या समस्यांच्या वास्तविक सोडवणुकीचा मार्ग आधारित आहे. ज्या स्त्री संघटना व त्यांचे समर्थक साहित्यिक, समाजसुधारक व युवक असे समजतात की स्त्री व पुरुषांच्या शारीरिक व बौद्धिक रचनेत कसलाही फरक आढळत नाही व जीवनातील त्यांचे नैतिक कर्तव्य समान आहे, त्यांना काही सांगणे तर व्यर्थच आहे. जे लोक स्त्री-पुरुषांच्या शारीरिक रचनेत व त्यांच्या जीवनकार्यात फरक असल्याचे मानतात, त्यांच्याशी आताही या समस्येवर लाभप्रद व फलदायी चर्चा केली जाऊ शकते. दोन्ही वर्गांतील समतेच्या प्रश्नावर सखोल चर्चा "अल इन्सानु बैनलमाद्दीयती बल इस्लाम" या पुस्तकात आहे. या चर्चेतील काही उदाहरणे येथील उपयुक्ततेच्या दृष्टीने खाली दिले आहेत.

## कार्यालय व उद्देशातील फरक

'दोन्ही वर्गांच्या कार्यातील व उद्देशातील मूलभूत भिन्नतेचाच हा चमत्कार आहे की आपल्या स्वभावाच्या व शारीरिक रचनेच्या दृष्टीने, पुरुष व स्त्री परस्परांहून अशा प्रकारे भिन्न बनलेले आहेत की ते आपापले बहुमूल्य जीवनकार्यच चांगल्या तऱ्हेने पार पाडू शकतात.'

'हेच कारण आहे की मी आजपर्यंत समजण्यास विवश आहे की स्त्री पुरुषात पूर्ण समतेवर पोकळ भाषणे करण्याने वास्तवाच्या जगात या समतेला प्रत्यक्ष व्यवहारात कसे रुप दिले जाऊ शकते. मानवी दर्जातून स्त्री-पुरुषातील समतेची मागणी अगदी स्वाभाविक व योग्य आहे. स्त्री व पुरुष हे मानवी गृहांचे दोन महत्त्वाचे स्तंभ आहेत व एकाच पित्याची संतान आहेत. परंतु जीवनकार्य पार पाडण्याच्या पद्धतीतही ते एकमेकासमान असू शकतात? अशा प्रकारची समानता कधी शक्य आहे काय? साऱ्या जगातील स्त्रियांनी एक स्वरात मागणी केली व त्याकरिता मोठ्यातमोठ्या सभा भरवून ठराव पास केले, तरी अशा प्रकारच्या समानतेचे स्वप्न पुरे होऊ शकत नाही. या सभा व त्यात पास केलेले ठराव पुरुषांचा स्वभावधर्म बदलू शकत नाहीत. तसेच ते स्त्रीचाही स्वभावधर्म बदलू शकत नाहीत. या दोहोंच्या जीवनकार्यांतही काही फेरबदल घडून येऊ शकत नाही की स्त्रीने पुरुषांचे काम करावे व पुरुषांनी स्त्रियांऐवजी गर्भवारणेची, मुलांना जन्म देण्याची व त्यांना स्तनपान करण्याची जबाबदारी सांभाळावी.

## प्राकृतिक व मानसशास्त्रीय फरक

'कोणतेही विशेष प्रकारचे जीवनकार्य विशेष प्रकारचा प्रकृती धर्म व मानसशास्त्राच्या अभावी पार पाडले जाऊ शकत नाही. दुसऱ्या शब्दांत याचा अर्थ असा झाला की स्त्रीची दोन प्रमुख जीवन कार्ये गर्भधारणा व स्तनपान पार पाडण्यासाठी विशिष्ट भावनात्मक व मानसिक क्षमता हवी. त्यांच्याच सहाय्याने स्त्री आपल्या या कठीण जबाबदाऱ्या पार पाडीत असते.'

## स्त्रीचा स्वभावधर्म

'सत्य असे आहे की स्त्रीच्या पवित्र भावना, उच्च चारित्र्य, संकटे व तिची सहनशीलता व धैर्य, सहानुभूती व कार्यक्षमतेची पराकाष्ठा आणि मातेचे निर्व्याज प्रेम, स्त्रीच्या विशिष्ट प्राकृतिक स्वभावधर्माच्या अभावी शक्यच नाही. कारण हाच प्राकृतिक गुणधर्म स्त्रीला आपल्या मूळ कार्य-गर्भधारणा व स्तनपानयोग्य बनवितो व त्यामुळेच तिची मानसिक व शारीरिक घडणीचे एक विशिष्ट रुप तयार होते. स्त्रीची ही मानसिक व शारीरिक वैशिष्ट्ये एकदुसऱ्याबरोबरच वाढत असतात व एकदुसऱ्याला पोषक असतात, एवढेच नसून त्यांच्यात दाट घनिष्टपणा निर्माण होऊन ते एकरुप होतात. म्हणूनच काही अपवादात्मक उदाहरणे सोडल्यास, यापैकी एका वैशिष्ट्याचे अस्तित्व दुसऱ्या वैशिष्ट्याचे अभावात शक्यच नाही.

'भावनातीत नम्रपणा, अंतर्गत कोमलपणा व भावनावशता ही स्त्रीची वैशिष्ट्ये असून त्यावरुन हेच उघड होते की स्त्रीच्या वृद्धीचा मूल पाया बुद्धीवर आधारलेला नसून तो भावनांवर आहे. तिचा हाच भावनाशील गुणधर्म तिच्या जिवंत व सतत आढळणाऱ्या मायेचा झरा आहे, कारण मुलांच्या संगोपनासाठी तीव्र भावनांची आवश्यकता असते. याच भावना स्त्रीला थंडपणाने विचार करु देत नाहीत व बाळाच्या निकडीच्या गरजांकरिता तत्काळ विना विलंब पूर्ण तयारीनिशी धाव घेण्यास भाग पडतात.'

'जीवनात स्त्रीचे खरे चरित्र असे आहे. हेच चरित्र तिला जीवनकार्य पार पाडण्यात सहाय्य करीत असते व तिच्या रचनात्मक उद्देशांची पूर्तता करण्यास मदत करीत असते.'

## पुरुषाचे जीवनकार्य

'पुरुषाचे जे जीवनकार्य आहे, त्याचे स्वरुप अगदी वेगळे आहे. ते व्यवस्थित रितीने पार पाडण्यासाठी त्यांच्याकडे सर्व आवश्यक क्षमता असतात. त्या स्त्रीच्या क्षमतेहून अगदी भिन्न असतात. त्याचे खरे कार्य जीवनाचा क्षेत्रात संघर्ष करण्याचे आहे. जंगलात जाऊन जंगली श्वापदांना तो आपल्या अधीन बनवितो. पृथ्वीवर व अवकाशात निसर्गशक्तीशी झगडत असतो. सरकार बनवितो व राष्ट्रीय, आर्थिक समस्यांकरिता व समाजाकरिता कायदे करतो. पुरुषाला जीवनामध्ये या सर्व अडचणींशी झुंजावे लागते, तेव्हा कोठे आपले अन्न मिळवून आपले व आपल्या कुटुंबीयांचे संरक्षण व इतरांच्या जुलूम अत्याचारापासून रक्षण करण्यायोग्य बनतो.'

## पुरुषाचा मानसशास्त्रीय स्वभावधर्म

'पुरुषाला आपले जीवनकार्य पार पाडण्यासाठी स्त्रीसारख्या भावनाशील स्वभावधर्माची आवश्यकता नाही. त्याला ज्या प्रकारचे कार्य करावयाचे असते त्यासाठी भावनातीत स्वभावधर्म हितकर व सहाय्यक ठरण्याऐवजी उलट हानीकारक सिद्ध होतो, कारण भावना स्थिर राहत नाहीत. प्रत्येक क्षणी भावना कमी-जास्त होतात व त्यापासून प्रतिकूल मानसिक अवस्था निर्माण होते. या भावनांमध्ये, माणूस एका ठराविक ध्येयाकरिता दीर्घकाळपर्यंत मार्गक्रमण करण्याची व टिकून राहण्याची क्षमता असत नाही. त्यांची आवड निवड ही चंचलपणे सारखी बदलत असते. अशा तऱ्हेने प्रत्येक क्षणी बदलणारा भावनावश स्वभावधर्म, एका मातेच्या जीवनकार्यातील परस्पर भिन्न व प्रत्येक क्षणी बदलणाऱ्या गरजांशी तर पूर्णपणे एकरुप होत असतो, पण पुरुषाला त्यापासून काहीही लाभ होत नाही. कारण त्याच्या कार्याचे स्वरुप असे असते की त्याला धैर्याने व अटळपणाने दीर्घकाळपर्यंत आपली कर्तव्ये पार पाडावी लागतात. त्याच्या व्यवहारी जीवनात त्याला अगणित विरोधी शक्तीशी झगडावे लागते आणि त्या कार्यात त्याची बुद्धीच त्याला सहाय्य करु शकते. तिच्यामुळेच पुरुषात भविष्यकाळाकरिता योजना तयार करणे, वर्तमान स्थितीचा आढावा घेणे व आपल्या योजनांना मूर्तस्वरुप देण्याआधी त्यापासून मिळू शकणाऱ्या आशादायी कायद्यांचा सखोल अभ्यास करण्याची क्षमता निर्माण होते. बुद्धी स्थिर असते, तिच्यात भक्कमपणा असतो व तिच्यापासून कार्य करण्यासाठी उतावळेपणाची अपेक्षा केली जाऊ शकत नाही. कारण ही गोष्ट तर त्या भावनांचा विशिष्ट गुण आहे, ज्यामुळे स्त्रीच्या व्यक्तिमत्त्वात भव्यपणा व तेज निर्माण होते. एखादा उद्दिष्टप्राप्तीकरिता सर्वथा योग्य उपाययोजनेप्रत आमचे मार्गदर्शन करावे, केवळ

हीच मागणी बुद्धीला केली जाऊ शकते. मग आमच्यापुढे जंगली श्वापदांची शिकार करण्याचा प्रश्न असो किंवा एक नवीन शस्त्र शोधून काढण्याचा अथवा एखादी नवीन आर्थिक पद्धत किंवा नवीन सरकार बनविण्याचा प्रश्न असो, तसेच एखाद्या बाहेरच्या राष्ट्राविरुद्ध युद्ध करण्याचा व तडजोडीची घोषणा करण्याचा प्रश्न असो, पुरुषांच्या या बाबतीत सर्व हालचाली, त्याच्या बौद्धिक कुवतीवर व क्षमतांवर आधारित असतात. अशा बाबतीत भावनांचा हस्तक्षेप या समस्या सोडविण्याऐवजी त्यांत जास्त गुंतागुंत निर्माण करण्यासच कारणीभूत ठरु शकतो.

## सफल पुरुष व सफल स्त्री

एका पुरुषाला जीवनात सफल व जीवनाशी समरस असल्याचे त्याच वेळी म्हणता येईल जेव्हा तो आपल्या वास्तविक व्यवहारात व आपले जीवनकार्य करण्यात कार्यान्वित असतो. यामध्ये स्त्री-पुरुषातील मतभेदाचे कारण समजू शकते, तसेच शारीरिक व मानसिक कुवतीची कठीण कामे करण्यात पुरुषांना का आनंद होत असतो हेही समजू शकते. तसेच भावनांच्या जगात आल्याने तो बालकाप्रमाणे विवश का बनतो, हेही समजू शकते. याचप्रमाणे स्त्री आपल्या भावनांच्या क्षेत्रात अति प्रफुल्लित दिसते, कारण याच क्षेत्रात राहून ती आपले कर्तव्य चांगल्या रितीने पार पाडू शकते. नर्सिंग, बालकांचे संगोपन व दाईसारख्या व्यवसायात जेथे स्त्रीच्या मायेची गरज आढळते, अशा व्यवसायातही स्त्री आनंदी असते. याच तऱ्हेने ती जेव्हा दुकानात काम करीत असते तेव्हा त्यातही तिला आपल्या जीवनातील पुरुष जोडीदार शोधण्याची संधी मिळून ते काम सुकर होते. पण ही सर्व कामे तिचे मूळ कर्तव्य पार पाडण्याच्या दृष्टीने गौण असतात. तिच्या पतीला, मुलांना, कुटुंबाला तिच्याकडून अपेक्षित असलेले तिचे स्वाभाविक जीवनकार्य पार पाडण्यास अवसर मिळतो, तेव्हा ती नोकरी वगैरे सर्व सोडून देऊन स्वत:ला घरकाम करण्यात हरवून बसणे ही गोष्ट अगदी स्वाभाविक आहे. अशा स्थितीत ती घराबाहेर पडत नाही, जोपर्यंत तिला परिस्थिती व पैशाची गरज तसे करण्यास भाग पाडत नाही.

कसल्याही परिस्थितीत त्याचा असा अर्थ नाही की स्त्री व पुरुषात असा एखादा मूलभूत मतभेद आहे, की ते एकमेकाजवळ येऊ शकत नाहीत व निसर्गाने एका वर्गाला दिलेली क्षमता दुसऱ्या वर्गातील व्यक्तीत मुळातच आढळून येत नाही; असाही त्याचा अर्थ नाही.

## वर्गांच्या एकत्रित येण्याचे स्थान

हे दोन्ही वर्ग एखाद्या मिश्रणाप्रमाणे एक दुसऱ्यात मिसळतात. जर तुम्हाला अशी एखादी स्त्री दिसली की जिच्यात शासन करण्याचे गुण आहेत, न्यायासनावर आरुढ आहे, मोठा भार पेलत आहे, युद्धात भाग घेत आहे, त्याचप्रमाणे तुम्हाला असा एखादा पुरुष आढळला जो स्वयंपाक करतो, घरातील कामे करत असतो, मुलावर आईसारखे प्रेम करतो, त्याचा स्वभाव परिवर्तनशील

व भावनाशील असतो आणि त्याच्या प्रकृतीत सतत कमी-जास्त होत असते. तर हे सर्व स्वाभाविक आहे, हे आपण विसरु नये. एका वर्गामध्ये दुसऱ्या वर्गात असणारे जंतूही आढळतात, या गोष्टीचे हे तर्कसंगत फळ आहे. परंतु यावरुन पथभ्रष्ट झालेल्या पाश्चिमात्य विचारकांचे व त्यांच्या पौर्वात्य शिष्यांचे स्त्री व पुरुषांचे जीवनकार्य समान असले पाहिजे, या प्रतिपादनाचे प्रमाण कदापिही प्राप्त होत नाही. या उलट अशा अपवादात्मक उदाहरणाच्या अस्तित्वामुळे जो प्रश्न निर्माण होतो, तो केवळ एवढाच आहे की स्त्रीची ही ज्यादा कार्ये, तिच्या खऱ्या व वास्तविक जीवनकार्याचे स्थान घेऊ शकतात काय? ही सर्व जादा कामे केल्यानंतर स्त्रीला आपल्या घराची, मुलांची व परिवाराची खरोखरच गरज भासत नाही काय? तिच्यातील या गोष्टी खरोखरच लोप पावतात काय? त्यानंतर तिला आपल्या भावनांना संतुष्ट करण्यासाठी, पुरुष जोडीदाराची गरज भासत नसून त्या बाबतीत तिला औदासिन्य प्राप्त होते काय?

स्त्री व पुरुषातील आपापल्यातील भिन्नता वास्तविकपणे समजून घेतल्यानंतर, ज्यामुळे इस्लाम स्त्री व पुरुषात फरक मानतो व जीवनातील त्यांच्या वेगवेगळ्या कार्याची तरतूद करतो, त्या सर्व पैलूंचा क्षणभर विचार करु या.

## नैसर्गिक जीवनपद्धत

इस्लामचे सर्वांत मोठे वैशिष्ट्य असे आहे की ती जीवनातील अशी व्यावहारिक पद्धत आहे जी मानवस्वभावाविरुद्ध लढण्यास उभी ठाकत नाही. तसेच त्याच्यात कसलेही परिवर्तनही इच्छित नाही व त्याला जे जे काही पूर्णपणे अनुकूल आहे तेच प्रस्तावित करते. तो माणसाला आत्म्याचे पावित्र्य देतो व त्याचा 'आदर्शवादा'इतक्या उंचीवर पाहू इच्छितो, परंतु मानवी प्रगतीच्या व पावित्र्याचा या सर्व प्रक्रियामध्ये तो कधीही माणसाच्या प्रकृतीशी झुंजत नाही. कारण त्यांच्या समीप मानवाच्या स्वभावधर्मात अशा तऱ्हेचा कोणताही बदल शक्य नाही व तसे करणे कोणत्याही दृष्टीने हितकरही नाही. त्याच्या समीप मानवाची आदर्श सफलता, आपल्या नैसर्गिक गुणधर्माशी लढा देऊन नव्हे तर त्याच्या सर्व निकडी पुऱ्या करुन आणि अशारितीने त्याची सुधारणा केल्यानेच होऊ शकते व त्याच्या परिणामस्वरुप भलेपणाचे व उपकाराचे सर्वांत उच्च स्थान प्राप्त करु शकतो. चांगुलपणा व भलेपणा त्याच्या दृष्टीला प्रिय व हवाहवासा व्हावा व तो इच्छा वासनांचा दास बनून राहू नये.

## फरकाचे दोन अवसर

स्त्री-पुरुषाच्या समस्येबाबत इस्लामने जो दृष्टिकोन अंगिकारला आहे तोसुद्धा मानवस्वभावधर्मास पूर्णपणे अनुकूल आहे. म्हणून जेथे जेथे प्रकृतीवर काही गोष्टी आधारलेल्या असतात तेथे ती स्त्री-पुरुषात समानता स्थापन करतो व ज्या बाबतीत निसर्ग व प्रकृतीच भेद करु

इच्छिते त्या बाबतीत इस्लामही त्यामध्ये भेद मानतो. स्त्री-पुरुषामध्ये ज्या दोन प्रसंगांत भेद मानतो, त्यात एक वारसाहक्काचे वाटप व दुसरा घराण्याच्या सर्वश्रेष्ठपणाची बाब.

## वारसाहक्क

वारसाहक्काबाबत इस्लामचा कायदा असा आहे की 'पुरुषाचा हिस्सा दोन स्त्रियांच्या हिश्शाएवढा आहे.'

हे वाटप अगदी स्वाभाविक व न्यायपूर्ण आहे. कारण आर्थिक खर्चाचा सर्व भार पुरुषाला एकट्यानेच उचलावा लागतो. स्त्रीवर स्वत:खेरीज इतर कोणाच्याही खर्चाचे ओझे नसते. जर स्त्रीच कुटुंबप्रमुख असेल तेव्हा गोष्ट वेगळी आहे. अशा अवस्थेत स्त्रीला कुटुंबाच्या सर्व गरजा पुऱ्या कराव्या लागतात, पण असे प्रकार अपवादात्मकच असतात आणि इस्लामी समाजात फारच थोडे आढळतात. कारण जोवर स्त्रीचा कोणी पुरुष नातेवाईक जिवंत आहे, तो मग कितीही लांबच्या नात्यातील असो, आपल्या उदरनिर्वाहासाठी स्त्रीला घराबाहेर पडण्याची गरज भासत नाही. स्त्रीकरिता अशा व्यवस्था करणे म्हणजे स्त्रीहक्काची ध्वजा धारण करणाऱ्यांच्या कथनाप्रमाणे स्त्रीवर जुलूम व अत्याचार केल्यासारखे आहे काय? या पोकळ घोषणांपासून व संकुचित दृष्टिकोनाच्या प्रचारकापासून बाजूला जाऊन पाहिले तर मूळ समस्या ही गणिताचा एक सरळ व सोपा प्रश्न आहे. वारसातील एकूण मालमत्तेच्या एक तृतियांश हिस्सा स्त्रीला फक्त स्वत:करिता मिळतो व उरलेला दोन तृतियांश हिस्सा पुरुषाला दिला जातो, जेणेकरुन तो त्याच्या पत्नीचे, मुलाचे, कुटुंबीयांच्या गरजा भागवू शकेल. यावरुन वारसाहक्काचा मोठा वाटा स्त्रीला मिळतो की पुरुषाला मिळतो हे उघड आहे. काही पुरुष आपली सर्व धनसंपत्ती स्वत:च्या सुखसोईकरिता खर्च करतात व विवाह करुन कुटुंब करण्यास तयार नसतात, हे शक्य आहे, पण अशी उदाहरणे फार थोडी असतात. सर्वसाधारणपणे पुरुषच आपल्या कुटुंबाचा सर्व खर्च भागविण्यास जबाबदार असतो व तोच कुटुंबातील सर्व व्यक्तींचा (त्याच्या पत्नीचाही त्यात समावेश असतो) गरजा भागवित असतो. पण असे करताना तो कोणावर उपकार करीत नसून आपले एक नैतिक कर्तव्य पार पाडीत असतो. जर एखादी स्त्री मालमत्तेची मालक असेल तर तिचा पती तिच्या संमत्तीशिवाय ही मालमत्ता घेऊ शकत नाही. एवढेच नाही तर त्या स्त्रीच्या सर्व खर्चांचा भारही पुरुषालाच वाहावा लागेल. जर पुरुषाने स्त्रीला खर्च देण्यास नकार दिला अगर आपल्या मिळकतीच्या प्रमाणात तिला खर्चाकरिता कमी रक्कम दिली, तर ती न्यायालयात त्याच्याविरुद्ध दावा दाखल करुन त्याच्याकडून पुरेपूर खर्चासाठी वसुली करु शकते, नाहीपेक्षा त्याच्यापासून विभक्त होऊ शकते. इस्लामवर असा आरोप केला जातो, की वारसाहक्कात स्त्रीला पुरुषापेक्षा अल्प वा अपुरा वाटा मिळतो. याचे कारण असे, की पुरुषाची आर्थिक जबाबदारीच अशी असते की त्याला वारसाहक्काने स्त्रीच्या दुप्पट हिस्सा मिळाला पाहिजे.

## इस्लामच्या वारसा कायद्याचा मूळ आधार

वारसांच्या वाटपात इस्लामने हेच प्रमाण ठेवले आहे. या संदर्भात जो कायदा मूलाधाराचा दर्जा बाळगतो, त्यापेक्षा अधिक न्यायपूर्ण कायदा, मानवजातीला आजतागायत उमजू शकलेला नाही, 'लिकुल्लिन हस-वहाजति ही' अर्थात प्रत्येकाला त्याच्या गरजेनुसार दिले जावे. जेव्हा माणसाच्या गरजेचे माप त्याच्यावरच्या सामाजिक जबाबदाऱ्यांवर असते. परंतु धनार्जनाच्या बाबतीत इस्लाम स्त्री-पुरुषामध्ये कोणताही भेदभाव करीत नाही, वेतनात स्त्री-पुरुषात काही फरक करीत नाही. तसेच व्यापारातील नफा वाटपात भेदभाव करीत नाही. जमिनीपासून मिळणाऱ्या उत्पन्नाबाबत त्यांच्यापैकी कोणाशीही विशिष्ट व्यवहार करीत नाही. कारण या सर्व बाबतीत दोन्ही वर्गांत इस्लाम संपूर्ण समतेचा नियम अमलात आणतो व त्यांच्या कष्टानुसार त्यांना समान मोबदला देतो. या विषयांत तो कोणावरही अन्याय व अतिरेक पसंद करत नाही. मुस्लिम जनतेत सर्व साधारणपणे आढळून येणारा हा विचार जो मुस्लिमविरोधी लोक हेतूपुरस्पर-योजनाबद्ध रितीने पसरवितात, की इस्लामच्या दृष्टीने स्त्री ही पुरुषापेक्षा निम्म्या मोबदल्याची हक्कदार आहे; पूर्णपणे चुकीचा आहे.

## पुराव्याचा कायदा

इस्लाममध्ये दोन स्त्रियांची साक्ष एका पुरुषाच्या साक्षीबरोबर आहे, ही गोष्ट इस्लामच्या दृष्टीने स्त्री ही निम्म्या पुरुषा इतकी आहे, असे कदापिही सिद्ध करीत नाही. उलट हे तर असे अक्कलहुषारीने उचलेले पाऊल आहे, ज्याचा हेतू पुराव्याचा कायदा सर्व चुकांपासून व दोषांपासून दूर ठेवण्याचा आहे; मग अशी साक्ष फिर्यादीच्या बाजूने असो की, त्याच्या विरुद्ध असो. आपल्या स्वभावधर्मानुसार स्त्री ही अतिभावनावश व प्रभाव स्वीकारणारी असते व ती दाव्यातील बाबीसंबंधी गोंधळ करण्याचे भय असते. म्हणून स्त्रीच्या साक्षीमध्ये आणखी एका स्त्रीला सामील करुन घेतले गेले आहे. त्याविषयी अशी मसलत सांगितली गेली आहे की,

'जर या दोन्ही स्त्रियांत एकादी विसरली तर दुसरीने तिला स्मरण करुन द्यावे.'

(कुरआन २ : २८२)

ज्या आरोपी स्त्रीविरुद्ध किंवा तिच्या बाजूने एखादी स्त्री न्यायालयात साक्ष देत असेल, ती जर सौंदर्यवती व रुपवती असेल, तर असू या अगर द्वेष मत्सरा पोटी, ती खोटी साक्ष देणाऱ्या स्त्रीमध्ये मायेची अगर प्रेमाची भावना जागृत होणे व तिने जाणूनबुजून किंवा अजाणतेपणी तिला वाचविण्याच्या प्रयत्नात अशी साक्ष देणे जिचा वास्तविकतेशी कसलाही संबंध नाही, हेही याच तऱ्हेने संभवनीय आहे. पण जेव्हा दोन स्त्रिया एकाच वेळी न्यायालयात साक्ष देत असतील, तेव्हा या दोन्हीच्या हातून अशी चूक होऊन त्या चूकीची साक्ष देण्याचा संभव नसतो. अशा स्थितीत

तर्क हेच सांगतो की यातील एकीने जर वस्तुस्थितीविषयी गैरसमज केला असेल तर दुसरी तो दुरुस्त करील. या प्रसंगी हे स्पष्टीकरणही योग्य वाटते, की एखादी स्त्री जर स्त्रीरोगतज्ञ म्हणून विश्वासूही मानली जाईल.

## कुटुंबप्रमुख

कुटुंबप्रमुखाची नियुक्ती करण्याची समस्या निर्माण झाली, तर कुटुंबप्रमुख अशी व्यक्तीच होऊ शकते जिच्यात प्रशासकीय क्षमता आहे. व जी कुटुंबाची, सर्व व्यवहारांची काळजी वाहू शकते व तिची व्यवस्था करु शकते. कुटुंबाच्या संज्ञेत एक पुरुष, स्त्री व मुले आणि त्याच्यापासून उद्‌भवणाऱ्या एकूण सर्व जबाबदाऱ्यांचा समावेश आहे. इतर सामाजिक संस्थांप्रमाणेच कुटुंबालाही एका जबाबदार कुटुंबप्रमुखाची गरज असते. त्याविना कुटुंब इतस्तत: विखुरले जाऊन, नाशाला बळी पडू शकते. कुटुंबप्रमुखाच्या बाबतीत तीन प्रकार असू शकतात.

१) पुरुष कुटुंबप्रमुख असतो.

२) स्त्री कुटुंबप्रमुख असते.

३) पुरुष व स्त्री एकाच वेळी कुटुंबप्रमुख असू शकतात.

कुटुंबाचा तिसरा प्रकार, विषयापलीकडचा आहे, कारण अनुभव आम्हाला हे दर्शवितो, की जेथे दोन कुटुंबप्रमुख असतील, तेथे मुळातच जास्त अन्यवस्था व अडचणी निर्माण होतात. जमीन व आकाश यांच्या रचनेकडे इशारा करुन कुरआनमध्ये असे सांगितले आहे,

"जमिनीवर व आकाशाखाली अल्लाहखेरीज अन्य कोणी उपासना करण्यायोग्य असता तर जमीन व आकाश दोन्हीही नष्ट झाले असते, तेव्हा प्रत्येक ईश्वराने आपली रचना वेगळी केली असती व त्यांनी परस्परांवर चढाई केली असती.' (कुरआन, अल-अं-बिया, २१)

'तर प्रत्येक ईश्वराने आपण निर्माण केलेल्या वस्तू व जीव वेगळे केले असते व एकमेकांवर चढाई केली असती.' (अल-मूमिनून, ९१)

जर या काल्पनिक ईश्वरांची ही स्थिती आहे, तर माणसाची स्थिती तर जुलमी व अन्यायी झाली आहे तेव्हा काय अवस्था होईल; याचा विचार करा.

## एक प्रश्न

अशा रीतीने आमच्यासमोर दोनच पर्याय उरतात. त्यावर चर्चा करण्यापूर्वी आम्ही वाचकांसमोर एक प्रश्न मांडतो, की क्षमतेच्या दृष्टीने कुटुंब प्रमुख होण्यास स्त्री व पुरुषामध्ये कोण अधिक उपयुक्त आहे? बौद्धिक कुवत व क्षमतेचा धनी असलेला पुरुष आपल्या जबाबदाऱ्या चांगल्या रीतीने पार पाडू शकतो की भावनाविवशतेचे वैशिष्ट्य असलेली स्त्री? आपली बौद्धिक क्षमता व बलशाली शरीरामुळे पुरुषच कुटुंबप्रमुख होण्यायोग्य आहे आणि तोच कुटुंबप्रमुख

असावा व स्त्री ही आपल्या स्वभावधर्मानुसार भावनाशील व प्रक्षोभशील असते व तिच्यात पुरुषाप्रमाणे पाऊल उचलण्याची धमक नसते. ह्या विचार या समस्येवर जेव्हा आम्ही करतो तेव्हा आम्हाला त्याचे उत्तर सापडते. कमकुवत व ज्याच्यावर सहज दडपण आणता येईल अशा पुरुषाला स्वत: स्त्रीच पसंत करत नाही. अशा पुरुषाचा ती तिरस्कार करते व त्याच्यावर कधीही विश्वास ठेवत नाही. गेली कित्येक शतके स्त्रीला जी शिकवण व वारसापरंपरा मिळालेली आहे, तिच्या अवशेषांच्या परिणामस्वरुप स्त्रीचा असा कार्यविधी व मानसिक पद्धत आहे. परंतु आजसुद्धा शारीरिक दृष्टीने बलशाली असलेल्या पुरुषाकडेच ती आकर्षली जाते, ही गोष्ट कोणत्याही अवस्थेत सत्य आहे. हे सत्य अमेरिकन स्त्रीच्या जीवनात पूर्णपणे दिसून येते. अमेरिकन स्त्रीला पुरुषासमान हक्क प्राप्त आहेत व तिचा स्वतंत्र दर्जाही तेथे मान्यता पावला आहे. पण असे असूनही पुरुषाकडून पराजित होण्यात तिला आनंद वाटतो. ती अशा पुरुषाशीच प्रेम करते व त्याचे मन जिंकण्याचा प्रयत्न करते. ती पुरुषाची बलदंड देहयष्टी व त्याची रुंद छाती पाहून प्रभावित होते आणि शारीरिक बलात तिला तो आपल्यापेक्षा श्रेष्ठ व भक्कम वाटतो तेव्हा ती स्वत:ला त्याच्या स्वाधीन करते.

स्त्रीला संतती नसेपर्यंत व त्यांच्या शिक्षणाची चिंता नसेपर्यंतच कुटुंबप्रमुख होण्यात गोडी वाटू शकते. संतती झाल्यानंतर या वाढलेल्या जबाबदाऱ्या व कर्तव्ये पार पाडण्यासाठी तिला वेळ उरत नाही. कारण मातेच्या भूमिकेतून तिची जी कर्तव्ये असतात ती काही कमी कठीण असत नाहीत व त्यांना काही कमी वेळ लागत नाही.

## कौटुंबिक जीवनातील एक गोष्ट

घरामध्ये स्त्री ही पुरुषाची गुलाम व्हावी व तो तिचा जुलमी मालक व्हावा, असा याचा अर्थ कसल्याही परिस्थितीत होत नाही. कारण कुटुंबप्रमुखाची कर्तव्ये व जबाबदाऱ्यांचे स्वरुप असे असते, की पती-पत्नीमध्ये प्रेमाची व सहकार्याची भावना निर्माण झाल्याखेरीज त्या पार पाडल्या जाऊ शकत नाहीत. कौटुंबिक जीवनाच्या सफलतेसाठी परस्परांना समजून घेणे तसेच सतत सहकार्य असणे, हा एक आवश्यक गुण आहे. इस्लाम आपापसातील संघर्ष व झगड्याऐवजी स्त्री-पुरुषाच्या दरम्यान प्रेम, परस्पर सामंजस्य, चिरकाल सहकार्य व सहानुभूतीला कौटुंबिक जीवनाचा मूलभूत पाया बनू इच्छितो. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

'व या स्त्रीबरोबर चांगुलपणाने जीवन व्यतीत करा.' (कुरआन, अल निसा : १९)

प्रेषित मुहम्मद (स) यांचे कथन आहे की,

'आपल्या कुटुंबीयांशी जो चांगला वागतो, तो तुम्हा सर्वांपैकी अधिक चांगला आहे.'

(तिर्मिजी)

आपल्या पत्नीशी केले जाणारे वर्तन व व्यवहार हेच जणू माणसाचे चारित्र्य मोजण्याचे माप व प्रमाण प्रेषित मुहम्मद (स) यांनी ठरवून टाकले आहे. खरे तर हेच अतिशय योग्य प्रमाण आहे कारण जोवर माणूस आध्यात्मिक दृष्टीने रोगी नसतो आणि त्याच्यात चांगुलपणा व भलेपणाची कसलीही भावना शिल्लक नसते अथवा त्यांच्यात एखादी मानसिक व्यग्रता अथवा विघ्न निर्माण झालेले नसते, तोवर तो पत्नीशी दुर्वर्तन व दुर्व्यवहार करु शकत नाही.

कौटुंबिक जीवनात पति-पत्नींच्या संबंधातील रुढीबाबत बरेच गैरसमज पसरलेले आहेत. हे कसल्याही परिस्थितीत मान्य करुन त्यातील तथ्य व सत्य समजून घेण्याची गरज आहे. यातील काही गैरसमजुतीचा संबंध पतीने पत्नीवर टाकलेल्या कर्तव्याशी येतो व काही गैरसमज तलाक (घटस्फोट) व बहुपत्नित्व विवाह पद्धतीशी संबंधित आहेत.

## पती-पत्नीच्या संबंधातील गुंतागुंत

विवाहसंबंध एक वैयक्तिक संबंध असतो व दोन व्यक्तिंमध्ये निर्माण होणाऱ्या इतर संबंधाप्रमाणेच तो संबंधित व्यक्तीमध्ये असणाऱ्या वैयक्तिक मानसिक तसेच शारीरिक रितीने एकरुपतेच्या व समरसतेच्या भावनांवर आधारलेला असतो, ही गोष्ट आम्ही येथे सांगितल्याशिवाय राहू शकत नाही. कायद्याने यातील एकही गोष्ट निर्माण करुन अस्तित्वात आणली जाऊ शकत नाही. म्हणून जर पति-पत्नी आनंदाने व हसत खेळत राहत असतील व त्यांच्यात पूर्ण संतोष व समरसता असेल तर दांपत्य जीवनातील तत्त्वांचे काटेकोर व निसंकोचपणे पालन करण्यातच त्याचे रहस्य दडलेले असणे हे काही आवश्यक नाही. कारण असे की कधी कधी पती-पत्नीतील तीव्र मतभेदसुद्धा शेवटी त्यांच्यामध्ये आपापसात गाढ प्रेम व आकर्षण यांस कारणीभूत आहे. याच रितीने जर एखाद्या विवाहित जोडप्याच्या दांपत्यजीवनात संघर्ष व मतभेद आढळले तर त्याचे कारण पतीची एखादी चूक अथवा पत्नीचा वरचढपणाच असावा, हेही आवश्यक नाही. माणसाच्या रुपाने पती व पत्नी हे दोघेही अतीचांगले व चरित्र्यवान असणे आणि असे असतानाही त्यांचा स्वभाव परस्पर भिन्न असणे व इच्छा असतानाही त्यांच्यात तडजोड व समझोता होऊ न शकणे, हेही अगदी संभवनीय व शक्य आहे.

## दांपत्य जीवनासाठी कायद्याची गरज

वैवाहिक जीवनासाठी नियम व तत्त्वे केली जाऊ शकतील असा वाव कायद्यात असणे, याकरिता आवश्यक आहे. कारण मानवी जीवनातील ही बिकट समस्या सोडविण्याचा उपाय केल्याखेरीज कोणतीही मानवी जीवनपद्धत सर्वव्यापी होण्याचा दावा करु शकत नाही. समस्येचा सर्व साधारण मर्यादा व असाध्य मर्यादा निश्चित करुन स्त्री पुरुषांना मोकळे सोडणारा कायदा असणे याकरिताच आवश्यक आहे, जेणेकरुन या मर्यादांच्या आत राहून बाकीच्या बाबींचा तपशील त्यांनी स्वत:च ठरवावा.

स्त्री-पुरुषांत प्रेम असेल व ते सुखासमाधानाने नांदत असतील तर त्यांना आपल्या हक्काचे रक्षण करण्यासाठी कोणत्याही न्यायालयाचे दार ठोठावण्याची गरज नसते, हे उघड आहे. जेव्हा त्यांचे आपापसात पटत नाही व भांडणाचा निवाडा ते स्वत: करु शकत नाहीत तेव्हाच ते न्यायालयाकडे रुजू होत असतात.

तसेच कायदाही वादीचे अगर प्रतिवादीचे अनुचित समर्थन न करणारा, तसेच त्यांना अनुचित विरोध न करणारा व पूर्णपणे न्यायावर अधिष्ठित असणारा असावयास हवा. तसेच तो जास्तीतजास्त घटनांना लागू होऊ शकेल इतपत व्यापक असावा. मानव जीवनात आढळून येणाऱ्या सर्व अवस्थांना व घडामोडींना लागू होऊन आपल्या प्रभावाखाली आणू शकणारा, असा मानवाने केलेला कोणताही कायदा अगर विधान असू शकत नाही. या गोष्टीचा आम्ही या प्रसंगाच्या निमित्ताने पुनरुच्चार करु इच्छितो. तसेच कायद्याच्या स्थित शाद्बिक अभिव्यक्तीला, न्यायानुसार कोणताही चांगला कायदेशीर आधार म्हणून ठरविणे शक्य नाही.

## इस्लामच्या विवाह कायद्याच्या बाबतीतील काही मूलभूत प्रश्न

पत्नीच्या जबाबदारीच्या संदर्भात वादग्रस्त असणारा व ज्याच्याविरुद्ध इतका आरडाओरडा केला जात आहे, त्या इस्लामी कायद्याच्या भागावरही क्षणभर दृष्टिक्षेप टाकू या. इस्लामी कायद्यांत पती-पत्नीच्या कर्तव्याच्या बाबतीत खाली दिलेल्या तीन गोष्टी ध्यानात ठेवण्यासारख्या आहेत.

१) ही कर्तव्ये व जबाबदाऱ्या स्त्रीवरील अत्याचारासमान आहेत.

२) ही कर्तव्ये एकांगी असून त्यांच्या मोबदल्यात स्त्रीला कोणताही हक्क प्राप्त होत नाही.

३) ही कर्तव्ये व जबाबदाऱ्या सदासर्वदा असून, स्त्री त्यांच्यापासून आपली सुटका करुन घेऊच शकत नाही.

## पत्नीची कर्तव्ये

यातील पहिल्या कर्तव्याचे महत्त्व दाखवून देण्याची काही गरज नाही. तिच्यात कार्यान्वित असलेली मसलत अगदी स्पष्ट आहे. पुरुषाची शारीरिक रचनाच अशी आहे की त्याला कामवासनेच्या तृप्तीची गरज स्त्रीपेक्षा कितीतरी अधिक पटीने भासते. अशा तऱ्हेने तो आपली कामेच्छा भागवून, जीवनाच्या व्यावहारिक क्षेत्रात आपली कर्तव्ये तत्परतेने व उत्साहाने करण्यायोग्य होतो. मुख्यत्वेकरुन तारुण्यात पुरुषाला कामेच्छा अधिक असल्याचे आढळते व त्याला स्त्रीच्या तुलनेत कामतृप्तीची अधिक गरज असते. जरी पुरुषापेक्षा स्त्रीची कामपिपासा अधिक खोल व दुर्गम असली व शारीरिक व मानसशास्त्रीय दृष्टीने कामवासनेकडे तिला अतितीव्र ओढ असली तरी तिला आपल्यातील ही ओढ अनिवार्यपणे, प्रत्यक्ष शारीरिक क्रियेच्या स्वरुपात

प्रकट करणे भागच आहे असे नाही. पुरुषाची हीच स्वाभाविक गरज पुरी करण्याचे विवाह एक साधन आहे व त्याच्या जीवनातील आध्यात्मिक, मानसशास्त्रीय, सामाजिक तसेच आर्थिक गरजांना व निकडींना जबाबदार आहे. आता प्रश्न असा आहे की पती-पत्नीजवळ गेला असता पत्नीने औदासिन्य व अनास्था दाखवून त्याची निकड भागविण्याऐवजी त्याला जर दूर ढकलून दिले, तर पतीने काय करावयास हवे? त्याने दुसऱ्या स्त्रीशी अनैतिक संबंध ठेवावयास हवे काय? कोणताही सुसंस्कृत व सभ्य समाज अशा तऱ्हेचे अनैतिक संबंध सहन करु शकत नाही. पतीला आपल्याऐवजी दुसऱ्या स्त्रीमध्ये शारीरिक व मानसशास्त्रीय आकर्षण वाटावे व त्याने ते हुडकत हिंडावे, हे खुद्द पत्नीही पसंत करु शकत नाही. पती-पत्नीचे आपापसातील संबंध कितीही तणावपूर्ण का असेनात कोणतीही स्त्री अशी अवस्था कोणत्याही स्थितीत सहन करु शकत नाही.

## तीन रुपे

पतीच्या संभोगेच्छेला पत्नीने नकार देण्यास तीन कारणे असू शकतात.

१. पत्नी पतीचा तिरस्कार करते व त्याच्याशी संभोग तिला पसंत नाही.

२. पतीशी ती प्रेम करते, पण संभोग करणे तिला आवडत नाही. म्हणून तो जेव्हा तशी मागणी करतो, तेव्हा ती नकार देते. ही एक अपवादात्मक अवस्था आहे. परंतु प्रत्यक्ष जीवनामध्ये ती सामान्यत: आढळते.

३. पती तिला फार आवडतो व समागमास अगर संभोगसही ती वाईट समजत नाही. पण त्या विशिष्ट समयी असावी तशी तयारी तिच्यात होत नाही.

पहिला प्रकार टिकणारी अवस्था असून तो एखाद्या ठराविक कामापुरताच व ठराविक कालापुरताच मर्यादित असेल असे नाही. या प्रकारात वैवाहिक जीवन जास्त काळ टिकू शकत नाही. या अवस्थेवर पती-पत्नीला विभक्त होण्याची परवानगी देणे, हाच सर्वोत्तम उपाय आहे. या संदर्भात इस्लामने पुरुषापेक्षा स्त्रीला कितीतरी सोई करुन ठेवल्या आहेत, ते आता आपण पाहू या.

दुसऱ्या प्रकारातही पत्नीची विवशता कायमची असू शकते. त्याचे कारण पतीच्या कामेच्छेमध्ये शोधले जाऊ शकत नाही. तो एक रोग अगर विकृती आहे. त्यावर पूर्णपणे उपाय व इलाज व्हावयास हवेत, जेणेकरुन पती-पत्नीत तडजोड व एकजिनसीपणा निर्माण होईल. पत्नीची इच्छा नसेल, तर पतीने संयम करुन त्याग सहन करावा, नाहीतर पत्नीने पतीची इच्छा पूर्ण करावी. प्रेमाची हीच हाक आहे. तसेच घटस्फोटापासून वाचण्याचा हाच मार्ग आहे. जर पती-पत्नी आपसात अशा प्रकारची तडजोड करण्यात अपयशी झाले तर त्यांनी सभ्यपणाने एकमेकांपासून विभक्त झाले पाहिजे परंतु जोपर्यंत ते विवाहबंधनात असतात तोपर्यत समागमाची पतीची इच्छा पत्नीने पूर्ण केली पाहिजे, अशी इस्लामी कायद्याची निकड आहे कारण ही स्वाभाविक अवस्था

आहे. ही गोष्ट स्त्रीवर जबरदस्ती किंवा जुलूम होत नाही कारण कायद्याचा मानस केवळ इतकाच आहे, की पतीला नैतिक मार्गभ्रष्टतेपासून वाचविण्याचा तसेच त्याला दुसरा विवाह करण्यापासून रोखण्याचा आहे. तसे घडले तर ती गोष्ट स्त्रीला सक्तीच्या समागमापेक्षा जास्त कष्टदायक ठरेल; पण अशा तऱ्हेचे तणावपूर्ण वैवाहिक संबंध सतत असणे इस्लामी कायद्याला पसंत नाही. पत्नीने पतीचा तिरस्कार करावा व वारंवार सक्तीच्या समागमाच्या कारणास्तव तिला अतिजिकीर व्हावी, अशा अवस्थेतही पती-पत्नीने एकमेकांपासून विभक्त होणे हीच गोष्ट अधिक चांगली आहे.

तिसरा प्रकार एक तात्पुरती अवस्था आहे व ती सुलभतेने संपविली जाऊ शकते. शारीरिक थकव्याचा परिणामसुद्धा समागमाच्या तिरस्काराचे कारण असू शकतो, परंतु काही झाले तरी ही तात्कालिक व तात्पुरती दशा आहे. स्त्री आपल्या शारीरिक व मानसशास्त्रीय सहाय्याने या दशेवर ताबा मिळवू शकते. भेटवस्तू अगर नजराणे देऊन स्त्रीला खूष करुन तिचे औदासिन्य घालविले जाऊ शकते. अशाच तऱ्हेने प्रत्यक्ष संभोगापूर्वी प्रेमचेष्टा करुनही तिच्या औदासिन्यावर मात केली जाऊ शकते. प्रेमक्रिडा केल्याने पती-पत्नीचे मीलन पशूवत संभोग उरत नसून, त्यांना त्यापासून एक उच्च आध्यात्मिक अनुभव प्राप्त होतो. या पद्धतीने पत्नीचा समागमाबद्दल असलेला तिरस्कारसुद्धा घालविला जाऊ शकतो.

या उलट जर पत्नीला पतीशी समागमाची इच्छा झाली, पण कोणत्याही असाधारण कारणास्तव पती जर तयार नसेल (पुरुषात अशी व्यवस्था क्वचितच आढळते) तर इस्लामी कायद्याने स्त्रीला असे निराधार सोडून दिलेले नाही, की पुरुषाला वैवाहिक सुख पत्नीला देण्यासाठी भाग पाडलेच जाऊ शकत नाही. जो इस्लामी कायदा पत्नीने पतीला सगागमाने सुख देणे अनिवार्य करतो, तो पत्नीची उचित संभोगेच्छा पुरी केली जावी याचीही पूर्ण तरतूद व व्यवस्था करतो. त्याची अशी निकड आहे की पत्नीने समागमाची इच्छा व्यक्त केल्यास ती पुरी करणे पतीला अनिवार्य ठरते. जर एखादा पती आपल्या पत्नीची संभोगेच्छा तृप्त करु शकला नाही तर त्यांचे वैवाहिक बंधन समाप्त केले जाईल. या सविस्तर चर्चेवरुन हे स्पष्ट होते, की इस्लामी कायद्याने स्त्रीचे तसेच पुरुषाचे हक्क नजरेआड केले नाहीत; आणि त्यांची कर्तव्येही नजरेआड केली नाहीत. त्याच्यात असे कोणतेही कलम नाही ज्यावरुन पत्नीचा अनादराचा पैलू निघतो अगर कोणावरही कसल्याही प्रकारचा जुलूम, जबरदस्ती असल्याचे सिद्ध होते.

## दुसरे कर्तव्य

जिचे घरात आगमन होणे पतीच्या दृष्टीने चांगले नाही, अशा कोणाही व्यक्तीला घरात प्रवेश न करु देणे, हे पतीकडून पत्नीवर येऊन पडणारे दुसरे महत्त्वाचे कर्तव्य आहे. (या शिकवणुकीचा पत्नीच्या दुराचाराशी संबंध नाही, कारण इस्लामी कायदा पत्नीचा दुराचार सहन

करतच नाही व पतीची इच्छा असली तरी पत्नीने दुराचारापासुन दूर राहणे आवश्यक आहे.) या आदेशातील चातुर्य अतिशय स्पष्ट आहे, कारण पती-पत्नीतील अधिकांश भांडणाचे कारण असा बाह्य व्यक्तीचा हस्तक्षेप किंवा ढवळाढवळ असते. ते येथे तेथे लावालावी करुन कौटुंबिक भांडणाच्या आगीत तेल ओतण्याचे कृत्य करीत असतात. अशा प्रकारच्या हितकर सल्ल्याच्या दृष्टीने पतीने जर पत्नीला असा आदेश दिला की तिने अमुक एका व्यक्तीला घरात येऊ देऊ नये व पत्नीने जर तसे करण्यास नकार दिला तर त्यांच्यातील संबंध प्रेमाचे राहू शकत नाही, हे उघड आहे. याचा परिणाम असा होईल की घराला कायमचे रणांगणाचे स्वरुप येईल आणि त्यांच्यात सांमजस्याची व तडजोडीची कसलीही शक्यता उरणार नाही. कुटुंबाच्या व मुलांच्या कल्याणाचीही अशीच निकड असते की पत्नीने आपली कर्तव्ये पार पाडावीत. कारण मुलांचे खरेखुरे व योग्य संगोपन प्रेमाने व सहानुभूतीने परिपूर्ण असलेल्या प्रसन्न वातावरणात होऊ शकते.

कायद्याच्या दृष्टीने पतीच्या इच्छेविना कोणालाही घरात प्रवेश करु न देणे पत्नीला आवश्यक असते, तर मग पतीनेसुद्धा पत्नीच्या इच्छेविना कोणालाही घरात प्रवेश करु न देणे का आवश्यक होत नाही, असा प्रश्न या प्रसंगी केला जाऊ शकतो. पती पत्नी सुसंस्कृत व समंजस असतील व सुखासमाधानाने नांदत असतील तर अशा प्रकारचा कोणताही प्रश्न मुळातच उद्‌भवणार नाही. जर एखादेवेळी निर्माण झाला तर ते स्वत:च तो सोडवून टाकतात. परंतु जर त्यात कटुता निर्माण झाली व ती संपुष्टात आणणे जर शक्य राहिले नाही, तर त्यांना न्यायलयात रुजू व्हावे लागते. आता जर पत्नीला, कोणत्याही व्यक्तीस घरात प्रवेश करु न देण्याचा अधिकार प्राप्त झाला तर त्यामुळे ही बाब अधिकच बिकट होऊन बसेल. कारण बहुतेक बाबतीत स्त्रीचे उद्गार बुध्दी व तर्क यापासून मुक्त असून, त्यात हिताच्या व दूरदर्शीपणाऐवजी. व्यक्तिमत्त्वाचे वैशिष्ट्यच प्रतिबिंबित होत असते. किंवा सासरच्या माणसाशी असलेल्या तणावपूर्ण संबंधाची प्रतिक्रिया असते; म्हणून अशा प्रकरणात केवळ पत्नी तिच्या इच्छेनुसार ज्या व्यक्तीला घरात प्रवेश करु देईल, त्यालाच घरात येऊ देण्याचे बंधन जर पतीवर घातले गेले, तर ते विचारपूर्वक व अकलेने केलेले ठरणार नाही. अशी अवस्था दीर्घकाळपर्यंत चालू ठेवणेही शक्य नाही, कारण ही गोष्ट स्वाभविकपणाविरुद्ध आहे.

यामध्ये माझा उद्देश असा कदापिही नाही की पतीच्या हातून कोणत्याही चुका होतच नाहीत. उलटपक्षी काही वेळा त्याच्याकडून पोरकटपणाची कृत्ये घडतात व तो विक्षिप्तपणा, तऱ्हेवाईटपणा व वटवट करणारा असतो. त्याचप्रमाणे या चर्चेचा असाही अर्थ होत नाही, की चुका नेहमी पत्नीकडूनच होतात व पती अगदी निरपराध असतो. कारण असेही असू शकते की पत्नी उचित रीतीनेच पतीचा तिरस्कार करते, तसेच अशा प्रकारच्या अपवादात्मक परिस्थितीकरिता पतीलाच अनुकूल असा कायदा असणे ही गोष्टसुद्धा पती-पत्नीतील तणावपूर्ण संबंधाचे मूळ कारण

असणे शक्य आहे. कारण कायदा सर्वसाधारण परिस्थितीकरिता व सर्व लोकांकरिता केला जातो. पुरुषामध्ये स्त्रीपेक्षा औचित्य अधिक प्रमाणात आढळून येते, म्हणून पुरुषाला स्त्रीपेक्षा अधिक श्रेष्ठत्वाचे स्थान प्राप्त आहे. परंतु पत्नीला जर असेच वाटत असेल की ती पतीबरोबर जीवन कंठू शकत नाही तर तिच्या इच्छेनुसार तिला विभक्त होण्याचा अधिकार प्राप्त आहे.

## तिसरे कर्तव्य

आता उरले स्त्रीचे तिसरे कर्तव्य म्हणजेच पतीच्या गैरहजेरीत त्याच्या अब्रूचे व संपत्ती-मालमत्तेचे रक्षण करणे. ही तर विवाहाची अगदी स्वाभाविक व तर्कसंगत निकड असून तिच्या बाबतीत कसलीही चर्चा करण्यास वाव नाही. परंतु हे कर्तव्यसुद्धा एकांगी नसून द्विपक्षीय आहे अर्थात दोघा पती-पत्नीनी एकमेकांशी एकनिष्ठ व हितचिंतक असावे.

## अपयशी पती-पत्नी

क्षणभर आपण अशा पती-पत्नीसंबंधी थोडासा विचार करु जे एकामेकांवर जुलूम, अन्याय व अतिरेक करीत असतात. पुरुष हा कुटुंबाची देखभाल करणारा व कुटुंबाच्या सर्व गरजा भागविण्यास जबाबदार असतो, म्हणून त्याला असा अधिकार दिला गेला आहे की बंडखोर व वरचढ पत्नीला वठणीवर आणण्यासाठी प्रसंगोपात त्याने धाकदपटशाचा अवलंब करावा.

ही गोष्ट खालील आयतीवरुन स्पष्ट होते,

'ज्या स्त्रिया घमेंडखोर व चिडक्या स्वभावाच्या असतील, त्यांना तोंडी उपदेश करा, त्यांना शयनगृहात एकट्या ठेवा, त्यांना मारहाण करा पण जर त्यांनी तुमचे आज्ञापालन करण्याचे सुरु केले तर त्यांच्या विरुद्ध (जुलूम व अत्याचार करण्यासाठी) निर्मित्त शोधू नका.'

(कुरआन ४:३४)

## पत्नीची सुधारणा करण्याची पद्धत

या आयतीमध्ये वरचढ पत्नीच्या वर्तणुकीत सुधारणा घडवून आणण्यासाठी कृती करण्याचा एक ठराविक क्रम दिलेला आहे. शारीरिक शिक्षेचा क्रम यात सगळ्यात शेवटी आहे. काही पुरुष आपल्या या अधिकाराचा गैर वापर करतात. ही गोष्ट आम्ही जाणतो, पण ही अवस्था केवळ या अधिकारापुरती मर्यादित नसून इतर आधिकारांच्या बाबतीतही ती निर्माण होऊ शकते. माणसामध्ये आध्यात्मिक तसेच नैतिक उंची निर्माण करणे व वाढविणे हाच त्यावर उपाय आहे. म्हणून वरील आयतीत जो कायदा केला गेला आहे, त्याचा हेतू कौटुंबिक जीवनाला सुदृढ करुन त्याचे रक्षण करण्याचा आहे. कारण ज्या कायद्याच्यापाठी मागे अमंलबजावणी करु शकणारी व त्याचा भंग करणाऱ्यास शिक्षा देऊ शकणारी शक्ती असते; असाच कोणताही कायदा हितकर व

परिणामकारक होऊ शकतो. त्याच्या पाठीमागे अशी अंमलबजावणी करु शकणारी शक्ती नसेल तर त्याचे मूल्य रिकाम्या रक्तरंजित शब्दाहून काही अधिक नसते. असा कायदा जगात कसलाही परिणाम अगर चमत्कार करुन दाखवू शकत नाही.

## या आदेशातील हितकर सल्ला

विवाहाचा उद्देश स्त्री व पुरुष या दोहोंचे हित व कल्याण करण्याचा असतो. त्याचा उद्देश असा आहे की घरात प्रेम व शांतता नांदावी, जेणेकरुन पती-पत्नीला कायद्याचा आधार घेतल्याशिवाय जास्तीतजास्त आध्यात्मिक व भौतिक लाभ व सुख मिळणे शक्य व्हावे. परंतु पती-पत्नीत मतभेद व भांडणे असतील तर त्याचा दुष्परिणाम केवळ त्यांच्या पुरताच मर्यादित राहत नसून, त्याची झळ त्यांच्या संततीला, अर्थात भावी पिढीलाही लागल्याशिवाय राहू शकत नाही.

## न्यायालय व कौटुंबिक झगडे

पत्नीच्या वर्तणुकीची चालरीत जर वैवाहिक जीवनाच्या कटुतेचे कारण असेल, तर त्यात सुधारणा कोणी करावयाची असा प्रश्न आहे. न्यायालय हे काम करु शकते काय? पती-पत्नीच्या अंतर्गत बाबतीत हस्तक्षेप करुन न्यायालय प्रकरण जास्त बिकटच करीत असून, त्यात कसलीही सुधारणा करु शकत नाही, हेच सत्य आहे. त्यांच्यातील मतभेद अगदी क्षुल्लक व तात्पुरते असणे शक्य आहे. परंतु न्यायालयात रुजू झाल्याने त्यांना जास्त गुंतागुंतीचे व हानीकारक स्वरुप येऊ शकते. कारण जेव्हा एखादे प्रकरण न्यायालयात रुजू होते तेव्हा वादीचा तसेच प्रतिवादीचा अहंकार त्यांना कोणतीही तडजोड करण्यायोग्य राहू देत नाही. म्हणून लहान सहान कौटुंबिक भांडणे न्यायालयापर्यंत न घेऊन जाणे, हीच योग्य पद्धत आहे. न्यायालयाने केवळ महत्त्वाच्या तसेच मोठमोठ्या व गंभीर प्रकरणातच हस्तक्षेप केला पाहिजे व तेसुद्धा तडजोडीचे सर्व दरवाजे अपयशी ठरुन बंद झाल्यावरच करावे. कोणीही समंजस माणूस जीवनात प्रत्येक क्षणी उद्‌भवणाऱ्या तक्रारी, गाऱ्हाणी व अशा लहानसहान बाबी न्यायालयात नेत नसतो. तसे झाले तर आम्हाला घरातच एक न्यायालय स्थापण करावे लागेल व अशा न्यायालयांना रात्रंदिवस या कौटुंबिक तक्रारींचे निराकरण करण्यात व्यग्र असावे लागेल.

## पुरुषाचे चारित्र्य

घरातील एकंदर सुधारणा स्वत: करु शकणारी अशी एखादी शक्ती घरामध्ये असणे, कोणत्याही परिस्थितीत आवश्यक आहे. ही गोष्ट स्पष्ट आहे. म्हणून कुटुंबप्रमुखाच्या नात्याने पुरुष घरची सर्व कर्तव्ये पार पाडतो. वर दिलेल्या आयतीत त्याला असा आदेश देण्यात आला

आहे, की पत्नीचा स्वाभिमान न दुखावता तिला तोंडी समज देऊन तिच्यात सुधारणा करण्याचा प्रयत्न करावा. त्याच्या परिणामस्वरुप पत्नीने आपल्यात सुधारणा करुन घेतली तर प्रश्नच मिटतो. परंतु ती जर आपल्या चुकीचेच समर्थन करीत राहिली तर पतीने तिला शयनगृहात वेगळे ठेवावे. ही शिक्षा पहिल्या शिक्षेपेक्षा (तोंडी समज) अधिक कठोर आहे. यावरुन हे स्पष्ट होते की इस्लाम स्त्रीच्या मानसशास्त्राचे किती खोलवर ज्ञान बाळगतो. आपल्या सौंदर्याच्या व रुपाच्या तोऱ्यात स्त्री कधीकधी इतकी अहंकारी व वरचढ होत असते, की आपल्या पतीची उघड उघड अवज्ञा करण्यापर्यंत तिची मजल जाते. या दृष्टीने तिला शयनगृहात वेगळे ठेवल्याने ती आपल्या सौंदर्याने, रुपाने तसेच नाजुक हावभावाने पतीला विवश करु शकत नाही, असा अर्थ होईल. असे केल्याने तिची सौंदर्याबद्दलची घमेंड व अहंकार थोडा कमी होऊन ती योग्य वागणूक करु लागते. परंतु या शिक्षेनंतरही जर तिच्यात सुधारणा झाली नाही तर त्याचा अर्थ असा होईल की तिचा अहंकार इतका आहे की शारीरिक शिक्षेविना इतर कोणत्याही प्रकारे तिच्यात सुधारणा होऊच शकत नाही. जर अशी अवस्था निर्माणच झाली तर शेवटचा उपाय म्हणून तिला मारझोड करण्याची पतीला परवानगी आहे. पण अशा मारझोडीचा उद्देश पत्नीमध्ये सुधारणा घडवून आणण्याचा असावा, परंतु तिला छळण्याचा नसावा. म्हणूनच इस्लामी कायद्यानुसार अशी मारझोड किरकोळ स्वरुपाची असावयास हवी.

## सावध राहा

स्त्रीशी अशी कठोर वागणूक, तिचा अनादर व तिचा स्वाभिमान दुखवण्यासमान आहे काय? नाही अशी गोष्ट नाही. कारण, समस्येच्या या पैलूवर चर्चा करताना पहिल्यांदा आम्हाला हे लक्षात ठेवले पाहिजे की अशा मारझोडीचे स्वरुप, सावधानतापूर्वक योजलेल्या एखाद्या उपायासारखे आहे. जेव्हा सुधारणा घडवून आणण्याचे इतर सर्व मार्ग अपयशी ठरतात तेव्हाच त्याचा अवलंब केला जातो.

## शिक्षा, एक मानसशास्त्रीय गरज

दुसरी गोष्ट आम्हाला लक्षात ठेवली पाहिजे, की काही मानसशास्त्रीय दोष व पेच असे असतात, की त्यात सुधारणा घडवून आणण्याकरिता मारझोड व शारीरिक शिक्षेखेरीज दुसरा मार्ग शक्यच नसतो. मानसशास्त्रज्ञ आम्हाला दर्शवितात, की जीवनांतील सुधारणा अवस्थामध्ये वर सांगितलेले सुधारणेचे मार्ग तोंडी समज व उपदेश तसेच शयनगृहात एकांतवास वगैरे परिणामकारक ठरतात. परंतु काही मानसशास्त्रीय विकृती व रोग, जसे कामक्रीडा करताना परपीडा करण्यात आनंद मानणे, असे असतात की अशा विकृत व्यक्तीचा इलाज व उपचार केवळ शारीरिक शिक्षा देऊनच शक्य असतो. अशा मानसिक रोगास पुरुषापेक्षा स्त्रियाच अधिक

प्रमाणात बळी पडतात. अशा प्रकारच्या विकृत स्त्रियांना अवमान व मारझोड करुन घेण्यातही एक प्रकारचा आनंद वाटतो. या उलट, पुरुष सर्वसाधारणपणे ज्या विकृतीला बळी पडतात तिला परपीडक कामवासना (सॅडिजम) म्हणतात. याला बळी पडलेल्या पुरुषांना कामक्रीडा करताना स्त्रीला पीडा, क्लेश व यातना करण्यात एक विकृत आनंद मिळत असतो. जर स्त्रीमध्ये अशी परपीडक कामवासनेची विकृती असेल तर ती सुधारण्यांचा इलाज, मारझोड व शारीरिक शिक्षा दिल्यानेच शक्य आहे. जेणेकरून तिची मानसशास्त्रीय गरजही भागविली जाईल व तिला पूर्ववत चेतना प्राप्त होऊन ती शुद्धीवर येईल. दिसावयास ही गोष्ट कितीही विचित्र वाटली तरी हे सत्य आहे, की परपीडक कामवासना असलेला पुरुष व परपीडक कामवासना असलेली स्त्री त्यांचे परस्परांतील संबंध जरी बिघडत असले तरी ते जीवनात एकमेकांचे चांगले जोडीदार होऊ शकतात. अशा तऱ्हेची परपीडक कामवासनेच्या पुरुषांची व परपीडक कामवासनेच्या स्त्रियांची उदाहरणेही मानवी जीवनात काही कमी आढळत नाहीत. अशा पत्नीही आढळतात ज्या वेळोवेळी आपल्या पतीला भरपूर बडवतात व त्यांच्या परपीडक कामुक पतीचा स्वभावसुद्धा असे बडवून घेतल्यानेच सुधारतो. ही पतीची मानसशास्त्रीय गरज पत्नी चागल्या तऱ्हेने भागवित असते. अशी जोडपीही एकमेकांबरोबर आनंदात नांदत असतात. म्हणून जेव्हा पती किंवा पत्नीमध्ये ही सवय विकृतीप्रत पोचते तेव्हाच मारझोडीचा अवसर निर्माण होतो. त्याखेरीज अशी अवस्था शक्य होत नाही. कसेही झाले तरी इस्लामी कायदा पत्नीला मारझोड करण्याची पतीला जी परवानगी देतो, त्याचे स्वरुप सावधानतेने केले गेलेल्या उपाययोजनांसारखीच असते. लहानसहान चुकांसाठी आपल्या पत्नीला मारझोड करण्याची कोणत्याही पतीला परवानगी नाही. कुरआनच्या आयतीत सुधारणांच्या उपायांचा क्रमवार उल्लेख हेच सत्य प्रकट करते. इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांनी पुरुषांना त्यांचा हा अधिकार केवळ त्याच वेळी वापरण्याची परवानगी दिली आहे, जेव्हा अन्य सर्व उपाय उपयोगी ठरु शकत नाहीत, त्यांचे सांगणे असे आहे,

'जसे गाढवाला बडवले जाते, तशा रीतीने तुम्हापैकी कोणीही आपल्या पत्नीला मारझोड करु नये व दिवसाच्या शेवटच्या भागातच (रात्री) तिच्याशी समागम केला जावा.'

(बुखारी)

## पतीच्या दुर्वर्तनावर उपाय

जर पत्नीला पतीकडून दुर्वर्तनाची भीती असेल तर अशा स्थितीत कायदा थोडासा भिन्न आहे. अल्लाहचे सांगणे असे आहे,

"जर एखाद्या स्त्रीला आपल्या पतीकडून उघड उघड चिडखोरपणाचे, घमेंडखोरपणाचे, आततायीपणाचे व बेपर्वाईचे भय वाटत असेल, तर दोघांनी या प्रकरणात आपसात तडजोड केली तर तो गुन्हा नाही व अशी तडजोड अधिक चांगली आहे." (कुरआन ४:१२९)

काही लोक या बाबतीतही स्त्री-पुरुषात समानतेची मागणी करु शकतात; पण प्रश्न केवळ तात्त्विक अगर काल्पनिक न्यायाचा नसून मानवप्रकृतीशी त्याचा मेळ बसतो. स्त्री, मग ती मागासलेल्या 'पूर्व'ची असो की सुसंस्कृत 'पश्चिमे'ची असो, पतीने केलेल्या मारहाणीचे उट्टे पतीला मारहाण करुन काढण्यात यावे व त्याला मारहाण करावी, ही गोष्ट तिला कदापिही आवडणार नाही. तिच्या हातून बडवला जाणारा व मार खाणाऱ्या कमकुवत पतीला, ती आदराच्या दृष्टीने पाहूच शकत नाही. जसे पत्नीला मारहाण करण्याचा अधिकार पतीला आहे, त्याचप्रमाणे पतीला मारहाण करण्याचा अधिकार पत्नीलाही मिळावयास पाहिजे, जेणेकरुन तिला पतीला यथेच्छता बडविता येईल. अशी मागणी कोणाही स्त्रीने आतापर्यंत केली नाही, त्याचे हेच कारण आहे.

स्त्रीने निमूटपणे आपल्या पतीचे जुलूम अत्याचार व अन्याय सहन करीत राहावे व त्याविरुद्ध ब्रसुद्धा काढू नये, असा इस्लामचा दृष्टिकोन मुळीच नसून तो त्याचा महत्त्वाचा पैलू आहे. उलट अशा स्थितीत इस्लाम तिला असा अधिकार देतो की तिची इच्छा असल्यास तिने पतीपासून विभक्त व्हावे.

## चर्चेचा सारांश

वरील चर्चेवरुन खालील गोष्टी आमच्यासमोर येतात.

१. स्त्री ही समाजाचे एक अंग आहे. सामाजिक कल्याणासाठीच पत्नीवर काही कर्तव्यें टाकली गेली असून ते केवळ क्रौर्याचे किंवा बळाचे प्रदर्शन नव्हे.

२. पत्नीच्या अधिकांश कर्तव्याप्रमाणेच पतीवरही याच प्रकारची कर्तव्यें ठरलेली आहेत. ज्या काही मोजक्या प्रसंगी पुरुषाला स्त्रीपेक्षा कसलेतरी श्रेष्ठत्व प्राप्त आहे, त्याचे कारण त्यांच्या प्रकृतीतील भिन्नता होय. त्याचा उद्देश स्त्रीला तुच्छ लेखण्याचा अगर तिचा अनादर करण्याचा नाही.

३. स्त्रीपेक्षा पुरुषाला जे श्रेष्ठत्व प्राप्त आहे, त्याच्या मोबदल्यात स्त्रीलाही असा कायदेशीर अधिकार आहे, की पतीने जर तिच्याशी दुवर्तन केले तर तिने पतीचा त्याग करावा.

## तलाक (घटस्फोट) चे तीन प्रकार

तलाकद्वारा स्त्री विवाहबंधनातून मुक्त होऊन व वैवाहिक कर्तव्यातून मुक्त होऊन पतीपासून विभक्त होऊ शकते. तलाक मिळविण्याचे तीन प्रकार आहेत.

१. विवाहसमयी स्त्रीने आपल्या भावी पतीकडून तलाकचा हक्क (परंपरागत मिळणारी रक्कम देणगी) प्राप्त करावा.

इस्लामी कायद्याप्रमाणे पतीची इच्छा असल्यास पत्नीला प्राप्त असलेली तलाकच्या हक्काची रक्कम तिला तात्काळ देऊ शकतो. पण प्रत्यक्ष व्यवहारात फार कमी स्त्रिया आपल्या या अधिकाराचा वापर करतात. काहीही झाले तरी त्यांचा हा अधिकार चालू असतो व हवा तेव्हा त्याचा लाभ घेऊ शकतात.

२. पतीचा तिरस्कार वाटतो व त्याच्याबरोबर जीवन कंठू शकत नाही. या आधारावरही स्त्री आपल्या पतीपासून घटस्फोट मिळण्याची मागणी न्यायालयात करु शकते. काही न्यायालये या नियमानुसार अमल करत नाहीत असे आमच्या ऐकण्यात आहे. स्त्रीने अशी मागणी करुनही तिचे पतीशी असलेले वैवाहिक बंधन संपुष्टात आणीत नाहीत. या बाबतीत इस्लामचा आदेश अस्तित्वात आहे व इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांच्या आदर्श जीवनानेही या गोष्टीचे समर्थन होत असून त्या दृष्टीने ते इस्लामी धर्मशास्त्राचेच एक अंग आहे. जेव्हा पत्नी स्वत:हून तलाकची मागणी करते तेव्हा तिच्यावर केवळ एकच बंधन असते व ते म्हणजे पतीकडून विवाहप्रसंगी तिला मिळालेल्या देणगीच्या वस्तू (दहेज) तिने परत कराव्यात. पतीने जर पत्नीला तलाक दिला तर पतीलाही देणगीच्या वस्तु परत कराव्या लागतात व हे न्यायाला धरुनच आहे. असे समजा की विवाहबंधनांतून मुक्त होण्यासाठी पती व पत्नी आणि दोघांना वस्तुच्या रुपाने काही भौतिक नुकसान सहन करावे लागते.

३. पत्नीसमोर तिसरा मार्ग न्यायालयाद्वारा पतीकडून तलाक मिळवून त्याच वेळी दहेजच्या वस्तू व झालेला सर्व खर्च वसूल करणे आहे. पतीने तिच्याशी दुर्वर्तन केले याबद्दलचा समाधानकारक पुरावा तिने न्यायालयाकपुढे सादर करणे, एवढी एकच अट असते. तसेच विवाहप्रसंगी पतीने तिचा खर्च भागविण्याचे जे वचन दिले होते ते पार पाडले नाही हेही न्यायालयाला दाखवून द्यावे. न्यायालयास दावा खरा आहे असे जर वाटले, तर विवाहबंधन नष्ट केल्याचा हुकूम देऊ शकते.

हे सर्व अधिकार इस्लामने स्त्रीला दिले आहेत. तिला जरुरी वाटेल तेव्हा ती त्याचा वापर करु शकते. स्त्रीला हे सर्व अधिकार देऊनच पती व पत्नीच्या अधिकारात एक समतोलपणा निर्माण होतो. पतीला पत्नीपेक्षा अधिक श्रेष्ठत्व प्राप्त आहे, तर पत्नीलाही त्या तुलनेत काही अधिकार प्राप्त आहेत.

## कौटुंबिक पेच

तलाकचे परिणामस्वरुप कितीतरी कुटुंबे अनेक समस्यांस बळी पडतात हे आम्ही जाणतो. तलाकच्या अनुषंगाने निर्माण होणाऱ्या झगड्याची न्यायालयात इतकी गर्दी झालेली असते की ते कधी संपणारच नाहीत असे वाटते. एखादी एकनिष्ट पत्नी आपल्या अंगावर पिणाऱ्या मुलाचे संगोपन व कोडकौतुक करीत, तसेच दुसऱ्या संततीची अपेक्षा व इच्छा मनात जोपासीत

असतानाच अचानकपणे एक निरोप येतो, पतीतर्फे एक कागदाचा तुकडा 'तलाकनामा' तिच्या हातात पडतो व तिच्या शांत जीवनात एक वादळ निर्माण होते. पतीने अशी कृती करण्याचे कारण, त्याची तात्कालिक पेटलेली एखादी भावना अगर विचार असेल किंवा त्याला पत्नीपेक्षा अधिक सुंदर स्त्री भेटली असेल व तिच्याशी विवाह करु इच्छित असेल किंवा त्याचे कारण केवळ हेही असू शकेल, की त्याला पत्नीचा वीट आला असेल व त्याला नाविन्य हवे आहे. तसेच पत्नीचा थकवा व तिचे औदासिन्यही घटस्फोटाचे कारण होऊ शकते, ज्यामुळे तिने पतीच्या समागमाची इच्छा धुडकावून लावली असेल व या गोष्टीची प्रतिक्रिया म्हणून पतीने तलाक देऊन टाकला असेल. या सर्व गोष्टी पाहून स्त्रियांचे समर्थन करणारे असे विचारतात की प्रासंगिक किंवा तात्काळच्या भावनाक्षोभाच्या कारणाने पती कोणत्याही क्षणी आपल्या निरपराध व सहनशील पत्नीचे जीवन उद्ध्वस्त करणारा व आपल्या मुलांचे भवितव्य अंधकारमय करणारा, पतीचा हा तलाकचा भयानक अधिकार काढून घेतला जावा; जेणेकरुन त्याला या अधिकाराचा गैरवापर करुन कोणाचेही नुकसान करता येणे अशक्य व्हावे, असे केल्यास ते योग्य होणार नाही काय?

## रोमन कॅथलिक देशाचे उदाहरण

पत्नीला व मुलांना भोगाव्या लागणाऱ्या सर्व संकटांचे कारण तलाकच असते हे आम्ही जाणतो. पण प्रश्न असा आहे की यावर उपाय काय आहे? पुरुषाकडून तलाकचा अधिकार हिरावून घेतला जावा? जर याचे उत्तर होकाराकात्मक असेल तर तलाक अनिवार्यपणे वर्ज्य असलेल्या रोमन कॅथलिक देशात पुरुषाला घटस्फोटाच्या अधिकारापासून वंचित केल्याने जी भयानक अवस्था आढळून येते, तिला कोणत्या रितीने पायबंद घालता येईल? वैवाहिक बंधन जर अभंग व कायमचे केले गेले तर जे पती-पत्नी एकमेकांचा तिरस्कार करतात व सतत एकमेकांशी भांडत असतात त्यांचा थोडासा विचार करु या. अशा अवस्थेमध्ये नैतिक अपराध अधिक वाढण्यास व फोफावण्यास अवसर मिळणार नाही काय? पती व पत्नी आपली प्रियतमा व प्रियकर हुडकत फिरणार नाहीत काय? अशा प्रकारच्या काळ्याकुट्ट घाणेरड्या व रोगट वातावरणात मुलांचे योग्य प्रकारे संगोपन होणे अशक्य आहे. कारण त्याकरिता मातापित्यांचे प्रेम व माया, तसेच आर्थिक सोज्वळ सामाजिक वातावरण आवश्यक असते. येथूनच लोकांच्या जीवनात मानसशास्त्रीय पेच व अडचणी निर्माण होतात. त्याचे मुख्य कारण अशा तऱ्हेचे भांडकुदळ आई-बापच होत.

## न्यायालय व कौटुंबिक भांडणे

पुरुषाला जो तलाकचा अधिकार प्राप्त आहे, त्यावर बंधन घालून तो मर्यादित करण्यात

यावा, जेणेकरून तो केवळ पतीचे इच्छेवरच आधारीत न राहता, तो अधिकार केवळ न्यायालयालाच असावा. न्यायालयाने दोघाही वादी-प्रतिवादीच्या मध्यस्थांना बोलावून घेऊन त्यांच्यात समेट करावा व असे करण्यात जर न्यायालय अपयशी ठरेल तर त्याने घटस्फोटाचा हुकूमनामा द्यावा. परंतु हुकूमनामा देण्यापूर्वी, मध्यस्थांना प्रकरणाचा पूर्ण अभ्यास करुन ते गाळून पडताळून घेतले पाहिजे. पतीने तलाक परत घेण्यासाठी व पत्नीशी समेट करण्याची पुरेपूर प्रयत्न केले पाहिजे. हे उपाय निष्फळ ठरले तर केवळ अशा प्रसंगीच तलाक दिला जावा व त्याची घोषणा करण्याचा अधिकार पतीकडे न ठेवता तो न्यायालयाकडे असावा.

आमच्या दृष्टीने पती-पत्नीमध्ये अशा प्रकारचा समेट घडवून आणण्यासाठी उपाय केले जाऊ शकतात व कायद्याच्या दृष्टीनेही त्यात काही अडचण असू शकत नाही. पण या बाबतीत न्यायालयाने हस्तक्षेप करण्याची काही आवश्यकता नाही असे आम्हाला वाटते. कारण या समस्येचे इस्लामी धर्मशास्त्रात जे निरसन व समाधान दाखविण्यात आले आहे, ते आम्हाला पुरेसे आहे व ते असताना आम्हाला इतर कोणत्याही समाधानाची गरज नाही. जेथवर समेटाचा प्रश्न आहे, तो पती-पत्नीच्या इच्छेवर अवलंबून असतो. जर त्यांना प्रामाणिकपणे समेट हवा असेल तर जितके न्यायालयाकडून सहाय्य मिळत असते तितक्याच मदतीचा लाभ त्यांच्या नातेवाईकांकडून व मित्रमंडळी कडूनही मिळू शकतो. त्यांच्या मनात अशी इच्छाच नसेल तर जगातील कोणतेही मोठ्यात मोठे न्यायालयही त्यांच्यात समेट घडवून आणू शकत नाही. आजसुद्धा जगात असे देश आहेत जेथे समजूत घालण्याचे व समेट करण्याचे सर्व प्रयत्न व्यर्थ ठरतात व तेथे न्यायालयातच तलाकनामें जारी करत असते. तरीसुद्धा अशा देशात दरवर्षी असंख्य घटस्फोट होतात. केवळ अमेरिकेतच घटस्फोटाचे प्रमाण ४० टक्के आहे व तेच जगातील सर्वोच्च प्रमाण आहे.

## न्यायालयीन हस्तक्षेपाचा हा अंधकारमय पैलू

पती जेव्हा सर्व कायदेशीर पुरावे सादर करुन न्यायालयाची अशी खात्री करुन देईल की सर्व दोष त्याच्या पत्नीचाच असून तो तिच्याबरोबर आपले जीवन कंठूच शकत नाही. केवळ तेव्हाच घटस्फोट दिला जावा. अशा विचाराने स्त्रीचे काही कल्याण होईल असे आम्ही मानत नाही. शेवटी अशा घरात राहण्याने तिचा काय आदर असणार आहे. जेथे रात्रंदिवस तिला असे दाखविण्यात येते की तिचा पती तिच्याविरुद्ध असून ती केवळ पतीवर एक भार असून अधिक काहीच नाही. संधी मिळताच ती पतीला फसवू शकेल, अशा घरात राहण्याचा पत्नीला आग्रह करावयास हवा काय? खचितच कोणताही कायदा अशा प्रकारची चालरीत पसंत करु शकणार नाही. तसेच घृणा व तिरस्कार असलेल्या अशा घरात स्त्रीने तोंड शिवून घेऊन कुढत राहावे व सर्व

प्रकारचा अपमान सहन करीत राहावे हेही सहन करु शकत नाही? आपल्या मुलांना शिक्षण संस्कारासाठी तिने अशा घरात राहावयास हवे काय? ज्या घरात असा अन्यायरुपी काळोख पसरलेला आहे, तेथे ती मुलांच्या संगोपनाची जबाबदारी कशी पार पाडू शकेल?

## समस्या सोडविण्याचा एकमेव मार्ग

या सर्व समस्यांची सोडवणूक, सामुदायिक रितीने संपूर्ण समाजाच्या नैतिक, सांस्कृतिक, मानसशास्त्रीय व आधात्मिक शिक्षणामध्ये व संस्कारामध्येच सामावलेली आहे. त्याच्याकरिता एक दीर्घकाळ चालणाऱ्या मानसिक शुद्धीकरण मोहिमेतून जावे लागते तेव्हा कोठे सदाचार व चांगुलपणाला प्राधान्य मिळते व सामाजिक जीवनाला एक निकोप आधार सापडतो. अशा पवित्र व मंगल समाजात पतीच्या मनात वैवाहिक संबंध एक पवित्र संबंध आहे, अशी भावना निर्माण होऊ शकते व अशा पवित्र संबंधाला कोणत्याही तात्कालीन भावना क्षोभाच्या कृपादृष्टीवर सोडले जाऊ शकत नाही.

## जीवनाची नवी बांधणी

नैतिक व आधात्मिक विकासाची ही प्रक्रिया अतिदीर्घ असून ती मंदगतीने होत असते. इस्लामी कायद्याच्या प्रकाशात, राष्ट्राच्या सामाजिक जीवनाची नवीन धर्तीवर बांधणी केली जाणे, याकरिता आवश्यक आहे. तसेच घरांत, शाळांत, सिनेमांत, आकाशवाणीत, मुद्रणालयात, साहित्यात तसेच सर्व धार्मिक नेत्यांनी व सर्व जनतेने असे ध्येय साध्य करण्यासाठी एकजुटीने प्रयत्न केले पाहिजेत. निकोप सामाजिक क्रांती घडवून आणावयाची असेल, तर त्याचा अंगिकार केल्याविना दुसरा कोणताही मार्ग नाही, निकोप क्रांतीचा हाच एकमेव मार्ग आहे.

## कायद्याचा मूळ उद्देश

या उलट आम्हाला हे लक्षात ठेवले पाहिजे की वादी व प्रतिवादी अर्थात पती व पत्नीना पुरेपूर न्याय देणारी व अन्यायापासून त्यांचे रक्षण करणारी न्यायपद्धत स्थापन करण्याचाच कौटुंबिक कायद्याचा एक उद्देश आहे. घटस्फोट याच सामाजिक गरजेची पूर्तता करतो व पती पत्नी जर सुखासमाधानाने नांदू शकत नसतील तर एकमेकांपासून वेगळे होण्याची संधी मिळवून देतो. या संदर्भात इस्लामी धर्मशास्त्राचे हे महत्त्वाचे तत्त्वही आम्हाला लक्षात ठेवले पाहिजे की,

"सर्व सनदशीर बाबतीत अल्लाहाला तलाक ही सर्वात अप्रिय गोष्ट आहे." – हदीस

## एक तात्पुरता कायदा

बहुपत्नित्वाचा कायदा हा हंगामी स्वरुपाचा असून तो काही इस्लामचा मूलभूत सिद्धान्त नव्हे, ही गोष्ट आपण विसरता कामा नये. या संदर्भात कुरआन आदेश आहे,

"तर स्त्रीयांपैकी तुमच्या पसंतीच्या स्त्रीशी निकाह करा. दोघींशी, तिघींशी, चौघींशी करा. जर तुम्ही त्यांना समान न्याय करु शकणार नाही अशी तुम्हाला भीती वाटत असेल तर, एकीवरच पुरे करा." (कुरआन ४:३)

या आयतीत असा संदेश दिला गेला आहे, की एकापेक्षा जास्त विवाह केल्यास सर्व पत्नींना समान व न्यायपूर्ण वागणूक देणे हे पतीवर बंधनकारक आहे. एकाच पत्नीवर पुरे करायला हवे, असाही संकेत त्यात आहे. समजा सामान्य परिस्थितीत इस्लाम बहुपत्नित्वापेक्षा एकपत्नित्व न्यायाऐवजी अन्यायाचेच लक्ष्य होत असते. अशा प्रकारच्या असाधारण परिस्थितीकरिता इस्लामी कायदा बहुपत्नित्व विवाहाचा मार्ग मोकळा ठेवतो. कारण संपूर्ण न्याय प्राप्त होणे जरी शक्य नसेल तरी अशा अपवादात्मक परिस्थितीमध्ये एकपत्नित्वाचा आग्रह धरल्याने ज्या प्रकारचे दोष निर्माण होऊ शकतात, त्यापेक्षा कमी प्रकारचे दोष बहुपत्नित्व विवाहमुळे निर्माण होऊ शकतात.

## युद्ध

युद्धाचेच उदारण घ्या. यात पुरुषांची संख्या फार मोठ्या प्रमाणात नष्ट होते व त्यामुळे स्त्रीया व पुरुषांमधील प्रमाण अगदी बदलून जाते. अशा परिस्थितीत युद्धानंतर सामान्यपणे आढळून येणारी, लैंगिक स्वैराचार फैलावण्याची भीती असते. कारण पुरुषांची संख्या फार कमी झाल्याने स्त्रिया निराधार होतात. अशा लैंगिक स्वैराचाराच्या संकटापासून वाचण्यासाठी बहुपत्नीविवाह एक सामाजिक गरज होऊन बसते. अशा निराधार स्त्रियांच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था तर केली जाऊ शकते, परंतु त्याची नैसर्गिक कामेच्छा पुरी करणे कठीण होऊन जाते. अशा परिस्थितीत स्त्रिया पुरुषांच्या कामवासनेला बळी पडूनही जीवनातील वास्तविक भावनात्मक तृप्तीकरिता, तसेच ज्याच्याविना जीवनात कसलेही सौंदर्य व सुख मिळू शकत नाही, अशी संतती व संततीप्रेमासही त्यांना आयुष्यभर व्याकूळ होऊन तळमळत राहावे लागते. अशा परिस्थितीमध्ये असे घडण्याची भीती फार असते.

## फ्रान्सचे उदाहरण धडा शिकण्यासारखे

समाजातील सर्व नैतिक मूल्ये, धाब्यावर बसवून शक्य त्या सर्व नैतिक-अनैतिक मार्गांनी आपल्या कामवासनेची तृप्ती करीत फिरण्यासाठी अशा विधवांना अशा प्रकारच्या संकटकाळात निराधार सोडून देणे योग्य आहे काय? फ्रान्सला एकदा अशाच परिस्थितीला तोंड द्यावे लागले होते. परिणामत: तेथील सामाजिक व्यवस्थेला तीव्र हादरे बसले होते. सरतेशेवटी फ्रान्स आपली सर्व ऐतिहासिक श्रेष्ठता व प्रतिष्ठा गमावून बसला. अशा प्रकारच्या सामाजिक संकटापासून व अराजकतेपासून वाचण्यासाठी केवळ एकच असा मार्ग आहे, की पुरुषाला एकापेक्षा अधिक

स्त्रियांशी विवाह करु शकण्याची कायद्यामध्ये स्पष्ट व उघड शब्दांत परवानगी असावी. अट एवढीच असावी की त्यांनी सर्वांना न्यायपूर्ण वागणूक द्यावी. एखाद्या पत्नीशी पतीला जी भावनोत्कट ओढ असते तिचा या न्यायाच्या अटींत समावेश आहे. या बाबतीत समानता त्याच्या हातातील गोष्ट नसून, त्याची तशी इच्छा असली तरीही या बाबतीत संपूर्णपणे न्यायाच्या कसोटीला उतरु शकत नाही.

## इतर काही परिस्थिती

अशाच प्रकारच्या इतर काही अनन्यसाधारण विषम परिस्थितीतही बहुपत्नित्व एक सामाजिक गरज होऊ शकते. उदाहरण द्यायचे तर काही पुरुषांची कामशक्ती इतरांपेक्षा फार अधिक प्रमाणात असते. अशा लोकांचे समाधान एका पत्नीपासून होणे फारच कठीण असते. कारण इच्छा असूनही आपली वाढीव कामशक्ती ते दाबून ठेवू शकत नाहीत. अशा लोकांनाही कायद्याने दुसरा विवाह करण्याची परवानगी असायला पाहिजे. नाहीतर ते घराबाहेर पडून व आपल्या 'गर्ल फ्रेन्ड'कडे जाऊन आपली कामतृष्णा शमविण्याचा शोध घेतील व समाजाला असा एक महारोग लाऊन टाकतील की जे घडण्याची परवानगी कोणताही निकोप समाज देऊ शकणार नाही.

## पत्नीचे वांझोटेपण

या शिवाय इतर काही अशा परिस्थिती आढळू शकतात ज्यांची सोडवणूक केवळ बहुपत्नित्वानेच होऊ शकते. जसे, पत्नी वांझोटी असणे, अगर तिला असा एखादा कायमचा रोग किंवा आजार असणे, ज्यामुळे ती समागमायोग्य उरतच नाही. पहिल्या प्रकारात म्हणजे पत्नी वांझोटी असल्यास यात निस्संशय तिचा काही अपराध नसतो की ज्यासाठी तिला नावे ठेवली जावीत. परंतु प्रश्न असा आहे की त्या कारणासाठी पतीने संततीपासून आयुष्यभर का वंचित राहावे? जेव्हा संततीची इच्छा माणसाला उपजत व नैसर्गिकरित्याच असते अशा अवस्थेत दुसरा विवाह करणे हाच एकमेव उपाय आहे. प्रथम पत्नीची इच्छा असल्यास तिने पती व द्वितीय पत्निबरोबर राहावे, नाही तर तिची इच्छा असल्यास घटस्फोट घेऊन वेगळे व्हावे. उरली रोगग्रस्त पत्निची बाब. तिच्या बाबतीत विचार करताना संभोगेच्छा ही हलक्या प्रकारच्या वासनेपासून निर्माण होत असून केवळ असली वासना भागविण्यासाठी पतीने आपल्या निरागस पत्नीचे सुख व समाधान पायदळी तुडवायला नको आहे, असे म्हणणे बरोबर नाही. कामेच्छा उच्च प्रतिची भावना आहे की हलक्या दर्जाची वासना आहे हा प्रश्न येथे नाही. उलट खरा प्रश्न आहे तो माणसाच्या व्यवहारी गरजेचा, जिच्याकडे डोळेझाक केली जाऊ शकत नाही. या बाबतीत आपल्या पत्नीच्या प्रेमाखातर पतीने स्वेच्छेने त्याग करुन विषयसुखापासून दूर राहण्याचे ठरविले तर त्याची ही भावना

अतिउदात्तपणाची व औदार्याची ठरेल आणि त्याची प्रशंसा व कौतुक होईल, परंतु अल्लाह कोणाही माणसावर त्याच्या सहनशक्तीपेक्षा अधिक भार घालीत नाही. कारण सत्याला तोंड देणे हीच वास्तविक पद्धत आहे व त्या देखाव्याच्या संस्कृतीपेक्षा अधिक प्रशंसनीय आहे. ज्याच्या पडद्याआड सर्व प्रकारची दुष्कृत्ये अशा लोकांमध्ये आढळून येतात, ज्यांच्यात बहुपत्नित्वाला मनाई आहे.

या संदर्भात पती ज्या परिस्थितीत असहाय्य होऊन पत्नीला प्रेमही देऊ शकत नाही, तसेच घटस्फोट देऊन तिला मुक्तही करु शकत नाही, अशा परिस्थितीही दृष्टीसमोर असावयास हवी. अशा सर्व परिस्थितीची सोडवणूक करण्यासाठी बहुपत्नित्वच एकमेव उपाय आहे.

## समस्येचे इतर काही पैलू

स्त्रीसमस्येच्या इतर काही शंकापस्पद बाबींचाही आढावा घेत पुढे जावे अशी आमची इच्छा आहे.

## घराबाहेर येण्या-जाण्याचा हक्क

प्रथम मेहनत-मजुरी अर्थात नोकरीसाठी घराबाहेर येण्या-जाण्याचा प्रश्न आहे. इस्लाम स्त्रीला नोकरीची व त्याकरिता घराबाहेर येण्या-जाण्याची पूर्ण परवानगी देतो. इस्लामच्या आरंभीच्या काळात, एक ही वास्तविक गरज नसताना मुस्लिम स्त्रिया घराबाहेर कामे करीत असत. त्याचप्रमाणे स्त्री शिक्षण संस्था, नर्सिंग व स्त्रीरोग चिकित्सा केंद्रासारख्या सामाजिक प्रतिष्ठानात कामे करण्यास इस्लाम स्त्रियांना रोखत नाही. उलट एखाद्या वेगळ्या परिस्थितीत आवश्यकता वाटल्यास ज्याप्रमाणे पुरुषांची सेवा सरकार आपल्या ताब्यात घेते, त्याच तऱ्हेने एखादी स्त्री जर अगदी निराधार असेल व तिच्या पोटापाण्याची व्यवस्था पाहणारा कोणी पुरुष जिवंत नसेल, तर ती आपल्या उदरनिर्वाहासाठीही घराबाहेर पडू शकते. परंतु जेव्हा एखादी वास्तविक विवशता अगर निकडीची गरज येऊन पडते व जी भागविण्यासाठी दुसरा कोणताही इलाज नसतो, केवळ अशाच परिस्थितीत इस्लाम स्त्रीला घर सोडण्याची अनुमती देतो ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे.

सर्वसाधारण परिस्थितीत कोणतीही विशेष विवशता अगर निकड नसताना पाश्चिमात्य व कम्युनिस्ट देशात दिसून येते तसे स्त्रीने अनावश्यकपणे घराबाहेर पडणे इस्लामला पसंत नाही. इस्लामच्या दृष्टीने असे करणे अज्ञानीपणाच आहे. कारण सामाजिक कार्यक्रमात सहभागी होण्यासाठी जेव्हा स्त्री आपले घर सोडते तेव्हा घरामध्ये राहून जी खरी मूलगामी कर्तव्ये ती चांगल्या रीतीने पार पाडू शकते; त्यावर अनिष्ट परिणाम झाल्याशिवाय राहत नाही. एवढेच नसून ती जेव्हा अनावश्यक घराबाहेर पडते तेव्हा समाजात अनेक मानसशास्त्रीय, सामाजिक, नैतिक समस्याही निर्माण करुन ठेवते.

## तोट्याचा व्यवहार

स्त्री ही शारीरिक, मानसिक, तसेच भावनात्मक दृष्टीने आपला जीवनउद्देश अर्थात माता होण्यासाठी सर्वोत्तम गुणांनी परिपूर्ण आहे. ही गोष्ट एक असे सत्य आहे जे नाकारता येणे शक्य नाही. तिचे लक्ष जर इतर अनावश्यक उत्साहाकडे आकृष्ट होऊन ती आपल्या खऱ्या कर्तव्यापासून दूर गेली तर संपूर्ण मानवजातीचे त्यात नुकसान आहे, ही गोष्ट स्पष्ट आहे. ती मातेच्या स्थानाप्रत पोचण्याऐवजी पुरुषाच्या हातातील खेळणे, मनोरंजनाचे साधन होऊन बसेल. इस्लामचा विशिष्ट गुणधर्म असा आहे की तो मानवतेला एक असा घटक मानतो जो कालानुसार परिवर्तन पावत नाही, म्हणून अशी अवस्था इस्लाम कदापि सहन करु शकत नाही.

## एक बिनबुडाचा विचार

असेही बोलले जाते, की मुलांना देखरेखीसाठी दाईकडे सोपवून एखाद्या स्त्रीने घराबाहेर पडून नोकरी केली तर त्यात हरकत काय आहे? अशा तऱ्हेने ती पैसा मिळवू शकते एवढेच नाही, तर मातेच्या रुपानेही आपले कर्तव्य चांगल्यारीतीने पार पाडू शकते. पण हा विचार बिनबुडाचा व मूर्खपणाचा आहे. कारण एखादी दाई कितीही चांगली असली व मुलांच्या शारीरिक, मानसिक तसेच मनोवैज्ञानिक विकासात ती खूप लक्ष घालत असली, तरी एका बाबतीत ती विवश असते. ती माता बनू शकत नाही व ज्याविना मानवी जीवनरुपी बाग ओसाड होऊन, मानवनीती कोमजून जाते व मातेचे प्रेम व ममता मुलांना देऊ शकत नाही.

पाश्चात्य संस्कृतीच्या पुत्रांचा तसेच कम्युनिस्ट पद्धतीच्या ध्वजवाहकांच्या निरर्थक आरडाओरडा मानवाचा स्वभावधर्म बदलू शकत नाही. आयुष्यातील पहिल्या दोन वर्षांत बालकात प्रत्येक क्षणी मातेच्या सर्व प्रेमाची व मायेची इतकी महत्त्वाची गरज असते की त्यात इतर कोणाचाही, भावंडाचाही वाटा ते सहन करु शकत नाही. एखादी दाई अगर नर्स बालकाला मातेचे असे प्रेम व माया कशी देऊ शकते? सामान्यपणे एकेका दाईला दहा-दहा, वीस-वीस मुलांची देखरेख करावी लागते. अशा भाडोत्री मातेच्या देखरेखीखाली वाढणारी मुले कधी इतरांची खेळणी हस्तगत करण्यासाठी तर कधी या कृत्रिम मातेचे लक्ष आपल्याकडे वेधून घेण्यासाठी एकमेकांशी भांडू लागतात. अशा रितीने हळूहळू भांडणे झगडणे यांची सवय लागून त्यांच्या स्वभावाचे एक अंग बनते. ते जेव्हा मोठे होतात, तेव्हा त्यांची मने प्रेमाच्या उबदारापासून व चांगल्या भावनाहून रिकामी असतात.

## मुस्लिम पत्नींना, पित्यांना व बंधुंना एक प्रश्न

खरोखरच जर गरज असेल तर मुलांच्या देखरेखीसाठी दाई ठेवली जाऊ शकते, परंतु तशी गरज नसताना तसे करणे शहाणपणाचे नाही. पश्चिमेतील लोक आपल्या एखाद्या ऐतिहासिक,

भौगोलिक, राजकीय, अगर आर्थिक स्थितीच्या कारणाने असे करण्यास स्वत:च विवश असतील. परंतु पूर्वेकडील मुस्लिमांना असे करण्याचे काहीच कारण नाही. आमच्यातील पुरुषांची संख्या खरोखरीने इतकी कमी झाली आहे काय की घराबाहेरील जगातील कामे करण्यासाठी आता आम्हाला स्त्रियांचे सहाय्य घेण्याची आवश्यकता वाटावी? किंवा मुस्लिम पतीच्या, पित्यांच्या, बंधुच्या व आप्तेष्टांच्या मनातील सारी लाज व अब्रू नष्ट झाली आहे काय व आपल्या पत्नी व भगिनींचाही त्यांना भार वाटू लागला आहे काय? म्हणून त्या बिचाऱ्या स्वत:चा भार स्वत: वाहण्यासाठी व कार्यालयात तसेच कारखान्यात जाऊन नोकरी शोधण्यासाठी विवश झाल्या आहेत काय?

## इस्लामी जगताची गरिबी

नोकरी केल्याने स्त्रीला आर्थिक स्वातंत्र प्राप्त होऊन समाजात तिचा मान वाढतो, असेही म्हटले जाते. परंतु प्रश्न असा आहे, की इस्लामने स्त्रीच्या स्वतंत्र आर्थिक स्थितीचा इन्कार कधी केला आहे? सध्याच्या काळात इस्लामी जगताला ज्या समस्यांना तोंड द्यावे लागत आहे, तो आमच्या जीवनपद्धतीतील कमतरतेचा परिणाम नसून, ते सर्व त्या व्यापक हलाखीचे व उपासमारीचेच अपत्य आहे, ज्यांच्यामुळे जगातील स्त्री-पुरुषांच्या जीवनातील सर्व पवित्र व मंगल सुखसोयीचा अभाव निर्माण झाला आहे. भौतिक साधनात वाढ व्हावी सर्व राष्ट्र सुखी व्हावे, कोणीही गरीब व गरजवंत राहू नये, हाच सुटकेचा मार्ग आहे. उत्पन्नाच्या साधनांच्या मालकीकरिता स्त्री-पुरुषांत जी चुरस व चढाओढ लागली आहे ती या समस्येची सोडवणूक करण्याचा मार्ग कदापिही नाही.

## नोकरी केल्याने आणखी एक हानी

स्त्रियांनी नोकरी करण्याच्या समर्थनार्थ एक अनुमान असेही केले जाते की अशा प्रकारे ती कुटुंबातील आवक व मिळकत वाढविण्यास कारणीभूत होऊ शकते. कारण दोन व्यक्तींची कमाई, कुटुंबातील एक व्यक्तीच्या कमाईपेक्षा अधिक असते हे उघड आहे. ही गोष्ट काही कुटुंबाच्या बाबतीत खरी असू शकते, परंतु जर एकूण एक स्त्रिया नोकरी करायला लागल्या तर गृहजीवन उद्‌ध्वस्त होऊन जाईल. पती-पत्नी दीर्घकाळपर्यंत एकमेकांपासून दूर राहतील व त्यामुळे समाजात नैतिक, सामाजिक नैतिक विवशता अस्तित्वात येते. स्त्रीने घराबाहेर पडून त्याकरिता एवढी जबर किंमत देणे भागच आहे काय ?

## उच्चपद

इस्लामने संपूर्ण विश्वासाने व दृढनिश्चयाने स्त्रीचे स्वाभाविक कर्तव्य मानववंशाची वाढ करणे व त्यांचे पालनपोषण करणे असल्याचे निश्चित करताना; समोर मानवस्वभाव व समाज या दोहोंला ठेवले होते. सर्व अनावश्यक कटकटीपासून स्त्री मुक्त राहू शकेल म्हणूनच इस्लामने स्त्रीच्या सर्व आर्थिक गरजांचा सगळा भार पुरुषांवर टाकला. परंतु त्याचबरोबर त्याने स्त्रीचे व आईचे स्थान इतके उंचावून ठेवले, की जेंव्हा एका व्यक्तीने इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांना विचारले,

"माझ्या सद्वर्तनावर सर्वांत अधिक हक्कदार कोण आहे?' तर प्रेषित मुहम्मद (स) यांनी सांगितले, 'तुझी आई !' त्या व्यक्तीने विचारले, 'नंतर कोण?' प्रेषितांनी उत्तर दिले 'तुझी आई !' त्या व्यक्तीने पुन्हा विचारले, 'त्यानंतर कोण?' प्रेषितांनी सांगितले, 'तुझी आई!' त्यानंतर त्याने पुन्हा विचारले, 'नंतर कोण?' प्रेषितांनी उत्तर दिले 'नंतर तुझा बाप !'

(बुखारी, मुस्लिम)

## इस्लाम व आधुनिक स्त्रीस्वातंत्र आंदोलन

इस्लामने स्त्रीला जे आदराचे व उच्चस्थान दिले आहे ते पहिल्यावर, आधुनिक मुस्लिम स्त्रियांच्या नावाने जो एकंदर कल्लोळ चालला आहे त्याचे तात्पर्य काय आहे, हे कळत नाही ? असा कोणता अधिकार शिल्लक राहिला आहे जो इस्लामने स्त्रियांना दिला नाही व त्या कारणास्तव त्या आपले अधिकार मिळविण्यासाठी आंदोलन उभारण्यास व मताधिकार तसेच संसदीय राजकारणासारख्या मार्गांचा अवलंब करणे त्यांना भागच आहे? या मागण्यावरही एक नजर टाकू या.

## मानव समानता

वर्तमान मुस्लिम स्त्रियांची मागणी आहे की त्यांना समान मानवी दर्जा मिळावा. इस्लामने हा अधिकार आजपासून फार पूर्वीच देऊन टाकला आहे, हे कदाचित तिला माहीत नाही. हा अधिकार केवळ तात्त्विक रुपानेच नव्हे तर व्यावहारिक स्वरुपात तसेच कायद्याच्या स्वरुपातही दिलेला आहे.

स्त्रीला आर्थिक स्वातंत्र्य हवे आहे व सामाजिक जीवनात प्रत्यक्ष सहभागाचीही मागणी करीत आहे. खरेतर इस्लामच जगातील पहिला धर्म आहे ज्याने स्त्रीला हे सर्व अधिकार पूर्णपणे देऊन टाकले आहेत.

## शिक्षणाचा हक्क

तिला स्वत:चे शिक्षण प्राप्त करण्याचा हक्क हवा आहे. इस्लाम केवळ तिचा हा हक्क मानतो एवढेच नसून, ते प्राप्त करणे तिला अनिवार्य असल्याचे ठरविते.

## स्वेच्छेने विवाह करण्याचा हक्क

आपल्या संमती व इच्छेविना तिचा विवाह केला जाऊ नये, या हक्काचीही मागणी आपल्याकरिता करते काय? इस्लाम तिचा हा हक्क स्वीकार करतो, एवढेच नसून स्वत:चा विवाह स्वत:च ठरविण्याचा हक्कही तिला देतो.

## न्याय, प्रेम व कायद्याचे संरक्षण

आपल्या घरामध्येच राहून, आपल्या कर्तव्याचे पालन करण्याची तिची इच्छा आहे काय व तिच्याशी न्यायपूर्ण व प्रेमळपणाचे वर्तन केले जावे अशी तिची इच्छा आहे काय? आणि पती जर तिच्याशी दुर्वर्तन व अन्याय करण्याचा दोषी ठरला तर तिला त्याच्यापासून वेगळे होण्याचा हक्क प्राप्त व्हावा, इस्लाम स्त्रीला हे सर्व हक्क देतो व या हक्काचे रक्षण करण्याचे काम हे पुरुषांचे अनिवार्य कर्तव्य असल्याचे सांगतो.

## नोकरी करण्याचा हक्क

तिला घराबाहेर पडून नोकरी व्यवसाय करण्याचा हक्क हवा आहे काय? इस्लाम तिचा हा हक्कही मानतो.

## जादा हक्क

जर तिला अनैतिक प्रदर्शन करण्याचे स्वातंत्र हवे असेल किंवा तिच्या मानवताविरोधी कृत्यांना प्रतिबंध नसावा अशी इच्छा असेल तर तिला असे स्वातंत्र व मोकळीक इस्लाममध्ये मिळू शकत नाही, हे उघड आहे. कारण इस्लाम अशा गोष्टी मानवाच्या प्रतिष्ठेविरुद्ध व सन्मानाविरुद्ध असल्याचे मानतो व कोणाही स्त्रीने अगर पुरुषाने त्यात पडून मानवतेवर कलंक लावावा हे इस्लाम सहन करु शकत नाही. परंतु आजच्या स्त्रीला हेच हवे असेल तर त्याकरिता संसदीय राजकारणाचा आधार घेण्याचीही काही आवश्यकता नाही. त्याकरिता फक्त धीर धरुन समाजातील एकमेकांसंबंधी प्रेम व ऐक्याचे आदर्श संपूर्णपणे नष्ट होण्याच्या समयाची वाट पाहावयास हवी. त्यानंतर तिच्या सर्व मागण्या तिला आपोआपच मिळतील व तिला कोणत्याही नैतिक प्रतिबंधाशिवाय भरपूर रंगढंग करता येतील.

पूर्वेकडील राष्ट्रांची स्थिती व त्यांच्या जीवनातील आदर्श पश्चिमेतील राष्ट्रांच्या स्थितीपेक्षा व तेथील जीवनआदर्शापेक्षा अगदी भिन्न आहेत, हे कबूल करुनही काही लोक असे म्हणतात की माणसांना त्याचा विरोध प्रकट करणे भाग पडते. दुसरीकडे पाश्चिमात्य स्त्रियांना स्वातंत्र्य तसेच सामाजिक प्रतिष्ठा व सन्मानही प्राप्त आहे. म्हणून पूर्वेकडील स्त्रियांनी पाश्चिमात्य स्त्रियांचे अनुकरण करुन आपले गमविलेले हक्क परत मिळविण्यासाठी प्रयत्न का करु नयेत?

## मुस्लिम स्त्रियांची सध्याची स्थिती

वर्तमानकाळातील मुस्लिम देशांतील स्त्रिया सामान्यत: मागासलेल्या आहेत हे आम्हाला मान्य आहे. त्यांना सामाजिक आदर व सन्मान प्राप्त नाही व त्या सध्या अगदी पशूप्रमाणे जीवन कंठीत आहेत. हे सर्व खरे असले तरी या सर्व अवस्थांची जबाबदारी कोणावर पडते, हा प्रश्न आहे. इस्लामला किंवा त्याच्या शिकवणीला कोणत्याही प्रकारे यासाठी जबाबदार धरता येईल काय? ज्या आर्थिक, सामाजिक, राजकीय व मानसशास्त्रीय अवस्थांना आजच्या पौर्वात्य देशांना तोंड द्यावे लागत आहे, त्याच्या परिणामस्वरुप आजच्या पौर्वात्य स्त्रीची अशी दयनीय अवस्था झाली आहे, हेच सत्य आहे. आमचे सामाजिक जीवन सुधारण्याची जर आपली इच्छा असेल तर आम्हाला या परिस्थितीचा विचार करावा लागेल व त्यातील दोषांचे उगमस्थान जाणून घ्यावे लागेल.

## संकटाचे मूळ

पूर्वेतील गेल्या कित्येक पिढ्या ज्यात गुरफटलेल्या आहेत ते दारिद्र्य व उपासमार, हे पूर्वेतील स्त्रियांच्या संकटाचे मूळ आहे. काही लोक विलासात व ऐषआरामात राहात असताना बहुसंख्य लोकांना शरीर झाकण्यापुरते वस्त्र व पोट भरण्याइतके अन्न मिळत नाही. हे वैषम्य व सामाजिक अन्यायसुद्धा त्याचे एक कारण आहे. राजा व प्रजा अशा दोन वर्गांत जनतेची कायमची विभागणी करुन, लोकांवर अत्याचार करून त्यांना गुदमरुन टाकणाऱ्या राजकारणाचाच हा परिणाम आहे. शासकवर्गातील लोक आपल्या सुखसोईकरिता सर्व गोष्टी ठरवून घेतात. परंतु सर्वच्या सर्व कर्तव्ये मात्र जनतेवर टाकून मोकळे होतात. ते स्वत: कोणतीही जबाबदारी घेत नाहीत तसेच जनतेला कोणतेही हक्क देत नाहीत. सध्या पूर्वेच्या सामाजिक जीवनावर अन्याय व अत्याचाराचे जे काळे ढग पसरलेले आहेत, ते याच सामाजिक परिस्थितिची उत्पत्ती आहे. पूर्वेतील स्त्रीच्या दयनीय अवस्थेलाही हीच सामाजिक परिस्थिती जबाबदार आहे.

## दारिद्र्याचे वातावरण

आजची स्त्री पुरुषाबरोबर प्रेमाचे तसेच आदराचे संबंध दृढ करु इच्छिते, परंतू पूर्वेतील आधुनिक गुदमरलेल्या व दारिद्र्याच्या वातावरणात तिला हे प्रेम व सन्मान कसे मिळू शकतात? कारण या वातावरणाने व परिस्थितीने केवळ स्त्रीला अत्याचारांची बळी केली नसून, खुद्द पुरुषही आहेत. त्यांची अवस्था प्रत्यक्षात काहीशी बरी दिसत असूनही ते ह्यामुळे गांजलेले व पिडलेले आहेत.

## सामाजिक अन्यायाची प्रतिक्रिया

सभोवतालचे लोक पुरुषावर ज्या प्रकारचे अन्याय व अत्याचार तसेच कठोरपणाची वागणूक देत असतात, त्याचीच प्रतिक्रिया म्हणून पुरुष घरात स्त्रीशी दुर्वर्तन करुन तिच्यावर अन्याय व अत्याचार करत असतो. समाजात त्याला अपमानित व्हावे लागते. कधी गावातील मुख्य सरपंचाकडून त्यांचा स्वाभिमान दुखावला जातो, तर कधी पोलिस अगर कारखानदाराकडून त्याचा स्वाभिमान ठेचला जातो, तर कधी खुद्द शासनकर्तेच त्याचा स्वाभिमान दुखावण्यास कारणीभूत होतात. समाजात सर्वत्र त्याला अपमान व निराशा यांना तोंड द्यावे लागते. परंतु तो कोणावरही उट्टे काढू शकत नाही अगर सूड घेऊ शकत नाही. म्हणून घरी आल्यावर तो आपला सर्व राग बायकोवर, मुलांवर व अन्य साथीदारावर काढतो. हाच दारिद्र्याचा शाप आहे जो पुरुषाला अशा प्रकारे पिळवटून काढतो. त्यामुळे तो आपल्या संबंधीतांशी प्रेमळपणाने व सहानुभूतिपूर्वंक वर्तणूक करण्यायोग्य उरत नाही. पत्नीला पतीकडून अत्याचार व दुर्वर्तन सहन करावे लागते, त्याचे हेच कारण आहे. असे असूनही ती प्रतिकार करीत नाही. कारण जर तिच्या पतीने तिला घराबाहेर काढले तर उपाशी मरावे लागेल. पती रागावून तिला घटस्फोट देईल या भीतिने ती आपल्या कायदेशीर अधिकाराची मागणी करण्याचे साहसही करू शकत नाही. तिचे आईवडील इतके गरीब असतात की ते तिचा भार उचलू शकत नाहीत. पतीचे घर सोडून ती त्यांच्याकडे गेली तर ते तिला पतीकडे परत जाण्याचा व सर्व प्रकारचा अत्याचार सहनशीलतेने व धैर्याने सहन करून घेण्याचाच उपदेश करतात. पूर्वेतील स्त्रियांच्या अवमानाचे हे एक मोठे कारण आहे.

आपल्या मागासलेपणामुळे आजच्या पूर्वेला कसल्याही उच्च ध्येयाचा व स्वावलंबीपणाचा अभाव आहे, हे दुसरे कारण आहे. पूर्व उच्च मानवी आदर्शाची ओळखसुद्धा विसरला आहे. आता केवळ एकच आदर्श तो मानतो ते म्हणजे बल व शक्ती, बलवानांची भक्ती, दुर्बलांचा तिरस्कार व अपमान. म्हणून एखाद्याने दुर्बल असणे त्याला अपमानित करण्यास पुरेसे आहे.

## बलाची उपासना

या बलोपासनेमुळेच पुरुष स्त्रीला तुच्छ मानतो. आपल्यापेक्षा शरीराने दुर्बल असलेल्या स्त्रीचा आदर करण्यासाठी जी नैतिक श्रेष्ठता आवश्यक असते तिचा पुरुषांत अभाव आहे. त्याचे मन स्त्रीविषयी आदराने रिकामे आहे व माणुसकीची जी हाक आहे तसा आदर-सन्मान तो स्त्रीला देऊ शकत नाही, त्याचे हेच कारण आहे. परंतु एखादी स्त्री जर धन व संपत्तीची मालकीण असेल तर वर्तमान पूर्वेतील भौतिकवादी वातावरणात तिला सर्व प्रकारचा आदर व मान-सन्मान प्राप्त होऊ शकतो.

## मागासलेला समाज

वर्तमान पूर्वेसारख्या, अशा प्रकारच्या कोणत्याही मागासलेल्या समाजात मानवाचे अध:पतन व अधोगती होते आणि त्याची अवस्था पशूसारखी अगर त्याच्या जवळपास असल्यासारखी होते. अशा प्रकारचा समाज कामपिपासू असतो व जीवनातील त्याच्या सर्व विचारांमध्ये व व्यवहारामध्ये काम विषय प्रकट होत असतो. म्हणून अशा समाजात स्त्री ही पुरुषाची कामवासना तृप्त करण्याचे केवळ एक साधन बनते[१]. तिला मानवीरुपाने कसलाही आदर प्राप्त नसतो. कारण मानसशास्त्रीय, बौद्धिक व आध्यात्मिक दृष्टीने तिला पुरुषापेक्षा इतकी हीन समजले जाते की तिला कोणाच्याही आदरास प्राप्त असल्याचे मानले जात नाही. तसेच ती तशा प्रकारची मागणीही करु शकत नाही. याचा परिणाम असा होतो की, स्त्री व पुरुषांचा लैंगिक संबंध केवळ असा पशुवत बनतो की त्यात नराची नेहमी मादीवर सरशी असते. कामवासना भागल्यावर तो आपल्या स्त्रीकडे संपूर्ण दुर्लक्ष करतो.

## उपासमार व अज्ञान

मागासलेला समाज नेहमी अज्ञानाला व उपासमारीला बळी पडतो म्हणून त्याच्याजवळ नैतिक तसेच शिस्तीच्या दृष्टीने प्रगती करुन घेण्याइतकी ताकदही नसते व वेळही नसतो. खरे तर या गुणाखेरीज कोणत्याही समाजाला उच्च मानव समाजाचा गौरव प्राप्त होऊ शकत नाही. तो आपल्या पशुवत अवस्थेहून वर येऊ शकत नाही. समाजात अशा प्रकारच्या नैतिक व आध्यात्मिक शिस्तीचा अभाव असणे अगर ती अयोग्य स्वरुपात असणे याचा परिणाम असा होत असतो की माणसाचे जीवन हे केवळ आर्थिक जीवन बनते. सत्ता व अधिकार यांची भक्ती होऊ लागते व जीवनाचे मोजमाप केवळ पाशवी इच्छा वासनाच्या मापाने केले जाते.

## मातेचे अयोग्य वर्तन

अशा प्रकारच्या मागासलेल्या समाजात, आईच्या भूमिकेतून स्त्री एक अयोग्य वर्तन करीत असते. अजाणतेपणानेच स्त्रीवर्गाविषयी पुरुषाचा दृष्टिकोन बिघडण्यास कारणीभूत होता. ती आपल्या छोट्या मुलालाही एक छोटा शासनकर्ता बनवून ठेवते व तो केवळ हुकूम सोडणे व त्याचे पालन करून घेणे एवढेच जाणतो. तिचे प्रेम इतके आंधळे असते की आपल्या मुलांच्या अयोग्य मागण्यांवर व इच्छांवर ती कसलाही प्रतिबंध करु शकत नाही. उलट त्यांची प्रत्येक अयोग्य इच्छा पुरी करण्याचाच प्रयत्न करते. या फाजील लाडाचा परिणाम असा होतो की असे

---

१. त्याचप्रमाणे स्त्री सुद्धा पुरुषाला कामवासनेची तृप्ती करण्याचे एक साधनच समजते. पुरुष केवळ कुटूंब प्रमुख असतो व कमाई करत असतो, म्हणून कामवासना भागवून स्त्रीपेक्षा अधिक प्रमाणात आपला वाटा वसूल करून घेतो.

मूल जेव्हा मोठे होते तेव्हा ते आपल्या पाशवी इच्छांच्या अधीन जाते. इतरांनी निमूटपणे त्याच्या आज्ञांचे पालन करावे अशी त्याची इच्छा असते. परंतु वास्तविक जीवनात जेव्हा त्याची ही इच्छा पुरी होत नाही तेव्हा तो खवळून उठतो. आपल्या क्षोभाचे उट्टे तो सभोवतालच्या पुरुषावर, स्त्रियांवर व मुलांवर काढतो. आजचे सारे पौर्वात्य त्यात गुरफटलेली व त्रस्त झालेली आहेत. ह्या सर्व असंतोषाची ठळक व महत्त्वाची कारणे ही अशी आहेत. पूर्वेतील स्त्रीच्या सध्याच्या अनादराचे व संकटाचे रहस्यही याच कारणांत दडलेले आहे. परंतु ही सर्व कारणे इस्लामने निर्माण केलेली नसून, खऱ्या इस्लामी आत्म्याशी त्याचे कसलेही साम्य नाही.

## इस्लाम व पूर्वेतील सध्याचे दारिद्रय

पूर्वेतील सध्याचे दारिद्रय व उपासमार इस्लामच्या परिणामस्वरुप आहे काय? खचितच नाही. कारण इस्लामने आपल्या आदर्श काळात म्हणजे माननीय उमर बिन अब्दुल अजीज (र) यांच्या काळात समाजाला इतक्या सुस्थितीत नेऊन सोडले होते, की लोकांमध्ये शोधूनही दान घेणारा आढळत नव्हता. प्रत्यक्ष व्यवहारी जगात सर्वांत महान आर्थिक चमत्कार करुन दाखविलेली इस्लाम एक आदर्श जीवनपद्धती आहे. हाच इस्लाम व हीच जीवनपद्धती आम्ही वर्तमान जगात स्थापित करू इच्छितो. इस्लामची अशी इच्छा आहे की जीवनपद्धतीच्या रुपाने राष्ट्रातील संपत्तीचे, सर्व लोकांमध्ये न्यायोचित रितीने वाटप व्हावे.

"जेणेकरुन धन तुमच्या धनवानातच फिरत राहू नये." (अलहश्र ७)

इस्लाम उपासमारीला चांगल्या दृष्टीने पाहत नाही व ती उचितही मानीत नाही. उलट जगातून त्याचे नष्टचर्य संपावे अशीच त्याची इच्छा आहे. त्याचप्रमाणे तो कोणालाही विलासाची व कामुकतेची ही अनुमती देत नाही.

आधुनिक पूर्वेतील स्त्रीच्या संकटाचे सर्वांत प्रमुख कारण उपासमार आहे. जर तिचे उच्चाटन झाले, तर स्त्रीच्या सर्व समस्या आपोआपच सुटतील. त्याचबरोबर तिला गमावलेला आदर व प्रतिष्ठाही प्राप्त होईल आणि त्याकरिता तिला घराबाहेर पडून नोकरी शोधत हिंडण्याची वेळही येणार नाही. (नोकरी करण्याचा अधिकार तिला त्या वेळेही प्राप्त असेल) कारण राष्ट्रातील वाढलेल्या संपत्तीत व सुखसोयीत, वारसा कायद्यानुसार तिला उचित वाटा मिळू शकेल व तिच्या इच्छेनुसार ही स्वत:च्या वैयक्तिक सुखासाठी खर्च करु शकेल. अशा रीतीने जेव्हा स्त्री भौतिकदृष्ट्या समृद्ध होईल तेव्हा पुरुष तिचा आदर करु लागेल. ती उपासमारीच्या भयापासून पूर्णपणे मुक्त होऊन निर्भयपणाने व धीटपणाने आपले सर्व अधिकार बजावू शकेल.

## राजकीय अन्याय व इस्लाम

सध्या पूर्वेत जो राजकीय अन्याय आढळतो व ज्याची प्रतिक्रिया घरात पुरुषाने पत्नीवर व मुलांवर आपला राग काढण्यात होते, ती इस्लामची निपज आहे काय?

या राजकीय अन्यायाबाबत इस्लामला जबाबदार ठरविले जाऊ शकत नाही कारण तो अन्याय व अत्याचारासमोर मान तुकविण्याची शिकवण देत नसून ताठ मानेने त्याला सामोरे जाण्याची शिकवण देतो. तसेच शासक व शासितांचे परस्पर संबंध न्यायाच्या अधिष्ठानावर स्थापन करतो, एकदा द्वीतीय खलीफा माननीय उमर (र) यांनी सांगितले,

''ऐकून घ्या व आज्ञेचे पालन करा.' तर एका माणसाने डोके वर करुन उत्तर दिले, 'आपण पांघरलेली चादर आपण कोठून मिळविली हे जोपर्यंत आपण सांगत नाही, तोपर्यत आम्ही ऐकूनही घेणार नाही व आज्ञेचे पालनही करणार नाही.' हे उत्तर ऐकून माननीय उमर (र) रागाने लाल झाले नाहीत, उलट त्यांनी त्या व्यक्तीच्या साहसाचे कौतुक व तारीफ केली आणि सर्वांसमोर सत्याचा उल्लेख करुन सांगून टाकले. त्यावर त्या व्यक्तीने पुन्हा उभे राहून म्हटले, आता आपली आज्ञा व्हावी, पालन करण्यास आम्ही हजर आहोत.''

कोणत्याही शासकाने आपल्या राष्ट्रातील लोकांना अत्याचाराचे लक्ष्य बनवू नये व जनतेत इतके साहस असावे की त्यांनी निर्भीडपणे आपल्या शासकाच्या तोंडावर आपल्या मनातील गोष्ट बोलून दाखवावी. घरामध्ये आपल्या कुटुंबीयांशी त्यांचे संबंध न्याय, प्रेम व बंधुत्वाच्या पायावर दृढ व्हावेत, अशा प्रकारची शासनपद्धत आम्ही पुन्हा एकदा स्थापन करु इच्छितो.

## उच्च मानवी आदर्श व इस्लाम

उच्च मानवी आदर्शाच्या अध:पतनास इस्लाम कारणीभूत आहे काय? याचे उत्तरही नकारात्मकच आहे. इस्लाम उच्च मानवी आदर्शाच्या पतनास कदापिही कारणीभूत नाही, तो तर माणसांना उच्च आदर्शाशी परिचित करुन त्यांना सज्जन बनवितो. त्यानेच पहिल्यांदा मानवाला हे शिकविले की, धन, शक्ती, सत्ता, अधिकार, मानसन्मान व प्रतिष्ठा मोजण्यासाठी सोटा अगर बडगा हे माप नसून पापभीरुता व सद्वर्तन हे त्याचे खरे प्रमाण आहे.

''निस्संशय अल्लाहजवळ तुम्हापैकी सर्वाधिक मान त्याला असेल, जो तुम्हा सर्वांत जास्त पापभीरु आहे.' (कुकर्मापासून दूर असणारा व सत्कृत्ये करणारा)'' (कुरआन, अल हुजरात)

इस्लामने शिकविलेल्या या उच्च जीवन आदर्शांना एकदा समाजात दृढता प्राप्त झाली की, नंतर स्त्रीला ती केवळ शारीरिक दृष्टीने कमकुवत आहे म्हणून तिला अनादराच्या दृष्टीने पाहिले

जाणार नाही. इस्लामी समाजात माणसाची आपल्या पत्नीशी होणारी वर्तणूक माणुसकीच्या व मानवतेच्या कसोटीवर असते. म्हणून इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांनी असे सांगितले आहे,

'ज्याचे आपल्या कुटूंबियांशी चांगले वर्तन आहे तो तुम्हापैकी सर्वांत चांगला आहे व स्वत:च्या चांगल्या वर्तनाच्या दृष्टीने मी तुम्हा सर्वांत अधिक चांगला आहे.' (हदीस)

प्रेषित मुहम्मद (स) यांच्या या विधानाने, त्यांना मानवी शास्त्राचे किती सखोल ज्ञान होते, हे कळून चुकते. त्याचबरोबर हे सत्यही आमच्यासमोर येते, की जेव्हा माणूस मानसशास्त्राचा रुग्ण असेल अथवा माणुसकीच्या स्थानाहून त्याचे अध:पतन झाले असेल तेव्हाच कोणताही पुरुष आपल्या पत्नीशी दुर्वर्तन करणे शक्य होते.

मानवाच्या प्रस्तुत अधोगतीला व जीवनातील त्याच्या पशुवत अवगुणांना इस्लाम कारणीभूत आहे काय? खचितच हे खरे नाही. कारण, माणसाचे इतक्या खालच्या दर्जावर पतन होऊन त्याचे पशुवत जीवन व्यतीत करावे, ही गोष्ट इस्लाम सहन करुच शकत नाही. उलट तो माणसाला आध्यात्मिक दृष्टीने इतका श्रेष्ठ करु इच्छितो, की त्यानंतर माणूस आपल्या इच्छावासनांचा दास होऊच शकत नाही, तसेच जीवनाकडे पाहण्याचा त्याचा दृष्टिकोन पशुवत असूच शकणार नाही. इस्लामच्या दृष्टीने स्त्री पुरुष समागम केवळ पशूसारखा शारीरिक संबंध नसून ती त्यांची एक स्वाभाविक गरज आहे. म्हणून तो पतिपत्नीच्या समागमाला प्रामाणिक कृत्य मानतो, जेणेकरुन स्त्री पुरुष कामपिपासेच्या संकटात गुरफटून न जाता जीवनातील विविध क्षेत्रांत आपली नैसर्गिक कर्तव्ये, पूर्ण निष्ठेने व कळकळीने करीत राहते. कामवासना शमविण्याचा हा उचित मार्गही जर बंद केला गेला तर स्त्री-पुरुष अनीतीला बळी पडतील, हे त्याला माहीत आहे. म्हणून इस्लाम पतीपत्नीच्या समागमास वाईट समजत नाही परंतु मर्यादेबाहेर विषयासक्ती तो पसंत करत नाही. कारण माणसाने आपली शक्ती उच्च ध्येयाच्या प्राप्तीसाठी खर्च करावी. अशी त्याची इच्छा आहे. पुरुषाने ईश्वरी मार्गात सतत प्रयत्नशील असावे व स्त्रीने घरात राहून मुलांचे संस्कार घडवावेत, तसेच इतर घरगुती कामे व्यवस्थेशीर पार पाडावीत. अशातऱ्हेने, इस्लाम स्त्री पुरुष या दोघांना जीवनाचे उच्च व पवित्र ध्येय देतो व त्यांना माणसासारखे जगण्यास शिकवितो.

नैतिक आदर्शामध्ये आढळणारे दोष इस्लामने आणले आहेत काय? याचे उत्तरही नकारात्मकच आहे, कारण इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांचे चरित्र माणसात आध्यात्मिक, पावित्र्य व मांगल्य निर्माण करतो, व त्याला स्वत:ला व्यवहारात इतरांकडून जशी न्यायाची, संयमाची, तसेच मानवतेच्या आदराची अपेक्षा असते तसाच न्याय, संयम व मानवेतचा आधार इतरानांही आपल्या वर्तणुकीतून द्यावा, अशी शिकवण देते.

## आमची सामाजिक वागणूक

आमची सामाजिक वागणूक पौर्वात्य स्त्रीच्या मागासलेपणास कारणीभूत आहे काय? काही साहित्यिक म्हणतात तसे या वागणुकीने स्त्रीला विचारहीन संकुचित दृष्टीची व अडाणी करुन ठेवली आहे काय? मुळीच नाही, असेही नाही. आमची सामाजिक वर्तणूक आम्हाला शिक्षण प्राप्त करण्यापासून रोखत नाही, तसेच कष्ट करण्यापासून रोखत नाही. तसेच इतरांशी सहकार्य करण्याच्या मार्गातही अडसर घालीत नाही.

आमची ही रीत (रिवायत) ज्या गोष्टींना विरोध करते ती काही हानीकारक व मूर्खपणाचे कृत्यें होत. जसे स्त्रियांनी अनावश्यक तऱ्हेने घराबाहेर पडून रस्त्यावर नखरा व हावभाव करीत हिंडणे वगैरे. अशा तऱ्हेच्या बाहेरच्या कृती व हालचाली करून स्त्री आपल्या स्त्रीत्वाची योग्यता व क्षमता संपूर्णपणे कार्यान्वित करू शकत नाही. त्यामुळे समाजात तिला कसलाही आदर व प्रतिष्ठा मिळू शकत नाही. या गोष्टींचा कोणीही इन्कार करू शकणार नाही अशी आमची खात्री आहे. स्त्रिया या मार्गाने गेल्या तर पश्चिमेतील सुसंस्कृत व उज्वल विचारांच्या 'सोसायटी गर्ल' चा अनुभव आम्हाला जे दाखवितो तसे स्त्रिया पुरुषांच्या कामवासनेला सहजपणे बळी पडतील. म्हणून जे लोक जुन्या चालरीतींचा विरोध करतात त्याचे खरे कारण, इस्लाम त्यांना ज्याची लत लागली आहे त्या कामविलासाची परवानगी देत नाही तेच आहे.

## निराधार गोष्टी

इस्लामवर आघात करण्याची एकही संधी वाया जाऊ न देणारा, इजिप्तमधील एक मुस्लिमेतर साहित्यिक[२] आपल्या साप्ताहिक पत्रकाद्वारा मुस्लिम स्त्रियांना वारंवार अशी चेतना व प्रेरणा देत असे की, 'आपली जुनाट पद्धत मोडून फेकून द्या, घराबाहेर पडा, धीटपणाने व साहसाने पुरुषात मिसळा, आणि कार्यालयात तसेच कारखान्यात कामे करा.' ही सर्व कामे, गरज आहे म्हणून तुम्हाला करावयाची आवश्यकता नसून, असे केल्याने मानववंशाची माता असण्याच्या भूमिकेतून जी कर्तव्ये तुमच्यावर लादली गेली आहेत, त्यापासून सुटका मिळविण्यासाठी हे सर्व करावयाचे आहे.

---

१. 'रिवायत' चा आमचा अर्थ शुद्ध व खरीखुरी इस्लामी रिवायत आहे व इतरांकडून आयात केल्या गेलेल्या अपरिचित रिवायत असा आमचा हेतू नाही परंतू ही विचित्र आहे की जे रिवायतीविरुद्ध आहेत, ते आपल्या वार्तालापात व लिखाणात, या दोहोंतील फरक नजरेसमोर ठेवीत नाहीत.

२. येथे ज्या साहित्यिकाचा उल्लेख केला आहे, त्याचे नाव सलमा मूसा असे होते. त्याचे लेख इस्लाम वैराचा एक नमूना होते. त्यात इस्लावर कसलीतरी शंकाकुशंका सतत असे. असाच प्रकार दुसरा एक ख्रिश्चन साहित्यिक जरजी जैदानचाही होता. इजिप्तमधील इस्लामविरोधी आघाडीतील हे शिरोमणी होते.

हे साहेब स्त्रियांना हेही सांगतात की, रस्त्याने चालताना जी स्त्री दृष्टी खाली ठेवून चालते, ती पुरुषाला घाबरत असते, परंतु अनुभवाने जेव्हा तिचे विचार उज्वल होतील तेव्हा ही भीती आपोआपच नष्ट होईल. ती धैर्याने पुरुषांचा सामना करु शकेल.

माननीय आयशा (र) ज्यांनी त्या वेळच्या राजकारणात भरपूर भाग घेतला होता, तसेच ज्यांनी युद्धांमध्ये सेनेचे नेतृत्त्व केले होते, त्यासुद्धा पुरुषांशी पडदा पाळीत होत्या. इतिहासाचा या साहित्यिकांना अशा गोष्टी सांगताना संपूर्ण विसर पडला. दृष्टी जमिनीवर खाली ठेवणे हे केवळ स्त्रियांचे वैशिष्ट्य नाही. इतिहासाची साक्ष आहे की इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) कुमारिकापेक्षाही अधिक लाजरे होते. प्रेषित मुहम्मद (स) यांच्या या लाजरेपणाचे कारण, त्यांच्यात आत्मविश्वासाचा अभाव होता काय? ते स्वत: अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स) आहेत, हे त्यांना ठाऊक नव्हते काय? इस्लामला विरोध करणारे, कोठवर अशा निरर्थक व मूर्खपणाच्या गोष्टी घडवित राहातील?

आज स्त्रीला ज्या अनादाराला तोंड द्यावे लागत आहे, ती वास्तवता असून त्याचा कोणी इन्कार करु शकत नाही. परंतु पाश्चात्य स्त्रीने जो अवलंब केला आहे तो त्यावरील तोडगा नाही. कारण पाश्चात्य स्त्रीला ज्या परिस्थितीशी तोंड द्यावे लागले होते ती एक विशिष्ट प्रकारची होती. तेथील स्त्रियांच्या मार्गभ्रष्टतेची जी रुपे दृष्टीस पडतात, तीसुद्धा त्याच परिस्थितीची निपज होती.

## खऱ्या इस्लामी राज्याची गरज

पुरुषांची समस्या असो की स्त्रियांची असो, इस्लाम व केवळ इस्लामच तिची सोडवणूक करु शकतो. म्हणून आम्हा पुरुषांचे, स्त्रियांचे वडीलधाऱ्यांचे, नवयुवकांचे सर्वांत पहिले कर्तव्य असे की सर्वांनी एकजुटीने, खरेखुरे इस्लामी राज्य स्थापन करण्याचा प्रयत्न करावा व आपल्या जीवनास इस्लामी नियमानुसार आकार द्यावा. हे काम जेव्हा आम्ही करू तेव्हाच आपल्या विचारांना व आस्थांना, कृतीचा विश्वास आम्ही यशस्वी करु शकू. जीवनात समतोल व एकजिनसीपणा प्राप्त करण्यास हाच एकमेव मार्ग आहे. हा मार्ग सर्व प्रकारच्या अन्याय, अत्याचार, जुलूम व जबरदस्तीपासून पूर्णपणे निर्मळ व स्वच्छ आहे.

**प्रकरण सातवे**

# इस्लामी कायदा

## प्रगतिवादाचा नवीन तर्क

प्राचीन काळातील रानटी लोकांसाठी करण्यात आलेल्या अमानुष व कठोर शिक्षा, आजच्या प्रगत पूर्वेत, कशा लागू केल्या जाऊ शकतील? केवळ काही रुपयांकरिता चोराचे हात तोडले जाऊ शकतात? चोर किंवा डाकू असला तरी आधुनिक दृष्टिकोनातून तो सामाजिक अन्यायाचा व अत्याचाराचाच बळी असतो. तो सहानुभूतिपूर्वक उपाय केला जाण्यास पात्र असतो, शिक्षेस नव्हे. आधुनिक प्रगतिवाद्यांच्या तोंडून इस्लामच्या बाबतीत अशाच प्रकारचे तर्क ऐकावयास मिळतात. पण विसाव्या शतकातील हे सुधारलेले प्रगतिशील लोक, उत्तर आफ्रिकेतील ४० हजार निरपराध माणसांची निर्घृण हत्या होताना पाहतात; तेव्हा त्यांना थोडाही अस्वस्थपणा वाटत नाही. परंतु एका गुन्हेगाराच्या व अपराध्याच्या कायदेशीर शिक्षेने मात्र ते फारच अस्वस्थ होऊन त्यांच्या कपाळावर आठ्यांचे जाळे उमटते. माणसे गोड व आकर्षक शब्दांना भुलतात व फसतात, ही खेदाची गोष्ट आहे. खरे सत्य मात्र त्यांच्या दृष्टीआड होऊन जाते.

काहीही झाले तरी विसाव्या शतकातील संस्कृतीपासून व तिच्या दोषापासून थोतडे बाजूला सरून आपण शिक्षेबाबत इस्लामची धारणा काय आहे, याचा विचार करु या.

## गुन्हे व समाज

समाजाविरुद्ध केल्या गेलेल्या एखाद्या कृत्याचे नाव गुन्हा आहे, अशी गुन्हाची व्याख्या केली जाते. म्हणून गुन्हा व त्याबद्दलच्या शिक्षा तसेच व्यक्ती व त्याचे समाजातील आपसाचे संबंध ठरविण्यासाठी समाजात सामूहिक दृष्टिकोनाचा फार मोठा वाटा असतो.

## भांडवलवादी देश

भांडवलवादी तसेच व्यक्तित्ववादी देशांच्या संदर्भात असे म्हणता येईल, की हे लोक मानवप्रतिष्ठेबाबत अतिशयोक्ती व अतिरेक करीत असतात आणि तेच संपूर्ण सामाजिक जीवनाचे उगमस्थान असल्याचे घोषित करतात. या देशामध्ये स्वातंत्र्यावर बंधने घालण्याच्या बाबतीत राज्याचे अधिकार अतिमर्यादित असतात. म्हणून हाच दृष्टिकोन त्या देशातील गुन्हांच्या व शिक्षांच्या विचारधारणेतही दिसतो. तेथे अपराध्यांना सहानुभूतिपात्र समजले जाते कारण त्यांच्या मताने ते मानसशास्त्रीय गुंतागुंतीचे व मानसिक रोगांचे बळी असतात. त्या रोगावर मात करणे त्यांच्या आवाक्याबाहेर असते, म्हणून या देशातील गुन्ह्यांच्या शिक्षेचे मुख्य स्वरुप गुन्हाची शिक्षा

कमी व हलकी ठेवण्याकडे कल असतो. कधीकधी तर अशा कृत्यांना मुळात गुन्हाच समजला जात नाही, ज्यावर एखादा अपराधी शिक्षेस पात्र ठरेल.

## आधुनिक मानसशास्त्र व गुन्हे

या टप्प्यात संपत्तीच्या वाटपाचे व विभागणीचे तत्त्व नजरेसमोर येते व गुन्ह्याची व्याख्या ठरविण्यात आम्हाला मदत करते. 'फ्राइड' च्या या महत्त्वाच्या ऐतिहासिक क्रांतीवर फार मोठा हक्क सांगितला जातो. त्याचा असा दावा होता, की गुन्हेगार वास्तविकपणे इच्छा वासनांच्या गुंतागुंतीचा व उद्रेकाचा बळी असतो. जेव्हा समाज धर्म, नीती व रुढी उपजत मानव प्रकृतीला दडपून ठेवण्याचा प्रयत्न करतात तेव्हा अशी गुंतागुंत व पेच निर्माण होते. मानसशास्त्राशी संबंधित असलेल्या नंतरच्या सर्व मानसशास्त्रज्ञांनी फ्राइडच्या म्हणण्याचेच पालन केले, तरी त्यामधील अनेकजण त्याच्या या मतांशी सहमत नव्हते की कामवासना ही जीवनातील केंद्रबिंदू आहे. या मानसशास्त्रज्ञांनी गुन्हेगार हा, तो ज्या परिस्थितींना आपल्या वैयक्तिक व सामाजिक जीवनात तोंड देत असतो त्या परिस्थितींचा केवळ एक बळी असल्याचे ठरविले. हे सर्व लोक मानसशास्त्रीय दैववाद मानणारे होते. मानसशास्त्राच्या शक्तीबाबत त्यांचा विचार असा होता की माणसाला विचारांचे तसेच कृतीचे कसलेही स्वातंत्र्य नसून तो तिच्यापुढे हतबल असतो व माणसाच्या हस्तक्षेपाविना ती शक्ती एका ठराविक व आखीव नियमानुसार कार्यान्वित असते.

## कम्युनिस्ट देश

या उलट कम्युनिस्ट देशांचा दृष्टिकोन असा असतो की, समाज व समूह हेच एकमेव पावित्र्याचे प्रतीक आहे. त्याविरुद्ध आवाज उठविण्याचा कोणाही व्यक्तीला मुळातच कसलाही अधिकार नसतो. अशा देशात जर एखाद्या व्यक्तीने राज्याविरुद्ध उठाव केला तर त्याला मृत्यूदंडासह अनेक प्रकारच्या कठोर शिक्षा दिल्या जातात. फ्राइड व त्याचे समर्थक कम्युनिजमच्या अपराधांचे मूळ कारण मानसशास्त्रात शोधण्याऐवजी ते अर्थशास्त्रात शोधित आहेत. कम्युनिस्ट दृष्टिकोनातून तो समाज आर्थिक दुरावस्थेचा व विषमतेचा बळी असतो. त्यात कोणत्याही चांगल्या गुणांची वाढ होऊच शकत नाही, म्हणून अशा समाजात गुन्हेगारांना शिक्षा व्हावयास नको. हेच जर खरे असेल तर पूर्ण समानता असलेल्या रशियामध्ये गुन्हे का घडतात व न्यायालयाची तसेच तुरुंगाची गरज का भासते?

## चुकांचे खरे कारण

व्यक्तित्ववाद्यांचे व कम्युनिस्टांचे दृष्टिकोन काहीअंशी खरे आहेत. व्यक्तीवर वातावरणाचा मोठा प्रभाव पडतो व त्याच्या भावनांचा उद्रेक कधीकधी गुन्ह्याचे कारण बनते हे ठीक आहे. पण माणूस परिस्थितीमध्ये अगदीच असहाय्य नसतो. माणसाच्या अंतरंगात असलेल्या

शिस्त लावणाऱ्या आत्मशक्तीला ते अगदी विसरुन जाऊन हे मानसशास्त्र व तज्ञ माणसाच्या प्रेरक शक्तीवरच सगळा भर देण्याची चूक करतात. खरे तर या शक्तीच्या सहाय्यानेच मूल एका विशिष्ट वयात ओलसरपणा निर्माण करणाऱ्या पेचावर मात करुन आपले अंथरुण ओले करीत नसते. या शक्तीच्या सहाय्यानेच तो आपल्या भावनांना व कृत्यांना आपल्या ताब्यात ठेवावयास शिकतो व आपल्या मोकाट इच्छा वासनांना लगाम घालतो.

## अर्थशास्त्र व गुन्हे

त्याचबरोबर आर्थिक परिस्थितीमुळे माणसाच्या भावना व कृत्ये प्रभावित होतात व कधीकधी उपासमार माणसाचा आत्मा विस्कटून टाकण्यास व समाजात तिरस्काराचे कारण होऊन गुन्ह्यांना तसेच नैतिक दोषांना कारणीभूत होत असते, हेही खरे आहे. तरीपण केवळ आर्थिक परिस्थितीच मानव जीवनातील एकमेव प्रभावशाली तत्त्व समजले जाऊ शकत नाही; काही अंशाने व एका मर्यादेपर्यंत ते खरे असू शकते. खुद्द रशियातील परिस्थिती व तेथील घडामोडीच या प्रतिपादनाचे खंडन करण्यास पुरेशा आहेत. परंतु रशियाचा असा दावा आहे की त्याने त्याच्या देशातून उपासमारीचे, दारिद्र्याचे संपूर्ण उच्चाटन केले आहे.

## गुन्हे व गुन्हेगार

कोणत्याही परिस्थितीत गुन्हेगाराला शिक्षा व्हावी किंवा नाही हे ठरविण्याआधी गुन्ह्यासंबंधी त्याच्या दोषाची व जबाबदारीची पात्रता व गुन्ह्याची मर्यादा ठरविली गेली पाहिजे. कारण गुन्हा व त्याची शिक्षा या दोन्ही बाबतीत, इस्लाम यातील काहीही नजरेआड करीत नाही.

## इस्लाम व त्याचा कार्यविधी

इस्लाम अनाठायी व अंदाधुंद शिक्षेची तरतूद करीत नाही व अविचाराने त्याची अंमलबजावणीही करीत नाही. इस्लामचा दृष्टिकोन हा व्यक्तित्ववाद्यांच्या व साम्यवाद्यांच्या (कम्युनिस्टांच्या) दृष्टिकोनातील इष्ट गुणाचा मिलाफ असून त्यांच्या दोषापासून मात्र मुक्त आहे. गुन्ह्याची शिक्षा देण्यापूर्वी, गुन्हेगाराशी संबंधित असलेल्या सर्व परिस्थितीचा आढावा घेऊन खऱ्या अर्थाने न्याय दिला जावा, अशी इस्लामची इच्छा आहे. गुन्हेगाराला शिक्षा देण्यापूर्वी गुन्हेगाराचा दृष्टिकोन व ज्या समाजाचा अपराध केला गेला आहे त्याचा दृष्टिकोन, या दोन्ही गोष्टी इस्लाम एकाच वेळी आपल्या डोळ्यांपुढे ठेवतो. या दोन्ही गोष्टींच्या उजेडातच इस्लाम योग्य शिक्षेची तरतूद करतो. अशी शिक्षा बुद्धी व तर्क यावर अधिष्ठित असून चुकीच्या व्यक्तित्व व राष्ट्रीय सिद्धान्ताचा त्यावर कसलाही अनिष्ट प्रभाव अगर परिणाम असत नाही.

## इस्लामी दंडविधान

इस्लामच्या काही शिक्षा दिसायला अन्यायपूर्वक व अनुचित वाटणे संभवनीय आहे. पण थोडा विचार केल्यास या शिक्षा अन्यायकारक व चुकीच्या नाहीत हे कळून येते. कारण इस्लाम अशा शिक्षांची अंमलबजावणी अशाच वेळी करीत असतो जेव्हा त्याची खात्री पटते, की गुन्हेगाराला गुन्हा करण्यासाठी कसलीही विवशता नव्हती किंवा कसलेही उचित कारण नव्हते. उदाहरण द्यायचे झाले तर इस्लाम चोराचे हात तोडण्याची शिक्षा देतो; पण चोरीचे कारण उपासमार होते असा थोडासा जरी संशय असला तरी चोराला हात तोडण्याची शिक्षा दिली जात नाही.

त्याचप्रमाणे इस्लाम व्यभिचार करणाऱ्या स्त्री-पुरुषांना दगडाने ठेचून मारण्याच्या शिक्षेचा हुकूम देतो. पण ही शिक्षा फक्त विवाहित स्त्री पुरुषांनाच व तीसुद्धा घटना डोळ्यांनी पाहिलेले चार साक्षीदार असतानाच दिली जाते. इतर शिक्षांच्या बाबतीतही इस्लाम असाच सावधपणा बाळगतो.

## माननीय उमर (र) यांची पद्धत

इस्लामी इतिहासातील प्रमुख असलेले दुसरे खलिफा माननीय उमर बिन खताब (र) यांनी दाखवून दिलेल्या एका सिद्धान्तानेही या सत्यावर प्रकाश पडतो. शरिअतच्या हुकुमांची कठोरपणे अंमलबजावणी करण्यांत माननीय उमर (र) प्रसिद्ध आहेत. त्या आधाराने त्यांचे हे तत्त्व एक मृदु तत्त्व मानले जाऊ शकत नाही. माननीय उमर (र) यांच्या काळात जेव्हा एकदा दुष्काळ पडला होता तेव्हा चोरीच्या गुन्ह्यासाठी कोणालाही हात तोडण्याची शिक्षा दिली गेली नाही. कारण उपासमारीमुळे लोक असाहाय्यपणे चोरी करण्याची शक्यता आढळून येत होती. खालील घटनेवरून इस्लामी कायद्याचा हा पैलू चांगल्या रितीने समजून येईल.

## एक ऐतिहासिक घटना

हातिब बिन अबी बलतअच्या काही गुलामांनी मुजना येथील एका माणसाची सांडणी (उंटाची मादी) चोरुन आणली आहे, अशी बातमी माननीय उमर (र) यांना मिळाली. माननीय उमर (र) यांनी विचारल्यावर त्या तरुणांनी गुन्हा कबूल केल्यामुळे त्यांना हात तोडण्याची शिक्षा सुनावण्यात आली. परंतु नंतर थोडा विचार करुन त्यांनी सांगितले, 'अल्लाहची शपथ, तुम्ही या तरुणांना चाकरीला ठेवल्यावर त्यांना उपाशी ठेवता व त्यामुळे ते हरामचे खाण्यास तयार होतात. हे मला जर समजले नसते तर मी त्यांचे हात तोडायला लावले असते. हे सांगून त्यांनी त्यांचे हात तोडण्याची शिक्षा रद्द करून टाकली. मग त्यांचा धनी हातिब बिन अबी बलतअला उद्देशून म्हटले, 'अल्लाहची शपथ' मी यांचे हात तोडायला लावले नाहीत. परंतु तुम्हाला मात्र त्रास होईल असा

कडक दंड केल्याशिवाय राहाणार नाही. असे म्हणून त्यांनी हातिब बिन अबी बलतअने सांडणीच्या मालकाला दोन सांडणीची किंमत दंड म्हणून देण्याची शिक्षा सुनावली.

## इस्लामी धर्मशास्त्राचे एक महत्त्वाचे तत्त्व

हतबल व विवश करणाऱ्या परिस्थितीच्या गांजणुकीने जर एखाद्या व्यक्तीने गुन्हा केला असल्यास त्याला गुन्ह्याबद्दल शिक्षा केली जाऊ नये, हे इस्लामी कायद्याचे स्पष्ट तत्त्व आहे हे वरील घटनेने आमच्या समोर येते. या तत्त्वाच्या समर्थनार्थ इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांचे हे कथनही सादर केले जाऊ शकते,

'संशयास्पद अवस्थांमध्ये इस्लामची शिक्षा लागू करु नका.' अर्थात कायद्याची शिक्षा देऊ नका.

## इस्लामी दंडविधान व समाजाची सुधारणा

शिक्षेच्या बाबतीतील इस्लामी धोरणाचा आढावा घेताना हे कळून येते, की गुन्ह्यांना कारणीभूत ठरणाऱ्या परिस्थितीपासून तो आधी मुक्त करतो. असे केल्यावरही जे कोणी गुन्हे करतात त्यांना न्यायपूर्ण रीतीने धडा शिकवण्यासारखी शिक्षा देतो. परंतु गुन्ह्याला कारणीभूत ठरणारी परिस्थिती आस्तित्वात असेल व तशा परिस्थितीच्या निकडीमुळे विवश होऊन अपराध्याने गुन्हा केला असल्याचा किंचितही संशय असेल तर त्याला शिक्षा दिली जात नाही. उलट त्याला गुन्ह्याच्या बाबतीत इतर कोणतीही शिक्षा दिली जाईल अथवा त्याला दोषमुक्त करून सोडून दिले जाईल.

## गुन्ह्यांच्या कारणांना प्रतिबंध

गुन्ह्यांना कारणीभूत होणाऱ्या परिस्थितींना नष्ट करण्यासाठी इस्लाम निरनिराळ्या साधनांनिशी प्रयत्न करतो. त्याचबरोबर इस्लाम संपत्तीचे उचित विकेंद्रीकरण करण्यावरही भर देतो. माननीय उमर बिन अब्दुल अजिज (र) यांच्या कारकिर्दीत दारिद्रय संपूर्णपणे नष्ट झाल्याचे आम्हाला दिसेल. धर्म, वंश, भाषा, वर्ण अथवा सामाजिक दर्जाकरिता कोणताही भेदभाव अगर पक्षपात न करता, आपल्या राज्यातील सर्व लोकांना लागणाऱ्या मूलभूत जीवनावश्यक वस्तू गोळा करण्याची जबाबदारी इस्लामी राजावर असते. त्याचप्रमाणे राज्य सर्व नागरिकांना उचित रोजगार मिळण्याची संधीही उपलब्ध करते. एखाद्याला रोजगार मिळू शकला नाही अथवा एखादा नागरिक काम करुन आपले पोट भरण्यास अक्षम असेल तर राज्याच्या कोषागारातून त्याला सहाय्य दिले जाते.

## लैंगिक समस्येबाबत इस्लामचा दृष्टिकोन

इस्लाम लैंगिक व वैषयिक समस्येचे महत्त्वही नजरेआड करीत नाही. उलट त्याची गरज भागविण्यासाठी सनदशीर व कायदेशीर पद्धतीचा 'निकाह' (विवाह) मार्ग मोकळा करुन ठेवतो. म्हणूनच इस्लाम लहान वयात विवाह होण्याचे समर्थन करतो व इच्छा असतानाही विवाह करण्याची कुवत नसलेल्यांना राज्य कोषातून सहाय्य देतो. पण त्याचबरोबर इस्लाम समाजाला भावना उद्दीपित करणाऱ्या व वासनांचा उद्रेक घडवून आणणाऱ्या प्रेरक तत्त्वापासून अलिप्त ठेवू इच्छितो. इस्लाम माणसापुढे एक श्रेष्ठ व पवित्र उद्देश ठेवतो ज्याचा प्रतिकार केल्यास त्याची सर्व शक्ती सामाजिक व सार्वजनिक कल्याणाच्या कार्यात लागून राहते. तो माणसाला आपला वेळ अल्लाहचे सान्निध्य प्राप्त करण्यासाठी व्यतीत करण्यास शिकवतो. गुन्ह्यांमध्ये वाढ होण्यास कारणीभूत होणाऱ्यास व प्रेरक गोष्टींचा, इस्लाम अशा रितीने शेवट करुन टाकतो. पण असे असूनही सर्व नैतिक मूल्यें धाब्यावर बसवून व अध:पतनात पशूवत बनून उघडउघड व्यभिचाराचे दुष्कर्म करताना चार साक्षीदारांनी डोळ्यांनी पाहिले नाही तोपर्यंत त्यालाही इस्लाम शिक्षा सुनावत नाही.

वर्तमान आर्थिक, सामाजिक व नैतिक परिस्थितीमुळे नवयुवक विवाह करु शकणे सोपे राहिलेले नाही व म्हणून ते व्यभिचार करीत असतात असे म्हटले जाऊ शकते, ही वास्तवता आम्ही मानतो. परंतु ज्या वेळी आम्ही इस्लामवर खऱ्या अर्थाने आचरण करु लागू त्या वेळी समाजात हलक्या पाशवी वासनांना उद्दीपित करणारे व नवयुवकांचे चारित्र्य बिघडविणारे नागडे व घाणेरडे चित्रपट, वर्तमानपत्रे, निर्लज्ज गाणी हीसुद्धा नसतील. तरुणांच्या वासना चेतवणारी सर्व साधने नष्ट केली जातील, त्यामुळे इच्छा असतानाही विवाह करता येऊ शकत नाही, असा दारिद्र्यरुपी शापही समाजात उरणार नाही. अशा रितीने समाज जेव्हा सर्व दुष्कर्माला बळी पडतात तेव्हा त्यांना तो शिक्षा करतो. कारण त्यांना गुन्हा करण्याला कोणतीही उचित सबब उरलेली नसते व त्यांना गुन्हा करण्यास विवश करणारी व भाग पाडणारी निकडीची परिस्थितीही उरलेली नसते.

## इस्लामी दंडविधानाचे प्रमुख वैशिष्ट्य

इस्लाम शिक्षा लागू करण्याआधी, गुन्ह्यांची सर्व संभवनीय कारणे नाहीशी करतो. एवढेच नाही तर कारणे नाहीशी झाल्यावरही एखाद्या गुन्हेगाराच्या बाबतीत परिस्थितीला विवश होऊन त्याच्या हातून गुन्हा घडण्याचा संशय जरी असला तरी त्याला शिक्षा देत नाही. हीच गोष्ट इस्लामला इतर जीवनपद्धतीहून वेगळी करते. जगातील कोणती जीवनपद्धत, शेवटी इस्लामच्या या न्यायोचित विधानाचा सामना करु शकते?

## युरोपच्या गैरसमजुतीचा पाया

काही युरोपियन साहित्यिक इस्लामच्या गुन्हे व शिक्षा यांच्या धारणेबद्दल अपरिचित असल्यामुळे त्याने निर्धारित केलेल्या शिक्षा अमानुष, रानटी व मानवतेचा अनादर असल्याचे समजतात. कारण त्यांच्या युरोपियन दंडविधानाप्रमाणे दररोज अशी शिक्षा लोकांना होत राहील; अशी चुकीची समजूत ते करून बसले आहेत. त्यांना असे वाटते की इस्लामी समाजात पूर्ण हात तोडण्याची व दगडांनी ठेचून ठार करण्याची शिक्षा अगदी सामान्यपणे दिली जाते. पण सत्य असे आहे की अशा तऱ्हेच्या धडा शिकविणाऱ्या शिक्षा इस्लामी समाजात अत्यंत अल्प प्रमाणात बघायला मिळतात. इस्लामी इतिहासाच्या चारशे वर्षांच्या दीर्घ अवधीत चोरीच्या गुन्ह्याकरिता हात तोडण्याची शिक्षा केवळ सहा वेळा दिली गेली. इस्लामचा मूळ उद्देश चोरीच्या गुन्ह्याचा अवरोध करण्याचा होता, चोराचे हात तोडण्याचा नव्हता. हे या सत्याचे उघड प्रमाण आहे. याचकरिता शिक्षा देण्यापूर्वी इस्लाम स्वत: गुन्ह्यांची कारणे नाहीशी करण्याचा प्रयत्न करतो. इस्लामी शिक्षेची अंमलबजावणी केल्याची जी चार दोन उदाहरणे आढळतात ती निश्चितपणें सत्य व न्यायावर आधारलेली होती.

काही युरोपियन साहित्यिक इस्लामी कायदा लागू होण्यास इतके का घाबरतात, हे कळत नाही. जर कोणत्याही विवशतेविना घडणाऱ्या गुन्हांची व त्या गुन्हेगाराचे समर्थन करण्याचा आग्रह धरत असतील, त्यांच्या भयाचे उचित कारण समजू शकते.

## शिक्षेची व्यवहारी उपयुक्तता

काही लोकांची अशी समजूत आहे की अशा प्रकारच्या शिक्षांची कसलीही व्यावहारिक उपयुक्तता नाही; पण हा विचार चुकीचा आहे. जे लोक कसलीही विवशता नसतांना अनुचितपणें गुन्हा करण्याची तीव्र प्रवृत्ती असते त्यांना घाबरविण्यासाठी वास्तविकपणे या इस्लामी शिक्षांची तरतूद आहे. अशा लोकांमध्ये सुधारणा घडवून आणण्याच्या दृष्टिने या शिक्षा फार परिणाम कारक सिद्ध होऊ शकतात. कारण गुन्हा करण्याची प्रवृत्ती कितीही तीव्र व प्रबळ असली तरी कडक शिक्षेचे भय गुन्हेगाराला, प्रत्यक्ष गुन्हा करण्यापूर्वी अनेक वेळा विचार करण्यास भाग पाडते. काही तरुणांची कामवासना अतृप्त राहते, पण जो समाज आपल्यातील सर्व व्यक्तींच्या हितासाठी व कल्याणासाठी कार्यशील असतो त्या समाजाला आपल्या सर्व लोकांच्या प्राणाचे तसेच त्यांच्या संपत्तीचे रक्षण करण्याचाही अधिकार असतो. कोणीही इतरांच्या प्राणास व संपत्तीस हानी पोहोचवू नये याची तो काळजी घेत असतो. या उलट जे खास कारणाशिवाय गुन्हा करतात, इस्लाम त्यांना परिस्थितीच्या निमित्तावर सोडून न देता सर्व प्रकारे त्यांचा उपाय करतो व त्यांनी समतोल व यथोचित जीवनाकडे परतून यावे असा प्रयत्न करतो.

प्रकरण आठवे

# इस्लाम व संस्कृती

## इस्लामवर आरोप करणारे हे लोक

हजारो वर्षांपूर्वी राहुट्यांत भटक्या लोकांसारखे आज आम्ही जीवन जगावे अशी तुमची इच्छा आहे काय? जंगलात राहणाऱ्या रानटी व अशिष्ट बुद्दू लोकांकरिता इस्लाम उपयुक्त होता व त्यांच्या गरजांना अनुकूल होता. त्यांच्या साधेपणाला साजेसा साधेपणा इस्लाममध्येही होता. पण ध्वनीच्या वेगापेक्षा अधिक वेगाने जाणाऱ्या विमानांच्या, हायड्रोजन बॉंबच्या व चित्रपटांच्या या वर्तमान युगात, ईश्वराच्या अस्तित्वावर श्रद्धा व ईमान यावर आधारलेल्या व वर्तमान प्रगतिशील संस्कृतीच्या दर्जावर पूर्णपणे न उतरणाऱ्या व स्थिर गतीहीन व काळाबरोबर जाण्याची क्षमता नसणाऱ्या संस्कृतीला या युगात काही वाव असू शकतो? म्हणून जोपर्यंत आम्ही त्याच्यापासून सुटका करुन घेत नाही तोपर्यंत सुसंस्कृत व प्रगत राष्ट्राच्या मालिकेत आम्ही दाखल होऊ शकत नाही.

काही दिवसांपूर्वी माझी एका इंग्रज विद्वानाशी भेट झाली, तेव्हा इस्लामवरचे हे सारे आरोप व शंकाकुशंका माझ्या मनात घोळू लागले. गेल्या दोन वर्षांपासून इजिप्तमध्ये मुक्कामास असलेल्या राष्ट्रसंघाच्या तज्ञ मंडळींशी या सद्‌गृहस्थाचा संबंध आला होता. इजिप्शियन शेतकऱ्याचे जीवनमान व राहणीचा दर्जा उंचावण्याचा व त्याकरिता इजिप्शियन सरकारला सहाय्य व मार्गदर्शन करण्याचा या तज्ञ मंडळाचा उद्देश होता. असा उद्देश असून व इजिप्शियन लोकाबद्दल गाढ प्रेम असूनही शिष्टमंडळातील कोणाही सदस्याला त्यांची भाषा येत नव्हती व त्यांच्यापैकी कोणालाही ही भाषा शिकण्याची आवश्यकता वाटली नव्हती. म्हणून इजिप्शियन सरकारकडून मला शिष्टमंडळाच्या व स्थानिक शेतकऱ्याच्या दरम्यान दुभाष्याचे काम करण्यास नियुक्त केले गेले. अशा रीतीने माझी भेट त्या इंग्रज विद्वानांशी झाली.

इजिप्शियन लोक इंग्रजाचा तिरस्कार करतात ही गोष्ट मी पहिल्या भेटीतच त्या इंग्रज साहेबाला सांगितली व पूर्वेतील कोणत्याही देशावर इंग्रजांचे दडपशाहीचे धोरण जोपर्यंत चालू राहील तोपर्यंत ते तिरस्कार करीत राहतील हेही सांगितले. मी त्याला हेही दाखवून दिले की अमेरिकेसारख्या त्यांच्या मित्रापासूनही आम्ही त्रस्त आहोत कारण इजिप्त, पॅलेस्टाइन व आमच्या इतर समस्येच्या बाबतीत आमच्याशी वागण्याची त्यांची रीत अन्यायकारक होती. माझे बोलणे ऐकून त्याला आश्चर्य वाटले. क्षणभर थांबून त्याने मला म्हटले, 'तुम्ही कम्युनिस्ट आहात काय?'

यावर मी उत्तर दिले की मी कम्युनिस्ट नसून मुस्लिम आहे व इस्लामच्या रुपाने माझ्याजवळ एक अशी संस्कृती व जीवनपद्धत आहे जी कम्युनिस्ट व भांडवलवाद या दोन्हींपेक्षा कितीतरी उत्तम व श्रेष्ठ आहे. कारण ती संपूर्ण जीवनाशी निगडीत आहे व तिच्यामुळे जीवनातील विविध अंगात एकजिनशीपणा निर्माण होतो.

तीन तास आम्ही आपसात हेच बोलत होतो. शेवटी तो म्हणाला, इस्लामबद्दल तुम्ही जे काही सांगता ते खरे असणे शक्य आहे, अगदी खरे आहे. पण मी स्वतः वर्तमान संस्कृतीच्या फळांपासून वंचित होणे पसंत करीत नाही. मी विमानाने प्रवास करण्याचे सोडून देऊ शकत नाही तसेच रेडिओवरील मंत्रमुग्ध करणाऱ्या संगीतापासूनही तोंड फिरवू शकत नाही. सुखचैनीची ही साधने मी सोडू शकत नाही.'

मी काही क्षण स्तब्ध राहिलो व नंतर म्हटले, 'पण तुमच्या या सर्व अभिरुचीवर बंदी कोण घालतो?'

'मग इस्लामचा स्वीकार करण्याचा अर्थ रानटी व भटक्या युगाकडे परत जाणे असा होत नाही काय?'

## निराधार आरोप

वर उल्लेख केलेल्या शंकेप्रमाणेच, इस्लामवर आरोप करणारे लोक सामान्यतः अशाच प्रकारचे आरोप करताना दिसतात. ज्या लोकांनी धर्माचा अभ्यास केलेला आहे ते जाणतात की या शंकाकुशंकांमध्ये कसलीही वास्तवता नाही. कारण इस्लामी कारकिर्दीत एक क्षणही असा झाला नाही की जेव्हा इस्लाम प्रगतीच्या अगर सभ्यतेच्या मार्गात अडसर बनून राहिला.

अधिकांश बुद्दू लोकांचा भरणा असलेल्या राष्ट्रास इस्लामने पहिल्यांदा संबोधित केले. ते इतके रानटी व क्रूर अंतःकरणाचें होते, की खुद्द कुरआनमध्ये त्यांच्या बाबतीत असे सांगितले आहे,

'हे बुद्दू, अरब सत्यधर्माचा इन्कार करण्यात तसेच वैर व वैमनस्यात अत्यंत कठीण आहेत.' (अत तौबा, ९७)

त्या रानटी व अशिष्ट बुद्दू लोकांचे एका सुसंस्कृत समाजात व राष्ट्रात रुपांतर घडवून आणून इस्लामने एक महान चमत्कार करुन दाखविला आहे. त्याने केवळ त्यांना सन्मार्ग दाखविला व पशुवत दर्जापासून वर काढून मानवतेच्या श्रेष्ठ मूल्यांशी व अल्लाहच्या धर्माचे आवाहन करणारे बनवून सोडले. इस्लाम मानवाच्या सभ्यपणाची व मानव आत्म्याच्या पावित्र्याची आश्चर्यजनक क्षमता बाळगतो. या गोष्टीचे हे कर्तव्य अतिस्पष्ट व उज्वल उदाहरण आहे.

## इस्लाम संस्कृती व आध्यात्मिक तसेच व्यावहारिक जीवन

मानवी आत्म्याचे पावित्र्य एक पवित्र ध्येय आहे. सर्व मानवी प्रयत्नाचे तेच लक्ष्य आहे व मानव संस्कृतीचे प्रमुख ध्येय तेच आहे. इस्लाम आत्म्याच्या पावित्र्यालाच पुरेसे मानत नसून ज्याला वर्तमान युगातील खरा आनंद मानले जाते त्या सर्व जाहीर बाबींनाही त्याबरोबरीने शिल्लक ठेवतो. म्हणूनच पराजित देशातील एकेश्वरवादाच्या विरुद्ध नसणाऱ्या व लोकांना भल्या व चांगुलपणाच्या कामापासून न रोखणाऱ्या सर्व संस्कृतीना, आपल्या अंमलाच्या कृपाछत्राखाली इस्लामने वाढ केली.

## प्राचीन ग्रीस व इस्लाम

ग्रीसपासून प्राप्त केलेले औषधांचे शास्त्र, ज्योतिषशास्त्र, गणितशास्त्र, सृष्टीशास्त्र व पदार्थविज्ञान शास्त्र, रसायनशास्त्र वगैरे शास्त्रीय विद्याधनाचे रक्षण करुन त्यांची जोपासना केली. इस्लामने या ज्ञान भांडाराचे फक्त रक्षणच केले नाही तर त्यात वाढही केली. यावरून विज्ञान व वैज्ञानिक संशोधनाबद्दल मुस्लिमांना किती गाढ प्रेम होते हे स्पष्ट होते. म्हणूनच उंदुलुस (सध्याचा स्पेन) ने लावलेल्या शोधांच्या पायावरच, युरोपातील विज्ञान पुनरुज्जीवन आंदोलन व त्यांची वर्तमान सफलता उभारलेली आहे. इस्लामने आपल्या इतिहासातील कोणत्याही काळात, मानवतेची सेवा करणाऱ्या कोणत्याही खऱ्या संस्कृतीला कधीही विरोध केला नाही, हेच सत्य आहे.

## वर्तमान पाश्चिमात्य संस्कृतीबद्दल इस्लामची वागणूक

या आधी इतर संस्कृतीशी वागण्याची इस्लामची जशी पद्धत होती तशीच पद्धत वर्तमान पाश्चिमात्य संस्कृतीशी वागताना आहे. इस्लाम तिच्या कोणत्याही गुणाचा इन्कार करीत नाही; पण त्यांच्यापासून निर्माण होणारे दोष व बिघाड यांना मान्य करीत नाही. इस्लामने आपल्या अनुयायांना भौतिक व वैज्ञानिक क्षेत्रापासून वेगळे होण्याची शिकवण कधीही दिली नाही. इतर संस्कृतीशी संघर्ष करताना खोलवर कसलाही वैयक्तिक अगर वांशिक संकुचितपणा कार्यान्वित नसतो. कारण इस्लाम मानव एकजुटीचा ध्वजवाहक आहे व माणसाच्या भिन्न भिन्न वंशामध्ये व वर्गांमध्ये बंधुत्वाचे संबंध प्रस्थापित व्हावेत अशी त्याची इच्छा आहे.

## वर्तमान वैज्ञानिक शोध व इस्लाम

इस्लामी आंदोलन सध्याच्या नवीन शोधांच्या विरुद्ध नाही, तसेच निरनिराळ्या अवजारांवर व शस्त्रांवर 'बिसमिल्ला हिर्रमानिर्रहीम' ही अक्षरे लिहली जावीत अशीही कोणा

मुस्लिमांची इच्छा नाही व तसे झाले नाही तर आपल्या घरात, शेतात व कारखान्यात त्यांना वापरणार नाहीत असे नाही. इस्लाम केवळ इतकेच इच्छितो की ही अवजारे व शस्त्रे अल्लाहसाठी व त्याच्या इच्छेनुसारच वापरली जावीत. कारण ही निर्जीव शस्त्रे असून त्यांना कोणताही धर्म अगर मातृभूमी असत नाही परंतु त्यांच्या गैरवापराने सर्व जगातील माणसावर त्याचा अनिष्ट परिणाम होतो. उदाहरणार्थ, तोफ पाहा. तिला धर्म, वर्ण, मातृभूमी वगैरे काही नसते; पण कोणीही तिचा गैरवापर करुन तिच्या सहाय्याने इतरांवर जुलूम व अत्याचार करु लागावे, कोणाही मुस्लिमांचे ते कोणत्याही परिस्थितीत वैभव अगर शान नाही. उलट जुलूम व अत्याचारापासून लोकांचे रक्षण करण्यासाठी तोफेचा उपयोग करण्याचे अथवा अल्लाहच्या दीनचा (जीवन) कलिमा उंच करण्यासाठी तिचा उपयोग करणे हे मुस्लिमांचे काम ठरते.

तसेच चित्रपटाचा शोध आहे. इस्लाम चित्रपटाविरुद्ध नसून सज्जन मुस्लिमांची मागणी एवढीच आहे, की चित्रपटाचा माणसाच्या पवित्र भावनांचे, चारित्र्याचे व मानवी समाजातील भल्या-बुऱ्यातील संघर्षांचे प्रतीक म्हणून वापर व उपयोग करावा. आजचे चित्रपट नागडेपणाचे तसेच घाणेरड्या वासनांचे व खालच्या दर्जाचे आहेत. कारण त्याद्वारे मानवी जीवनाचे निकृष्ठ दर्जाचे व निरर्थक चित्रण उभारले जातो. त्यामुळे माणसातील पाशवी वासना चळविल्या जातात. अशा प्रकारचे चित्रपट माणसाला आध्यात्मिक प्रगतीत सहाय्य करु शकत नाहीत हे उघड आहे, उलट त्याला ते हानिकारकच सिद्ध होतात.

इस्लामने मानवाच्या विज्ञान शोधांना कधीही विरोध केलेला नाही. सर्व चांगल्या विज्ञान शोधांचा उपयोग आपल्या उद्देशाकरिता करण्याची त्याने मुस्लिमांना शिकवण दिली आहे. इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांचे असे सांगणे आहे,

'ज्ञान प्राप्त करणे हे प्रत्येक मुस्लिमाचे अनिवार्य कर्तव्य आहे.'

ज्ञानाच्या व्याख्येत सर्व प्रकारच्या ज्ञानाचा समावेश असतो, हे येथे सांगण्याची कदाचित गरज नाही, जणू प्रेषित मुहम्मद (स) यांना असे अभिप्रेत होते, की मुस्लिमांनी ज्ञानाच्या व विज्ञानाच्या सर्व क्षेत्रांत पुढे गेले पाहिजे.

तात्पर्य असे की मानवतेची सेवा करणाऱ्या कोणत्याही संस्कृतीचा इस्लाम विरोध करीत नाही. पण जर एखाद्या संस्कृतीने मदिरापान, जुगार, नैतिक अध:पतन, वेश्यावृत्ती तसेच वसाहतवादी साम्राज्याला कोणत्या ना कोणत्या सबबीवर इतरांना गुलाम बनविण्याचा पर्याय होण्याचे ठरविले तर इस्लाम अशा संस्कृतीचा स्वीकार करीत नाही. उलट तिच्याविरुद्ध तो आवाज उठवितो. जेणेकरुन तिने आणलेल्या सर्वनाशापासून व रोगराईपासून लोकांचे रक्षण व्हावे.

**प्रकरण नववे**

# इस्लाम व प्रतिगामित्व

इस्लामवर आरोप करणारे काही भ्रमिष्ट लोक असे म्हटल्याचे ऐकण्यात आहे, की इस्लामी जीवनपद्धत आधुनिक युगाच्या गरजांशी व निकडींशी एकरुप नाही. म्हणून वर्तमान युगातील लोकांना इस्लाम स्वीकाराई होऊ शकत नाही. इस्लामचे आदेश केवळ गतकाळाकरिताच होते व आता त्यांची उपयुक्तता संपलेली आहे.. इतकेच नाही तर प्रगतीच्या मार्गात ते अडथळा होऊन राहिले आहेत, असे त्यांना वाटते ते असे म्हणतात,

१. व्याज (जी सध्याच्या काळी एक अनिवार्य आर्थिक गरज आहे) देण्याघेण्याला तुम्ही अजून गैर व बेकायदा असे मानता काय?

२. जकातची रक्कम ज्या वस्तीत गोळा केली जाते, तिचा खर्च निश्चितपणे तेथील रहिवाशांच्याच कल्याणासाठी करावयास हवा काय? पहिली गोष्ट अशी की जकात एक जुनाट व मागासलेली पद्धत आहे व त्यामुळे वर्तमान सरकारच्याही गरजा पुऱ्या होऊ शकत नाहीत. तसेच दुसरी गोष्ट अशी की एखाद्या गावात अगर शहरातील श्रीमंत लोकांकडून गोळा केलेली जकात, तेथील गरिबांना जेव्हा वाटली जाते तेव्हा त्यांचा स्वाभिमान दुखावला जातो. कारण त्यांच्या दृष्टीने त्या पैशांचा दर्जा 'दाना' पेक्षा काही अधिक नसतो.

३. तुम्ही मदिरापान, जुगार, स्त्रीपुरुषाचे अनिर्बंध मिसळणे, नाचगाणी, बाई ठेवणे, कामविलास या सर्व गोष्टींवर बंधने घालून त्यांना अवरोध करु इच्छिता? या सर्व गोष्टी तर सामाजिक जीवनात अनिवार्य गरज होऊन राहिल्या आहेत.

## व्याजाला आर्थिक निकड व विवशता म्हणणे चुकीचे आहे

इस्लाम व्याज वर्ज्य करतो हे बरोबर आहे; पण व्याज ही एक आवश्यक निकड विवशता आहे. असे म्हणणे चुकीचे आहे. आजसुद्धा जगात दोन प्रकारच्या जीवनपद्धती इस्लाम व कम्युनिझम अस्तित्वात आहेत. ह्या दोन्ही व्याजावरील आधारलेली आर्थिक व्यवस्थेचा स्वीकार करत नाहीत. दोहोंत फरक एवढाच आहे की कम्युनिझमजवळ आपल्या दृष्टिकोनानुसार आचरण करण्यासाठी व जीवनाला त्याच्या नुसार आकार देण्यासाठी अनिवार्यपणे लागणारी शक्ती तसेच सत्ताही आहे व इस्लामला अशी शक्ती किंवा सत्ता प्राप्त नाही. इस्लामला वास्तविक सत्ता प्राप्त असती तर व्याज ही अनिवार्य आर्थिक गरज नाही, हे त्याने शिकविले असते. इस्लामी आर्थिक व्यवस्था व्याजावर उभारली जात नाही, जशी आज रशियाची आर्थिक व्यवस्था व्याजावर उभारलेली नसून व्याजापासून पूर्णपणे मुक्त होऊन उभी आहे.

## अर्थशास्त्रज्ञांची साक्ष

कोणत्याही दृष्टीने व्याज ही वर्तमान युगाची अनिवार्य आर्थिक गरज आहे असे म्हटले जाऊ शकत नाही. जर ती अनिवार्य आवश्यकता असेल तर ती भांडवलदारांकरिताच आहे. कारण त्याच्या शिवाय ते भांडवलशहा होऊच शकत नाहीत. खुद्द पश्चिमेतील काही अर्थतज्ञाच्या शिरोमणीचाही व्याजाला विरोध आहे. ते आम्हाला अशी चेतावनी देत आहेत, व्याजावर जर प्रतिबंध लावला गेला नाही तर हळूहळू सर्व संपत्ती एकवटून काही लोकांच्याच हातात साठली जाईल. गरीब जनता आर्थिकदृष्ट्या बरबाद होऊन ते भांडवलशहांच्या अधीन होऊन त्यांचे गुलाम बनतील. पश्चिमेतील भांडवलशाहीच्या इतिहासात अशी अनेक उदाहरणे आहेत, ज्यांत अर्थतज्ञांचे हे मत अगदी खरे असल्याचे दिसून येते. व्याज व मक्तेदारी पद्धत, जे भांडवलवादांचे दोन महत्त्वाचे स्तंभ आहेत या दोहोंना जेव्हा भांडवलवादाचे अस्तित्वही नव्हते, तेव्हा आजपासून सुमारे चौदा हजार वर्षांपूर्वीच इस्लामने व्याज वर्ज्य असल्याची घोषणा करुन टाकली आहे. इस्लामी जीवनपद्धतीला अवतरित करणारा सर्वशक्तिमान व सर्वज्ञ अल्लाह आहे व तो मागच्या पुढच्या सर्व पिढ्यांतील लोकांच्या परिस्थितीवर लक्ष ठेवतो व व्याजापासून कोणते बिघाड, आर्थिक दोष व पेच निर्माण होऊ शकतात हे तो चांगले जाणतो.

## एक मानहानीकारक विवशता

ज्या देशातील आर्थिक व्यवस्था परकीय मदतीवर अवलंबून असते त्याच्या बाबतीत तर व्याज ही एक मानहानीकारक बाब होऊ शकते, पण इस्लामी अर्थव्यवस्था स्वतंत्र असते आणि स्वंतत्र निकोप पायावर उभारलेली व आधारलेली असते. इतर देशांशी त्याचे संबंध समानतेच्या तत्त्वावर आधारलेले असतात. ते जीहुजुरीवर, आज्ञापालनावर किंवा दास्यत्वावर नसतात. त्याचप्रमाणे आर्थिक बाबतीत मार्गदर्शन त्या इस्लामी आदेशानुसार व तत्त्वानुसार करतो जे व्याज निषिद्ध व वर्ज्य ठरवितात. या सिद्धान्तांच्या मार्गदर्शनाखाली इस्लामी अर्थव्यवस्था आत्सित्वात येते, तिला जगात प्रगती व श्रेष्ठत्वाच्या ध्वजाचे स्वरुप असते.

## जकातचा खरा दर्जा

जकातसंबंधी या अगोदर दाखवून दिले आहे, की हुकूम आहे व तो असा हक्क आहे ज्याच्या रक्षणाची जबाबदारी राज्यावर असते.

या प्रकरणात आम्ही जकातसंबंधी असणाऱ्या त्या शंकेचे उत्तर देऊ इच्छितो जी तिच्या स्थानिक बाबतीत म्हणजे जेथे जकात गोळा केली जाते, तेथील गरजू लोकांतच तिचे वाटप व्हावे, या नियमावर केली जाते.

येथील बहुतेक विद्वान पश्चिमेकडून आणलेल्या प्रत्येक व्यवस्थेला व पद्धतीला सुधारणांचे परमोच्च बिंदू मानून त्यांना कवटाळीत असतात. ही अत्यंत खेदजनक अवस्था होय. पण तीच गोष्ट जर इस्लामने त्यांच्यापुढे ठेवली तर तिला ते प्रतिगामित्व व अंधश्रद्धा समजू लागतात.

## अमेरिकेचे उदाहरण

या विद्वानांना, या गोष्टीची आठवण करुन देणे इष्ट ठरेल की, संयुक्त राज्य अमेरिकेची शासकीय चौकट पूर्णत: विकेंद्रीकरणावर आधारलेली आहे. संयुक्त राज्य अमेरिका व त्यामधील राज्यातील प्रत्येक गाव व वस्ती आपल्या सामान्य व्यवस्थेबाबत आर्थिक, राजनैतिक व सामाजिक दृष्टीने स्वयंपूर्ण व स्वतंत्र असते. या स्वतंत्र घटकांच्या नगरपरिषदा आपल्या हद्दीतील रहिवाशांवर कर लागू करतात, ते वसूल करतात व मग आपल्या गावाच्या अगर वस्तीच्या शैक्षणिक, औषधोपचार, परिवहन तसेच इतर सार्वजनिक कार्यावर गरजेनुसार तो खर्च करतात. हा सर्व खर्च करुन काही शिल्लक उरली तर ती राज्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्याकडे पाठवून त्यांच्या ताब्यात देऊन टाकतात. या उलट जर गावाचा एकंदर खर्च उत्पन्नापेक्षा अधिक असेल तर राज्याकडून तुटीची भरपाई करण्यात येते. निस्संशय ही एक चांगली पद्धत आहे. यात भिन्न मानवी प्रयत्नांना सुरेखपणाने एकवटून खर्चाचा एकंदर भार विभागला जातो व हा सर्व भार एकट्या केंद्रसरकारला वाहावा लागत नाही. या शिवाय खर्चाचा विनिमय, स्थानिक लोकांच्या हातात असल्यामुळे त्यांच्या सर्व गरजाही चांगल्यारितीने पुऱ्या होत असतात. कारण स्थानिक मंडळी आपल्या हद्दीतील गरजा केंद्रापेक्षा अधिक चांगल्या रितीने जाणत असतात.

## तेरा शतकांपूर्वी

आमच्या देशातील विद्वान, अमेरिकेच्या या पद्धतीची फार प्रशंसा करतात, पण हीच पद्धत इस्लामने तेराशे वर्षापूर्वी स्थापन केली होती ही गोष्ट ते विसरुन जातात. प्रत्येक गावातील पदाधिकारी आपापल्या गावात कर वसूल करीत असत व त्यातून गावाच्या गरजा पुऱ्या करीत असत. खर्च व उत्पन्न यांत जी तफावत असे, त्यात शिल्लक असल्यास राज्याच्या खजिन्यात जमा करीत व तूट असल्यास राज्याकडून कर्जांच्या रुपाने रक्कम घेतली जात असे.

आता उरली जकात वाटपाची समस्या, तर या बाबतीत आम्ही या आधी असे सांगितलेले आहे, की जकात निश्चितपणे रोख रकमेत अथवा असेल त्या स्वरुपात लोकात वाटली गेली पाहिजे, असे सिद्ध करणारे कोणतेही कलम आमच्या कायद्यात नाही. जकात गरिबांच्या शिक्षणासाठी, औषधासाठी व सामाजिक सुखसोईसाठीही खर्च केली जाऊ शकते व त्यातून जे वार्धक्यामुळे, अशक्तपणामुळे व अल्पवयामुळे कामे करण्यास विवश आहेत अशा गरजूंना रोख आर्थिक मदतही दिली जाऊ शकते.

आम्ही आपल्या देशात असे लहान लहान शासकीय घटक स्थापावे, जे राज्यात इस्लामी जगतात व जगाच्या सामूहिक व्यवस्थेत राहून आपल्या स्थानिक समस्या व आर्थिक बाबींची स्वत: देखरेख करुन स्थानिक लोकांच्या गरजा भागविण्यास जबाबदार होतील. असे आज जर इस्लामचे आर्थिक सिद्धान्त वर्तमान समाजात स्थापू इच्छिले तर त्या उद्देशाकरिता आम्हाला फार काही करावे लागणार नाही.

## इस्लाम व सामाजिक बिघाड

जुगार, मदिरापान व स्त्री पुरुषाने अनिर्बंध एकमेकांत मिसळणे, यासारख्या कथित प्रगतिवाद्यांच्या निरर्थक संकटापासून बाजूला होऊन इस्लाम या सर्व गोष्टींवर प्रतिबंध लावतो.

## मदिरापानाची गोष्ट

मदिरापानाची गोष्ट ही वास्तविकपणे कोणत्या ना कोणत्या वैयक्तिक अगर सामाजिक बिघाडाचेच लक्षण आहे. मदिरा व इतर नशेच्या वस्तूंची गरज केवळ बिघडलेल्या समाजालाच भासत असते. ही गरज काही निरनिराळ्या वर्गांत इतकी निकडीची असते की ते भोगविलासात पूर्णपणे डुंबून त्यांच्यातील सर्व मानवी संवेदना मरुन जातात. त्याच वेळी दुसरीकडे संपूर्ण देश निराधारपणाच्या, हलाखीच्या व अभावाच्या गर्तेत पडलेला असतो. म्हणून हा अभावग्रस्तांचा समूह वास्तवापासून पलायनाच्या वाटा शोधून आपले वेगळे जग बसवून टाकतो. जे दडपशाहीच्या व क्रूरपणाच्या जात्यात भरडलेले असतात तेथे मानवाच्या विचारावर बंधने घालून त्यांच्या भरारीला मर्यादा घातल्या जातात. जेथे लोक आपल्या पोटापाण्याच्या विवंचनेत इतके व्यग्र व हरवलेले असतात की त्यांना इतर कसलीही शुद्ध उरत नाही. अशाच समाजात या नशेच्या वस्तूंचा रिवाज सर्वसामान्यपणाने आढळतो. त्याचे हेच कारण आहे, त्याचप्रमाणे ज्या लोकांच्या कानावर सतत नवनव्या यंत्राचे कर्णकर्कश व नकोसे वाटणारे आवाज आढळत असतात, अशा लोकांच्या समाजातही हा दोष सर्वसामान्यपणे आढळून येतो.

## इष्टपणाचे नव्हे रोगाचे लक्षण

हे सर्व सामाजिक रोग मदिरेला सनदशीर ठरविण्यासाठी कोणत्याही तऱ्हेने इष्ट अगर योग्य होऊ शकत नाहीत. मदिरापान हे सामाजिक रोगाचे लक्षण असल्यामुळे, मदिरेचा निषेध करण्यासाठी अगदी तशाच स्वाभाविक कार्यप्रणालीचा अवलंब केला आहे. त्याने सर्वप्रथम निषेधाला जबाबदार असणाऱ्या बिघाडांना, दोषांना व त्यांना उगम देणाऱ्या सर्व झऱ्यांना नष्ट करुन टाकले आणि त्या दिशेने समाधान झाले तेव्हा मदिरा अवैध व वर्ज्य असल्याचे घोषित करुन टाकले. इस्लामवर टीकास्त्र सोडण्याऐवजी, वर्तमान संस्कृतीच्या ध्वजवाहकांनी जर आपल्या सामाजिक, राजकीय, मानसिक व स्वाभाविक परिस्थितिमध्ये बदल घडवून आणून अशा रीतीने

मानवतेच्या आध्यात्मिक रोगावरील उपायांची पद्धत शिकण्यावर आपले लक्ष केंद्रित केले तर ते त्यांना अधिक उपयुक्त होऊ शकेल अशारीतिने ते इस्लामपासून बरेच काही शिकू शकतील.

जुगाराच्या संदर्भात आम्ही सविस्तर चर्चा करु इच्छित नाही, कारण जे मूर्ख असतात, त्यांनाच जुगाराची आवड असते.

## स्त्री पुरुषांचे अनिर्बंध एकमेकांत मिसळणे व इस्लाम

कडाक्याच्या वादविवादाचे केंद्र बनलेल्या, स्त्री पुरुषाच्या अनिर्बंध मिसळण्याच्या समस्येवर थोडा दृष्टिक्षेप टाकू या.

इस्लाम स्त्री पुरुषाच्या एकत्र येण्यावर, मिसळण्यावर बंधने घालतो. म्हणून काही निकृष्ट विचाराचे लोक इस्लामला प्रतिगामी धर्म समजतात. ज्या फ्रान्सचा संस्कृतीत प्रेमी युगुले राजमार्गावर, इतरांच्या उपस्थितीला विसरुन चुंबन, आलिंगन करु शकतात, त्या फ्रान्स संस्कृतीच्या व्याख्येची तारीफ करताना आढळतात. अशा प्रेमी युगुलांना कोणी काही करु शकत नाही. अशा प्रकारे त्यांना प्रेमाच्या व इष्काच्या नशेत धुंद असल्याचे जेव्हा एखाद्या पोलिसाच्या दृष्टिस पडते तेव्हा येणाऱ्या जाणाऱ्यांकडून त्यांना उपसर्ग पोहोचू नये म्हणून तो सनदशीर पहारा करतो. जेणेकरून त्याना इष्काचा आनंद उपभोगण्यात कोणीही बाधा आणू नये. राहता राहिले अंधश्रद्ध लोक जे असे दृष्य पाहून तोंड फिरवून घेऊन कपाळावर आठ्या पाडून घेतात तर अशा लोकांना तेथे विचारतो कोण?

अन्य काही लोक अमेरिकेच्या जीवनपद्धतीवर मुग्ध आहेत. कारण तेथील लोक आत्मवंचना करीत नाहीत. ते कामतृप्तीला आयुष्यातील एक निकडीची गरज मानतात. म्हणून तेथेही जीवनावश्यक गरज भागविण्यासाठी सर्व सोई उपलब्ध असतात. प्रत्येक तरुणीचा एक 'बॉय फ्रेंड' व प्रत्येक तरुणाची 'गर्ल फ्रेंड' असते. आपला बहुतेक वेळ ते एकमेकाच्या सहवासात घालवीत असतात. गावाबाहेर जाऊन वनभोजने करीत असतात व तेथे निसर्गाच्या हाकेला ओ देऊन आपली कामवासनेची तहान भागवीत असतात. म्हणून अशा वनभोजनाहून जेव्हा ते परततात तेव्हा त्यांच्या मनाला इतकी तृप्ती व संतोष प्राप्त झालेला असतो की त्यानंतर ते आपल्या अभ्यासात व शिक्षणात संपूर्ण एकाग्रतेने लक्ष देतात. तसेच इतर कर्तव्यें व्यवस्थित रीतीने पार पाडतात व उत्पादनात वाढ करुन देश समृद्ध करतात आणि मग संबंध राष्ट्राची प्रगती व उन्नती होत असते.

## नैतिक दिवाळखोरपणाचे वेड

पश्चिमेच्या नैतिक दिवाळखोरपणाचे इतके वेड असणारे हे लोक ज्यांचे विचार अगदी हलक्या व निकृष्ट दर्जाचे आहेत, ही गोष्ट विसरतात की दुसऱ्या महायुद्धात फरान्स जर्मनीच्या

पहिल्या हल्ल्यातही टिकू शकला नाही व त्यांनी जर्मनासमोर आपले गुडघे टेकले होते. फरान्सच्या या अपमानजनक पराजयाचे कारण फ्रेंच सेनेचे शिक्षण तृत्तीपूर्ण होते, अगर युद्धसामग्री कमी होती असे नसून त्याचे खरे कारण असे, की फ्रेंच लोक भौतिक सुखाचे भक्त झाले होते व नैतिक मार्गभ्रष्टतेचे बळी होऊन राष्ट्रीय भावनांशी पूर्णपणे वंचित झाले होते आणि आतून पुर्णपणे पोखरले गेले होते. लढाई चालू राहिली तर पॅरीसमधील गगनचुंबी इमारती व निरनिराळ्या सुखविलासांच्या रंगशाळा बाँबवर्षावाने उद्‌ध्वस्त होतील,.अशी त्यांना भीती पडली होती. पश्चिमी सभ्यतेचे हे विद्वान् रसिक आपल्या देशातही या नाटकाची पुनरावृत्ती करु इच्छितात काय?

अमेरिकेच्या संदर्भात असे म्हणता येईल की त्याच्या फसव्या जीवनाला अनावृत्त करण्यासाठी खुद्द अमेरिकन सरकारनेच गोळा केलेले आकडे पुरेसे आहेत त्यांच्यानुसार अमेरिकेतील माध्यमिक शाळांतील ३८ टक्के मुली गर्भवती असल्याचे आढळून आले आहे. विद्यापीठातील खालच्या वर्गातील विद्यार्थ्यांत हे प्रमाण बरेच कमी आहे. कारण संततीनिरोधाची साधने वापर करण्यात त्या शाळकरी मुलीपेक्षा जास्त अनुभवी आहेत.

## चांगले उद्देश चांगली साधने

कामवासनेची तृप्ती निस्संशय एक मान्य उद्देश आहे. इस्लाम या समस्येवर खूप लक्ष ठेवतो. कारण त्याला माहीत आहे की माणसाची कामवासना अतृप्त राहिली तर तो त्याच दलदलीत अडकतो व इतर कोणत्याही कामात एकाग्रता करण्यायोग्य उरत नाही. याचा परिणाम असा होतो की राष्ट्रीय उत्पादन घटू लागते. परंतु चांगले उद्देश चांगल्या साधनांद्वाराच प्राप्त केले पाहिजेत. हा उद्देश साध्य करण्यासाठी संपूर्ण समाजाला नैतिक रोग लाऊन देणे अगर तरुणांना पशूप्रमाणे दुसऱ्यांच्या घरात घुसण्याचे स्वातंत्र्य देणे निश्चितपणे पवित्र पद्धत नव्हे.

## अमेरिकन जीवनाचा वरवरचा झगमगाट

ज्या विचारवंतांचा असा चुकीचा समज झाला आहे की अमेरिकेत सर्व आश्चर्यजनक उत्पादनवाढ कामभ्रष्टतेची फलनिष्पत्ती आहे. त्यांना हे कळावयास हवे की अमेरिकेने जगाला आतापर्यंत जे उत्पादन दिले आहे, ते भौतिक उत्पादन आहे. त्याचा असाच वेग राहिला तर थोड्याच दिवसांत माणसाऐवजी निर्जीव यंत्रे कामे करु लागतील. याच कारणामुळे अमेरिका इतकी भौतिक प्रगती करुनही मानसिक व आध्यात्मिक दृष्टीने इतकी ढासळलेली आहे की आजसुद्धा तेथे निग्रोंचा दर्जा गुलामापेक्षा अधिक नसून दररोज ते अत्याचाराला बळी पडत असतात, ही त्यांची अंतर्गत अवस्था आहे. बाह्य जगाच्या संदर्भात अमेरिका आजसुद्धा वसाहतवादी साम्राज्यवादाची व त्याच्या अंतर्गत गुलामीची ही पद्धत वास्तविकपणे अमेरिकन

राष्ट्राच्या घोर आध्यात्मिक अधोगतीचे प्रदर्शन व प्रतीक झाले आहे. असे उदाहरण कोणत्याही सुसंस्कृत राष्ट्राच्या इतिहासात आढळणे कठीण आहे.

## काम मार्गभ्रष्टतेचा परिणाम

आजकाल तरुणांना सुंदर व नटल्या सवरलेल्या स्त्रियांशी संपर्क वाढविण्याचा छंद आहे. याचे कारण केवळ इतकेच आहे की आपल्या वैध अधिकारांना पुरेसे मानण्याऐवजी त्यांना दिसेल त्या हिरव्या शेतात पशुप्रमाणे तोंड घालण्याची सवय जडली आहे. हाच माणसाचा सतत कमकुवत दुवा आहे. प्रश्न आहे की, माणसाच्या जीवनातील उद्देश केवळ तृप्तीचा, स्वादाचा व आनंदाचा शोध करण्याचाच आहे काय? इच्छावासानांच्या तृप्तीपासून मिळणाऱ्या स्वादाचा इन्कार कोण करु शकतो, पण हा काही विसाव्या शतकाचा नवीन शोध नाही. आजपासून हजारो वर्षापूर्वी ग्रीक, रोमन व इराणी लोकांनाही ते ठाऊक होते. ते आकंठ त्यात डुंबलेले होते; पण याच मर्यादेपलीकडे वाढलेल्या भोगलालसेने या राष्ट्रांना त्यांच्या कर्तव्यापासून गाफील बनविले व हळूहळू ते आपले शासन, सत्ता व श्रेष्ठता सर्वकाही गमावून बसले.

## आधुनिक पश्चिम व आम्ही

आधुनिक पश्चिमेजवळ जीवनाची भौतिक साधने विपुल आहेत. वैज्ञानिक शोध अति उत्पादन वाढ व पैशाचे असीम प्रेम यांचाही त्यात समावेश आहे. पाशवी वासनांची कास धरल्यामुळे त्यांच्या अधोगतीची काही अशी सुरुवात झाली आहे. आम्ही गेल्या दोन शतकांपासून प्रतिकूल परिस्थितीमुळे, पश्चिमेच्या तुलनेत जरी मागासलेले आहोत तरी संस्कृती व प्रगतीच्या नावावर अगर प्रतिगामित्व आणण्यास भिऊन जाऊन पाशवी वासनांच्या धुंदीत जर स्वत:ला हरवून बसलो तर शेवटी त्यापासून आम्हाला काय साध्य होईल? याचा परिणाम असा होईल की आमची अवस्था अधिकाधिक वाईट होत जाईल व मग आम्ही त्यांना कधीही काबूत आणू शकणार नाही. आधुनिक विचारवंत असल्याचा दावा सांगणारे जे लोक असे इच्छितात की आपल्या ऐतिहासिक परंपरेशी आपले संबंध तोडून टाकावेत, ते लोक खरे तर वसाहतवादी साम्राज्याचे हस्तक बनले आहेत. वसाहतवादी साम्राज्य अशा सर्व विचारवंतांची व साहित्यिकांची पाठ थोपटत असते. कारण त्यांना पक्के ठाऊक आहे की हे लोक आपल्या राष्ट्राच्या चारित्र्याच्या ठिकऱ्या उडवून व तरुणाना भोगविलासात घालून वास्तविकपणे ते त्यांच्याच घृणास्पद उद्दिष्टांची पूर्तता होणे सुकर करीत असतात.

## पाश्चिमात्य स्त्रीचा अनुभव एक प्रश्न

'पाश्चिमात्य समाजातील स्त्रियांना पाहा. त्या किती प्रगतिवादी आहेत ! त्यांना समाजात पूर्ण अधिकार असून सामाजिक जीवनात त्यांचा खोलवर हस्तक्षेप आहे. पाश्चिमात्य स्त्रियांना सनदशीर कामे व नोकऱ्या करण्याची व इतर लोकांत मिसळण्याची जी संधी मिळाली आहे व त्यापासून तिला जो अनुभव प्राप्त झाला आहे, तसला अनुभव घराच्या चार भिंतीच्या आत राहून व मुलांचे संगोपन करुन, कदापि प्राप्त होऊ शकले नसते, यात संशय नाही. प्रश्न असा आहे की घराबाहेर पडून स्त्रियांना जो अनुभव प्राप्त झाला आहे, त्याचा तिच्या नारीत्वाशी कितपत संबंध आहे? त्यापासून तिचे नारीत्व खरोखर फुलले आहे काय? अगर काही नवीन गुण तिच्यात निर्माण झाले आहेत की त्या कारणाने काही स्त्रीत्वाचे गुण दबले गेले आहेत?

हाच प्रश्न आम्ही दुसऱ्यांदा असा विचारु शकतो की स्त्रीला या बाह्य अनुभवामुळे मानवी जीवनाला खरोखरच काही लाभले आहे काय? त्यामुळे मानवी जीवनाला काही नवे गुण लाभले आहेत की त्यामुळे उलट काही जुने गुणच नष्ट झाले आहेत?

## पश्चिमेची सामाजिक शोकांतिका

पश्चिमेतील स्त्री ही पुरुषांची चांगली मैत्रिण बनली आहे जी त्यांचे मनोरंजन करते, त्यांची कामवासना भागविते व अनेक प्रश्नात पुरुषांच्या बरोबरीने सहभागी होत असते; पण त्यामुळे आता ती चांगली पत्नी व चांगली माता होऊ शकत नाही. संयुक्त राज्य अमेरिकेत घटस्फोटाचे प्रमाण ४० टक्क्यापर्यंत गेले आहे, ही गोष्ट या प्रतिपादनाचे समर्थन करते. युरोपात घटस्फोटाचे प्रमाण त्यापेक्षा थोडे कमी आहे; पण तेथे विवाहित जोडप्यांनी विवाहानंतरही रखेली ठेवणे व इतरांशी इष्काचे संबंध ठेवणे अगदी सामान्य बाब आहे. पाश्चिमात्य स्त्री एक चांगली पत्नी बनली असती व आपल्या घरातील हितासाठी जर तिच्यात आपले आयुष्य वाहण्याची क्षमता असती तर अमेरिकेत घटस्फोटाचे प्रमाण इतक्या मोठ्या प्रमाणात झाले नसते. एक चांगली माता होण्यासाठी फलदायी ठरु शकणाऱ्या अनुभवापासून या नोकरी करणाऱ्या स्त्रिया वंचित असतात, ही गोष्टही येथे स्पष्ट केली पाहिजे. चांगल्या मातेचे कर्तव्य पार पाडण्यासाठी तिला इतका वेळ नसतो व तिच्या मानसशास्त्रीय घडणीमुळे ती ही कर्तव्ये पार पाडण्यास तयारही नसते.

## संकटाची घंटा

या उलट हे सत्य आहे की स्त्री पुरुषांच्या अनिर्बंधपणे एकमेकांत मिसळण्यामुळे लाभ होऊ शकला नाही. काही स्त्रियांना पार्लमेंटचे सभासद, मंत्री अगर काही खात्याचे प्रमुख अधिकारी केल्याने जगाच्या समस्या सुटू शकत नाहीत. तसेच हजारोंच्या व लाखोंच्या संख्येत स्त्रियांनी कारखान्यांची, दुकानांची, कोठींची शोभा वाढविल्याने जगातील बिघाड दुरुस्त होऊ

शकत नाही. समाजात स्त्रीचे परिणामकारक चरित्र केवळ पार्लमेंटात भाषणे करण्याइतपत व विविध खात्यांना आदेश देण्याइतपत मर्यादित आहे काय? असे नाही हे उघड आहे. कारण मातेच्या स्वरुपात स्त्रीच्या महानतेचा इन्कार कोणीही करु शकत नाही. तिच्या शिकवणीनेच जगाला चांगले नागरिक प्राप्त होतात. पार्लमेंटमध्ये टाळ्यांच्या कडकडाटात व वाहवाच्या कल्लोळात एखाद्या स्त्रीला यांचा विसर पडणे शक्य आहे. पण असे सर्व असूनही जी मातेची माया मानवी मनोविकारातील दोषावर परिणामकारक इलाज होऊ शकते, त्या मातेच्या शीतल मायेच्या व प्रेमाच्या अभावाने आणि मातेच्या प्रेमळ सहवासाचा अभाव अनुभवणारी मानवी पिढी मानवतेकरिता एका मोठ्या संकटाची व धोक्याची घंटा आहे. त्याच्या तुलनेत ही प्रासंगिक वाहवा व कौतुक यांचे निश्चितपणे कोणतेही मूल्य नाही. ज्यांनी आपले सर्वस्व, मातेचे हे पवित्र कर्तव्य पार पाडण्यासाठीच अर्पण करुन ठेवले आहे. केवळ अशा मातांच्या कडेवरच मानवतेला अशा प्रेमाची व मायेची प्राप्ती होऊ शकते.

## सत्य समजून घ्या

जगातील साऱ्या आनंदाला पारखे व्हावे लागते व त्यापासून वंचित व्हावे लागावे व तिचे व्यक्तीमत्व दबून जावे इतके ओझे स्त्रीच्या शिरावर असता कामा नये. ही गोष्ट आम्हाला मान्य आहे; पण जीवनात मनमानेल तसे करण्याची परवानगी स्त्रियांना तसेच पुरुषांना, कोणालाच दिली गेलेली नाही. आम्ही जीवनांत आपली इच्छाच चालवू शकत नाही व आम्हाला जे आवडले व पसंत असते तेच करु शकत नाही.

## विचार करण्यासारखी गोष्ट

सर्व माणसांनी ही स्वार्थी विचारप्रणाली जर अवलंबली व आपल्या इच्छा वासनांवर कसलेही बंधन घातले नाही तर काय परिणाम होईल याचा थोडासा विचार करा. याचा एक परिणाम असा होईल, की आमच्या स्वार्थप्रियतेची व मार्गभ्रष्टतेची शिक्षा, आमच्या पुढील पिढीला तऱ्हेतऱ्हेच्या यातनांच्या व कष्टाच्या स्वरुपात भोगावी लागेल. एका विशिष्ट काळातील स्त्री भोगविलासात आंधळी झाली होती म्हणून भावी पिढीतील स्त्रियांना कायमच्या दुखात व कष्टात ढकलून द्यावे, ही खुद्द स्त्रियाच्या स्वत:च्या कल्याणाची गोष्ट नाही, हे उघड आहे.

इस्लामने ज्या जीवनपद्धतीची बांधणी केली आहे ती वर्तमान व भावी सर्व मानव पिढ्यांच्या कल्याणासाठी आहे, यात ती कोणाही एका वंशाला दुसऱ्या वंशावर प्राधान्य देण्यास तयार नाही. कारण इस्लामसमीप एक अद्वितीय समानता आहे व सर्ववंश मिळून अस्तित्वात आली आहे. या वैशिष्ट्याचे कारणास्तव इस्लामवर कोणताही आरोप ठेवला जाऊ शकत नाही, हे उघड आहे. होय, जर इस्लाम माणसाच्या स्वाभाविक इच्छा आकांक्षा विरुद्ध असता अगर विनाअपवाद जीवनांतील सर्व आनंद व सुखांना वर्ज्य करून टाकले असते तर ही शंका योग्य ठरली असती, पण तसे नाही हे स्पष्ट आहे.

प्रकरण दहावे

# इस्लाम व लैंगिक समस्या

## पापाची शास्वत कल्पना

पाश्चिमात्य मानसशास्त्रज्ञ धर्मांवर असा आरोप करतात की तो माणसाला आपली जीवनशक्ती ठेचून व दाबून ठेवण्याची शिकवण देतो. सरतेशेवटी त्याला कायमचा पापभावनांच्या अशा दलदलीत झोकून देतो, की त्याला त्याचे प्रत्येक कृत्य पाप असल्यासारखे वाटू लागते. त्याचे प्रायश्चित्त केवळ अशा स्वरुपातच होऊ शकते की त्याने जीवनातील सर्व आनंदाचा व प्रसन्नतेचा त्याग करावा. आपल्या या प्रतिपादनाच्या समर्थनार्थ हे लोक असेही म्हणतात की युरोप जोपर्यंत धर्माच्या पंजात अडकलेला होता, तोपर्यंत त्याला सर्व प्रकारच्या अज्ञानरुपी अंधकाराने वेढले होते. जेंव्हा तो या धर्माच्या जोखडापासून मुक्त झाला तेव्हा दबलेल्या भावना व उर्मी उफाळून आल्या व इच्छा आकांक्षारुपी बगीच्यात वसंत ऋतूचे दृश्य दिसू लागले.

## धर्मांवर शंका

म्हणून हे मानसशास्त्राज्ञ असा प्रश्न विचारतात की तुम्ही पुन्हा आपल्या धर्माकडे वळण्याचा सल्ला देत आहात काय? तुम्ही प्रगतीच्या मार्गात पुन्हा धर्मश्रद्धेचे अडथळे घालू इच्छिता काय? आमच्या होतकरु पिढीला पावलोपावली हटवून व अडवून त्यांचे जिणे दु:सहय करुन सोडावे काय?

पाश्चिमात्यांचे त्यांच्या धर्माबाबत हे असे मत आहे. या समयी आमचा विषय धर्माचे सामान्यरुप नसून केवळ इस्लाम आहे. म्हणून आम्ही त्याच्या या मताची कुचेष्टा करु इच्छित नाही व ते चुकीचे असल्याचेही काही सांगू इच्छित नाही. इस्लाम व लैंगिक संबंधावर चर्चा करण्यापूर्वी व इस्लामचा लैंगिक अतृप्तीचा खरा अर्थ चांगल्या रीतीने समजून घ्यावयास हवा कारण सुशिक्षित व अशिक्षित सर्वच त्याचा चुकीचा अर्थ लावीत असतात व कित्येक परिस्थितीत आपल्या चरितार्थ करतानाही चुका करीत असतात.

## लैंगिक अतृप्तीचा खरा अर्थ

लैंगिक अतृप्ती समागमापासून अलिप्त राहण्याचे नाव नसून ते एक ओंगळ व घाणेरडे कृत्य आहे की कोणताही धर्म अगर शिष्ट माणूस त्यासंबंधी विचार करणेही पसंद करत नाही. या अर्थाने लैंगिक अतृप्ती एक अंत:सज्ञाचे रूप धारण करते व कामक्रीडा पुन्हा पुन्हा करुनही ती समाप्त होत

नसते. म्हणून जी व्यक्ती कामपिपासू असते तिला असहाय्यपणे कामक्रीडेची निकड होऊन बसते. अशा व्यक्तीला ते कृत्य ओंगळ व घाणेरडे जरी वाटत असेल तरी दिवसातून अनेक वेळा त्याने कामक्रीडा केली तरी तो लैंगिक दृष्टीने रोगीच राहील. जेव्हा जेव्हा तो हे कृत्य करील तेव्हा त्याच्या मनात असे द्वंद्व असेल की त्याला करावयाचे होते काय आणि तो करुन बसला काय. या जाणतेपणी अगर अजाणतेपणी होणाऱ्या अस्वस्थपणापासून भिन्न भिन्न मानसशास्त्रीय रोग व गुंतागुंत निर्माण होत असते.

## फ्राइडची साक्ष

लैंगिक अतृप्ती अथवा आत्मसंयमनाची ही व्याख्या लेखकाने आपल्या मनाने केली आहे असे कोणी समजू नये, ते तसे नाही. कारण आत्मसंयमनाची ही व्याख्या व तिचा अर्थ आम्ही सिग्मन फ्राइडकडून घेतला आहे. फ्राइड आयुष्यभर धर्मावर अशी टीका-टोमणे मारीत असे, की धर्म माणसातील लैंगिक शक्ती दडपून टाकतो व त्याला चेतनाहीन व गतिहीन करुन टाकतो. म्हणून आपल्या 'दी कंट्रीब्यूशन ऑफ सेक्शुल थिअरी' या पुस्तकात (पृष्ठ ८२) तो असे लिहितो की आत्मसंयमन व समागमाचे पथ्य ज्याला या क्रियेतील तात्पुरता अवरोध म्हणता येईल, या दोहोंत फरक करणे आवश्यक आहे.

## इस्लामचा दृष्टिकोन

लैंगिक अतृप्ती कामवासनेला ओंगळ व घाणेरडे समजण्याचा परिणाम आहे ज्याचा समागमेच्छेला तात्पुरता अवरोध करण्याशी कसलाही संबंध नाही, ही गोष्ट समजल्यानंतर या बाबतच्या दृष्टिकोनाचा आढावा घेऊ या.

इस्लाम प्रकृती व निसर्ग यांचा स्वीकार करतो.

इस्लामने माणसाच्या नैसर्गिक व प्राकृतिक भावनांना निकोप व पवित्र ठरविण्यात जे औदार्य सिद्ध करुन दाखविले आहे तसे जगातील अन्य कोणत्याही धर्माने केले नाही. कुरआनमध्ये असे सांगितले गेले आहे,

"माणसासाठी इच्छाआकांक्षा, स्त्रिया, संतती, चांदी-सोन्याच्या राशी, निवडक घोडे, जनावरे व शेतजमीन अतिशय आवडती केली गेली आहेत." (कुरआन ३:१४)

ही आयत माणसांच्या आवडत्या वस्तूंचा उल्लेख करून त्यातील वास्तवता मान्य करते. त्या वस्तू माणसांना का प्रिय वाटतात अशी शंका आयतीत उपस्थित केली गेली नाही तसेच त्यांच्या आसक्तीबद्दल मानवभावनेची हेटाळणीही केली गेली नाही.

## इच्छा वासनांच्या दास्यत्वाचा धिक्कार

इस्लाम इच्छा वासनांच्या दास्यत्वाला चांगल्या दृष्टीने पाहत नाही, ही गोष्ट खरी आहे; तसेच माणसाने त्या बाबतीत अतिरेक करणेही त्याला पसंद नाही. कारण तसे घडले तर संपूर्ण जीवनव्यवस्थाच उध्वस्त होऊन जाईल, मानवतेचा दृष्टिकोन सतत उन्नतीचा व जनहिताचाच असतो. पण मानसावर स्वैर इच्छावासनांचा अमल असतो तोपर्यंत त्याची प्राप्ती होऊ शकत नाही. कारण ती माणुसकीच्या शक्तीचे झरेच आटवून टाकते व माणसाला पशूपेक्षा हीन दर्जावर नेऊन सोडते.

## आत्मसंयमन व लैंगिक अतृप्ती मधील फरक

माणूस इतका हीन होऊन पाशवी प्रवृत्तीला बळी पडावा हे इस्लामला आवडत नाही व तसे तो इच्छित नाही. पण या महान उद्देशात व त्या अनभिज्ञ लैंगिक अतृप्तीत तसेच आत्मसंयमनात जमीन अस्मानाचे अंतर आहे. कारण त्यामध्ये लैंगिक गरज व त्यापासून निर्माण होणाऱ्या विकार वासनांना ओंगळ व नकोसे स्वरुप देऊन त्यांच्याकरिता संस्कारगत पावित्र्य व आध्यात्मिक उच्चता यांचा बळी दिला जातो.

## सामाजिक कल्याण व भावना

माणसाच्या आत्म्याच्या पावित्र्याबद्दल व निर्मलपणाबद्दल चर्चा करताना तत्त्व म्हणून, इस्लाम माणसाच्या सर्व नैसर्गिक भावना मान्य करतो. तो नकळत त्यांच्या नरडीला नख लावीत नाही. उलट व्यवहारी जीवनात त्या पूर्णपणे प्रकट होण्यास पुरेपूर अवसर देतो, जेणेकरून एका मर्यादेपर्यंत त्यापासून आनंद उपभोगता येऊ शकेल. परंतु त्याच्यापासून व्यक्तीला अगर समाजाला कोणतेही दु:ख व त्रास होऊ नये. आपल्या इच्छा-आकांक्षांच्याच मागे जी व्यक्ती सतत लागलेली असते त्याची योग्यता व क्षमता अकाली नष्ट होते. मोहमयी इच्छा-आकांक्षाच्या जाळ्यात गुरफटून जाऊन तो निरुपयोगी बनतो व आपल्या इच्छावासनापलीकडे तो कशाचाही विचार करु शकत नाही.

जेव्हा एखाद्या समाजात माणसांची सर्व शक्ती व त्याची सर्व क्षमता भौतिक भोगविलास प्राप्त करण्यातच खर्च होते, तेव्हा त्या समाजाची हानी होत असते. कारण अल्लाहने केलेल्या नियमानुसार आपली शक्ती जीवनातील विविध अंगांची रचना व सजावट करण्याऐवजी, त्याचा विरोध करुन आपली सर्व शक्ती जीवनातील क्षुल्लक व तुच्छ गोष्टीवरच खर्च करुन संपवितात. त्याच्या परिणाम स्वरुप कौटुंबिक संबंध नष्ट व नाश पाऊन सामाजिक जीवन अस्ताव्यस्त होऊन कोलमडून पडते. मग समाजाची जी अवस्था निर्माण होते त्याचा कुरआन मध्ये असा उल्लेख आहे,

"तू त्यांना एक (तुम्हात मिसळलेले) मानतो, परंतु त्यांची मने इत:स्तत: विखुरलेली आहेत." (कुरआन ५९:१४)

इतरांना अशा राष्ट्रावर चढाई करुन व त्यास नष्ट करुन टाकण्याची हीच संधी मिळत असते, ही गोष्ट आधुनिक फ्रान्सच्या उदाहरणाने चांगल्या रितीने स्पष्ट होते.

इस्लाम माणसाला जीवनातील आनंदापासून वंचित करीत नाही.

इस्लाम काही व्यक्तींवर बंधने केवळ एवढ्याकरिता घालतो, की त्याने आपल्या स्वातंत्र्याचा दुरुपयोग करुन स्वत:चे, आपल्या कुटुंबाचे अगर समाजाचे काहीही नुकसान अगर हानी न करता, स्वत:च्या जीवनातील आनंद मनसोक्त लुटावा. उलट इस्लामने स्पष्ट शब्दांत खालील आयतीत असे सांगितले आहे,

"हे मुहम्मद (स) त्यांना सांगा अल्लाहच्या आवडत्या व आकर्षक गोष्टी ज्यांना अल्लाहने आपल्या दासांकरिता उत्पन्न केल्या होत्या, त्यांना निषिद्ध कोणी केले, व अल्लाहच्या पवित्र वस्तूंना कोणी वर्ज्य केले." (७:३२)

"व जगातील तुझा वाटा विसरु नकोस." (२८:७७)

"आम्ही तुम्हाला दिलेल्या त्या निर्मळ वस्तुंचेच भक्षण करा." (७:१६०)

"खा, प्या व मर्यादेचे उल्लंघन करु नका." (७:३१)

## कामवासनेचे महत्त्व

इस्लाम कामवासनेचे महत्त्व उघड व स्पष्ट शब्दांत स्वीकारतो. इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांनी आपल्या शुभमुखाने म्हटले,

"तुमच्या या जगात मला सुगंध व स्त्री सर्वांत अधिक प्रिय आहे व नमाजमुळे माझ्या नेत्रांना शीतलपणा प्राप्त होतो." (तफसीर इब्ने कसीर)

या हदीसमध्ये स्त्रीची तुलना जगातील सर्वोत्कृष्ठ सुगंधाशी केली असून तसे स्थान स्त्रीला दिले गेले आहे. त्याचबरोबर नमाजचा उल्लेख ईश्वराचे सान्निध्य प्राप्त करण्याचे प्रमुख साधन म्हणून केला गेला आहे.

आणखी एकेसमयी जेव्हा इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांनी सांगितले की माणसाला आपल्या पत्नीजवळ गेल्यानेही पुण्य लाभते, तेव्हा लोकांनी आश्चर्याने विचारले 'माणसाला आपली कामवासना शमविण्यातही पुण्यप्राप्ती आहे काय?' त्यावर त्यांनी उत्तर दिले, 'माणसाने आपली कामवासना निषिद्ध केल्या गेलेल्या वाममार्गाने शमविली तर तो गुन्हेगार होत नाही काय? म्हणून तो उचित मार्गाने जेव्हा आपली कामवासना शमवितो, तेंव्हा त्याला पुण्य लाभते.' (मुस्लिम)

तात्पर्य असे की इस्लामी व्यवस्थेत कोणाही माणसाची कामेच्छा अतृप्त राहू शकत नाही. नवतारुण्यात माणसाला तीव्र कामेच्छा असते त्यात गैर काही नाही व त्याने ती दडपून किंवा नष्ट करून ठेवण्याचा प्रयत्न करावा, अशीही गरज नाही.

## तरुणांना इस्लामची मागणी

इस्लाम तरुणांशी केवळ एकच अशी मागणी करतो, की त्यांनी आपल्या कामवासनेच्या नरडीला नख लावण्याऐवजी आत्मसंयमनाने तिचे नियमन करावे व आपल्या इच्छाशक्तीने व निश्चयाच्या बलाने तिला काबूत ठेवावे. दुसऱ्या शब्दांत सांगायचे तर आपली कामेच्छा नष्ट करण्याऐवजी अगर दाबून ठेवण्याऐवजी तिच्या तृप्तीची उचित संधी मिळेपर्यत ती तहकूब ठेवावी. अशा तऱ्हेच्या तात्पुरत्या तहकुबीला फ्राइडसुद्धा काम अतृप्तीचा पर्याय मानत नाही. अशा तऱ्हेने शरीरावर कसलाही हानिकारक परिणाम होत नाही व काम अतृप्तीच्या कारणाने ज्या प्रकारच्या मानसशास्त्रीय गुंतागुंत व पेच निर्माण होऊ शकतात तशी गुंतागुंतही निर्माण होत नाही.

## आत्मसंयमनाचा वास्तविक उद्देश

आत्मसंयमनाची ही मागणी कोणताही आदेश नसून त्याच्या पाठीमागे एक मोठा हितकर सल्ला कार्यांन्वित आहे. त्याचा मानव जीवनातील आनंदापासून माणसाला वंचित करण्याचा नसून, उलट त्यांना योग्य तऱ्हेने जीवन व्यतीत करण्यायोग्य बनवण्याचा आहे. ज्या राष्ट्रातील लोक आपल्या इच्छा-आकांक्षा काबूत ठेवू शकत नाहीत व निकड भासल्यावरही आपल्या मनोविकारापासून वंचित होणे पसंत करु शकत नाहीत, त्या राष्ट्राला आपले नेतृत्व गमवावे लागते. या गोष्टीला इतिहास साक्ष आहे. त्याचप्रमाणे आंतरराष्ट्रीय ओढाताणीतसुद्धा यश त्याच राष्ट्राच्या वाट्यास येते ज्यातील लोक संकटे व अडचणी सहन करण्याची क्षमता बाळगतात आणि वेळ पडल्यास आपल्या इच्छाआकांक्षापासून व आपल्या आवडत्या वस्तूपासून विरक्ती दर्शवू शकतात. इस्लाममध्ये रोजे (उपवास) चा मूळ हेतूही तोच आहे.

## उडाणटप्पूपणाचे चाहते व इस्लाम

काही मोकळ्या विचाराचे स्त्री पुरुष रोजावर (उपवासावर) आपली अक्कल उलगडीत आहेत. ते म्हणतात, ''रोजा ! छे ते एक ढोंग आहे. कसल्यातरी निरर्थक आदेशासाठी जेव्हा अशा आदेशांचा बुद्धीशी संबंध नाही व त्यावर आचरण व पालन करुन कसलाही लाभप्रद उद्देश प्राप्त होऊ शकत नाही, अशासाठी माणसाला भुकेलेला व तहानलेला राखण्याचे प्रयोजन तरी काय आहे.''

स्वच्छंद विचार असणाऱ्या या महाशयांना आम्ही फक्त एवढेच सांगू इच्छितो की, जे लोक एखाद्या श्रेष्ठ उद्दिष्टांसाठी, काही तासापुरते आपल्या इच्छारुपी बेफाम अश्वाला लगाम घालू शकत नाहीत, ती काय माणसे आहेत? इच्छाआकांक्षाचे हे भक्त मानवतेची कसलीही सेवा कधीच करु शकत नाहीत. आपल्या आवडत्या वस्तूचा त्याग करण्याचे साहस जो बाळगत नाही तो सत्याच्या बाजूने असल्याशी झगडण्यासाठी धैर्य व निश्चय कधीतरी दाखवू शकतात काय?

## कम्युनिस्टाची विलक्षण गोष्ट

रशियन कम्युनिस्टांमध्ये आपला उद्देश साध्य करण्यासाठी कष्ट व संकट सहन करणाऱ्या शक्तीचा अभाव असता तर ते स्टालिनग्राडचा लढा पाय रोवून भक्कमपणाने देऊच शकले नसते; पण इस्लामी संस्काराची टिंगल व टवाळी ते करीत असतात. कम्युनिजमचे ध्वजधारक राज्याच्या म्हणजे त्याच्या प्रत्यक्ष शासनशक्तीकरिता तर ते सतत आत्मनिग्रह करण्यास तत्पर व कटिबद्ध असतात; पण जेव्हा राज्याला तसेच सर्व प्राण्यांना व माणसांना निर्माण करणाऱ्या अल्लाहच्या नावावर ते मांगितले गेले तर भुवया वर चढवतात व ते मोठा कल्लोळ व आरडाओरडा सुरु करतात.

## दया व क्षमा यांचा धर्म

धर्म आपल्या अनुयायांच्या डोक्यात ते जन्मजात पापी असल्याचे भरवून ठेवून त्यांचे जीवन कडवट करुन टाकतो. पापाचा विचार भुतासारखा माणसाच्या मानगुटीवर सतत बसतो, असे ही म्हटले जाते. काही धर्मांच्या बाबतीत ते खरे असणे शक्य आहे; पण इस्लाम तर त्याहून अगदी वेगळा आहे. कारण इस्लाम शिक्षा व नरकाग्नीपेक्षा दया व क्षमा यावर कितीतरी अधिक भर देणारा धर्म आहे.

## पापाची खरी कल्पना

इस्लामनुसार पाप हे सदैव माणसाच्या डोक्यावर धिरट्या घालीत असणारे एखादे भूत नाही. तसेच आयुष्यभर माणूस ज्यात चाचपडत, ठेचकाळात भटकत राहावा व त्यातून बाहेर पडण्यास मार्गच सापडू नये असा घोर अंधकार वा गर्द छायाही नाही. आदरणीय आदम (अ) यांचे पाय जे डळमळले, ती गोष्ट टांगत्या तलवारीसारखी सतत मानवतेच्या डोक्यावर टांगलेली आहे आणि तिच्यापासून मुक्त होण्यासाठी आम्ही एखादे प्रायश्चित्त करावे अशी काही आवश्यकता नाही.

"त्यावेळी आदम (अ) यांनी आपल्या पालनकर्त्यांकडून काही वचने शिकून क्षमायाचना केली, जिचा त्याच्या पालनकर्त्याचे स्वीकार केला." (२:३७)

अर्थात आदम (अ) यांना आपल्या अपराधाची क्षमायाचना करण्यासाठी सोपस्करांच्या व विधीरुढींच्या दीर्घ व कठीण मार्गाने जावे लागले नाही. इकडे त्यांनी अंत:करणापासून क्षमायाचना भाकली व तिकडे अल्लाहच्या दरबारात तिचा स्वीकार झाला.

## अल्लाहची कृपा व आदमची संतती

आपल्या आजोबाप्रमाणेच आदमच्या संततीवरही अल्लाहची कृपा आहे. आपल्या अपराधानंतरही आदरणीय आदम (अ) जसे अल्लाहच्या कृपेपासून वंचित झाले नाहीत तसेच त्यांची संतती ही गुन्हा व पाप घडल्याकारणाने अल्लाहच्या कृपेपासून वंचित होत नाही. कारण अल्लाह मानवी स्वभावधर्मातील कमकुवतपणा व त्याच्या मर्यादा चांगल्या रीतीने जाणतो व जेवढा भार ते पेलू शकतात तेवढाच भार त्यांच्यावर टाकतो -

"अल्लाह कोणत्याही प्राण्यावर त्याच्या कुवतीपेक्षा जास्त जबाबदारीचे ओझे लादत नाही." (कुरआन, २:२८६)

सर्व मानव (आदम (अ) ची संतती) अपराधास व चुकास पात्र आहेत व जे आपल्या अपराधासाठी (लज्जित होऊन) क्षमा याचना करतात, ते लोक अपराध्यांमध्ये महान आहेत.' (तिर्मिजी)

## अल्लाहच्या कृपेची व्यापकता

अल्लाहच्या दयेक्षमेबाबत तर कुरआनमध्ये अनेक आयती आहेत, पण आम्ही येथे एकच उदाहरण देतो

"तुमच्या पालनकर्त्यांची क्षमा व स्वर्गाकडे नेणाऱ्या मार्गाने दौडत चला व स्वर्ग, जमीन व आकाशाप्रमाणे विशाल असून ते अशा संयमी जनांसाठी निर्माण केलेले आहे जे, सुस्थितीत तसेच कुस्थितीत संपत्ती खर्च करतात जे क्रोधाला जाळून टाकतात व इतरांच्या चुकांची क्षमा करतात. असे भले व सज्जन ईश्वराला अतिप्रिय असतात. त्यांची अवस्था अशी असते की एखादे कुकर्म त्यांच्या हातून घडते, अगर एखादे पाप करुन स्वत:वर ते अत्याचार करुन बसतात, तेव्हा तात्काळ त्यांना अल्लाहचे स्मरण होते व आपल्या अपराधाबद्दल त्याची क्षमायाचना भाकू लागतात. कारण अल्लाहखेरीज अपराधाची क्षमा कोण करू शकतो व ते हेतुपुरस्सर आपल्या अपराधाचे समर्थन करीत नाहीत. अशा लोकांना त्यांचा पालनकर्ता क्षमा करून, त्यांच्या क्षमायाचनेचा मोबदला देईल व त्यांना स्वर्गांच्या अशा उद्यानात दाखल करील तेथे खालून पाण्याचे कालवे वाहात असतील व तेथे ते चिरकाल राहातील. सद्वर्तन करण्यासाठी किती छान मोबदला आहे." (३:१३३-१३६)

अल्लाहची कृपा किती व्यापक आहे, हे यावरून स्पष्ट होते. तो आपल्या दासांची क्षमायाचना स्वीकारतो एवढेच नाही तर त्या पापाच्या घाणीतून वर काढून व त्याला निर्मळ व शुचिर्भूत बनवून, आपल्या वेचक दासांच्या समूहात त्याचा समावेश करून टाकतो.

## अल्लाहच्या कृपेचा एक आश्चर्यजनक पैलू

अशा कृपाळू व मेहेरबान अल्लाहच्या दये व क्षमेबाबत थोडासुद्धा संशय उरतो काय? अल्लाहच्या कृपेच्या अशा व्यापक धारणेमुळे आध्यात्मिक कष्ट व अस्वस्थपणा नष्ट होऊन जातो. तो माणसाला दाखवून देतो की तो आजन्म अपराधी नाही. तसेच त्याच्या पालनकर्त्याची कृपाही त्याच्या अवस्थेबद्दल गाफील नाही. उलट तो जेंव्हा पापाकरिता त्याची अंत:करणपूर्वक क्षमायाचना भाकतो तेव्हा तो त्याला आपल्या आश्रयस्थानात घेतो. त्याकरिता खरोखरीने व निष्ठेने लज्जित व खजील होण्याखेरीज दुसरी कसलीही अट नाही. ही गोष्ट इतकी स्पष्ट आहे की तिचे समर्थनार्थ आणखी अधिक पुरावे देण्याची गरज नाही, तरी इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांच्या या अनुपम वचनावर एक दृष्टिक्षेप टाकू या. मुस्लिमनुसार त्यांनी असे सांगितले,

"ज्याच्या ताब्यात माझा प्राण आहे त्या शक्तिची शपथ, जर तुम्ही कसलेही पाप केले नसते, तर अल्लाहने तुम्हाला नष्ट करुन तुमचे जागी अशा लोकांना निर्माण केले असते, जे पापे करुन त्याची क्षमायाचना भाकीत आहेत व त्याने त्यांना क्षमा केली असती." (मुस्लिम)

असे समजा की, माणसांच्या चुकांकडे डोळेझाक करुन त्यांना क्षमा करणे हाच जणू अल्लाहचा मानस आहे, कुरआनची ही शानदार आयतही हीच गोष्ट उघड करते,

"जर तुम्ही कृतज्ञ भक्त होऊन श्रद्धेच्या मार्गाने गेलात तर शेवटी तुम्हाला अकारण शिक्षा करण्यात अल्लाहला काय स्वारस्य आहे. अल्लाह मोठा गुणग्राही आहे व सर्वांची अवस्था चांगल्या तऱ्हेने जाणतो." (कुरआन ४:१४७८)

नि:संशय अल्लाह माणसाला कष्टात खितपत असलेला पाहू इच्छित नाही. उलट त्याला आपली कृपा व क्षमा प्रदान करतो.

प्रकरण अकरावे

# इस्लाम व विचारस्वातंत्र्य

चर्चा करताना एक सज्जन उद्‌गारले, 'तुम्ही अतिसंकुचित दृष्टीचे व जुन्या चाकोरीतून जाणारे आहात.

'का?' मी विचारले.

'तुम्ही ईश्वराचे अस्तित्वावर ईमान (विश्वास) बाळगता काय?'

'निश्चितपणे.'

'त्याची उपासना करता व रोजे (उपवास) करता काय?'

'अगदी खरे.'

'छान! मग माझे म्हणणे बरोबर आहे. तुम्ही संकुचित दृष्टीचे व जुन्या चाकोरीतून जाणारें आहात.'

त्यावर मी विचारले, 'आम्ही संकुचित दृष्टीचे असून जुन्या चाकोरीतून जाणारे आहोत. हे तुम्ही कशावरुन म्हणू शकता?'

'कारण ज्या गोष्टींवर तुम्ही श्रद्धा ठेवता त्या सर्वच्या सर्व अगदी निरर्थक बडबड व निराधार गोष्टी आहेत, त्यांना कसलीही वास्तवता व अस्तित्व नाही.'

मी विचारले, 'तुम्ही कोणत्या गोष्टीवर ईमान (श्रद्धा) बाळगता?'

'ही सृष्टी कोणी निर्माण केली आणि जीव व अस्तित्व कोणी प्रदान केले?'

'निसर्गाने.'

'पण निसर्ग म्हणजे काय?'

'ती प्रकृतीची दडलेली व अमर्याद अशी शक्ती आहे, जिचे ज्ञान आम्हाला ज्ञानेंद्रियामार्फत होते.'

यावर मी म्हटले, 'तुम्ही मला अदृष्य शक्ती (ईश्वर) च्या आदेशाधीन होण्यापासून अडवून, मला त्यासदृष्य एका अनभिज्ञ व रहस्यमय शक्ती (प्रकृती) ची आज्ञापालन करणारा बनवू इच्छिता काय? पण प्रश्न असा आहे की ज्यामध्ये मला सर्व प्रकारचे मानसिक व शारीरिक सुख व समाधान तसेच शांती लाभते, त्याला सोडून शेवटी मी या तुमच्या खोट्या उपास्याकडे-प्रकृतीकडे कशाकरिता शरण जाऊ? ती माझी कोणतीही गरज भागवू शकत नाही की माझ्या इच्छा आकांक्षा पुऱ्या करण्याची तिच्यांत ताकद नाही?'

### विचारस्वातंत्र्याचा प्रगतिवादी अर्थ

या संक्षिप्त संभाषणातून विचारस्वातंत्र्याचे प्रतिपादन करणाऱ्या प्रगतिवाद्यांच्या बुद्धीचा अंदाज सहज केला जाऊ शकतो. त्यांच्या विचार स्वातंत्र्याचा अर्थ असा की इस्लामने आपल्या वास्तविक उपास्यापासून तोंड फिरवावे, पण हा नास्तिपणा असून त्याला विचारस्वातंत्र्य हे नाव कदापिही दिले जाऊ शकत नाही. जे विचारस्वातंत्र्य माणसाला नास्तिकपणाच्या ओटीत टाकते. तसले विचारस्वातंत्र्य, इस्लाम माणसांना देत नाही, असा हे लोक इस्लामवर आरोप करतात. पण प्रश्न असा आहे की विचारस्वातंत्र्य व निरीश्वरवाद वा नास्तिकपणा या दोहोंचा अर्थ एक आहे काय?

### प्रगतिवाद्याची खरी चूक

युरोपच्या स्वातंत्र्य चळवळीचा अभ्यास करताना हे सत्य ते विसरतात की युरोपातील काही परिस्थितीच्या कारणास्तव तेथे जर निरीश्वरवादाची वाढ झाली असली तरी त्यावरुन जगात सर्वत्र तशीच परिस्थिती असेल व त्याचप्रमाणे निरीश्वर्वाद व नास्तिकपणा वाढेल, असे हे लोक समजतात हीच खरी चूक आहे.

### युरोपवासी लोक धर्मविन्मुख असण्याचे कारण

युरोपवासी लोकांसमोर चर्चने ख्रिश्चन धर्माचे जे विचार मांडले, वैज्ञानिक तथ्यांना खोटे ठरविण्याचा जो प्रयत्न केला व विज्ञान शास्त्राचा जो छळ केला; तसेच खोट्या व अंधविश्वासरुपी अंधकाराला ईशधर्म म्हणून जे नाव दिले, या सर्व गोष्टीचा एकंदर परिणाम असा झाला की स्वतंत्र विचारांचे युरोपतील विचारवंत निरीश्वरवादाच्या ओढ्यात जाऊन पडले. कारण त्यांच्या पुढे परस्परांविरुद्ध असलेले जे दोन दृष्टिकोन होते. त्यापैकी एकाचा स्वीकार करण्याखेरीज त्यांना कसलाही मार्ग उरला नव्हता. म्हणून त्यांनी ईश्वरावरील स्वाभाविक श्रद्धेच्या मार्गांचा त्याग करून विज्ञान आणि त्याने दिलेल्या गोष्टीवर श्रद्धा व विश्वास ठेवला. चर्चने युरोपला ज्या द्विधा अवस्थेत आणून सोडले होते त्यापासून काही अंशी सुटका करून घेण्याचा केवळ हाच मार्ग तेथील विचारवंताना दिसला. सारांश असा की चर्चच्या वर्चस्वापासून बाजूला झाल्याची घोषणा उघडपणे करताना त्यांनी म्हटले की, 'ज्याच्या नावाने तुम्ही आम्हाला दास बनवून ठेऊ इच्छिता अशा ईश्वरापासून आम्ही दूर राहतो. आमच्यावर असह्य कर्तव्यांचे डोंगर लादता व आमची तडकाफडकी मुस्कटदाबी करुन दडपून ठेवता. तुमच्या या ईश्वरावर श्रद्धा ठेवण्याचा अर्थ असा होतो, की आम्ही जगाचा परित्याग करुन अरण्यात निर्जन ठिकाणी वास्तव्य करावे. आम्हाला असा ईश्वर व असे निवासस्थान नको आहे. त्याऐवजी आता आम्ही आमच्याकरिता एक नवीन ईश्वर बनवू, त्यात तुमच्या ईश्वराचे सर्व गुण असतील तरीही त्याच्याकडे आम्हाला गुलाम बनवून ठेवण्यासाठी, चर्चप्रमाणे कोणतीही व्यवस्था नसेल. तसेच तो आमच्यावर कोणतीही नैतिक, आध्यात्मिक व भौतिक बंधने घालणार नाही, जी तुमच्या ईश्वराची ठळक वैशिष्ट्ये आहेत.'

## इस्लाम एक सरळ व खरा धर्म

युरोपमध्ये धर्माविरुद्ध जी प्रतिक्रिया झाली ती वास्तविकपणे तेथील चर्चच्या व्यवस्थेतील दोषांचे स्वाभाविक फळ होते, हे यावरुन स्पष्ट होते. इस्लाममध्ये अशा तऱ्हेची कोणतीही व्यवस्था नाही, तसेच त्यात ख्रिश्चन धर्माप्रमाणे कसलेही कूट प्रश्न नाहीत ज्यायोगे माणसांत धर्मविन्मुखतेची भावना निर्माण होऊन त्यांचा कल निरिश्वरवादाकडे झुकतो. इस्लाममध्ये कसलेही चर्च आढळत नाही. केवळ अल्लाह आहे जो समस्त जिवांचा व सृष्टीचा एकमेव निर्माता आहे. मृत्यूनंतर सर्व लोक त्याच्याच समोर हजर केले जातात. ही इतकी स्पष्ट व उघड श्रद्धा आहे की निसर्गवादी व नास्तिक मंडळींनी ती आहे असे सिद्ध करण्याचे ठरविले तरी विनासायास (व प्रामाणिकपणे) तसे सिद्ध करु शकत नाहीत.

## धर्माच्या मक्तेदारीचा शेवट

इस्लाममध्ये ख्रिश्चन धर्मगुरुंच्या वर्गांप्रमाणे एखादा वर्ग आढळत नाही. तसेच धर्मावर कोणाही एका व्यक्तीचे अगर समूहाचे प्रभुत्व अथवा एकाधिकार नसतो. उलट ती सर्व मानवाची सार्वजनिक संपत्ती असून प्रत्येकास आपल्या प्राकृतिक, आध्यात्मिक व मानसिक कुवतीनुसार त्यापासून लाभ घेण्याचा समान हक्क असतो. इस्लामच्या दृष्टीने सर्व मानव एकमेकासमान आहेत. त्यांच्यात जो काही फरक आहे तो त्यांच्या कर्मानुसार वा कृत्यानुसार आहे. जे संयम करणारे असतात तेच आदरास प्राप्त आहेत मग व्यवसायाने ते इंजिनीयर असोत की प्राध्यापक असोत तसेच साधा मजूर असो की कारागीर. धर्म या विविध व्यवसायापैकी एक व्यवसाय नाही, की व्यावसायिक धार्मिक व्यक्तींच्या (ख्रिश्चन धर्मगुरुप्रमाणे) एखाद्या वर्गाला इस्लाम असे म्हटले जाऊ शकत नाही. इस्लामी उपासना करण्यास कोणत्याही ख्रिश्चन धर्मगुरूसारखी आवश्यकता नसते, त्याचे हेच कारण आहे. समाजात सामाजिक नियमांचे व तत्त्वांचे तज्ञ असण्याची गरज असते. इस्लामी धर्मशास्त्राचा तसेच इस्लामी कायदातज्ञांचा दर्जा इतर देशांत तशा तज्ञांचा सामान्यत जसा दर्जा असतो तसाच येथेही असतो. इतरांच्या तुलनेत त्यांना कसलेही प्राधान्य नसते व काही विशेष सवलती अगर संरक्षणही नसते. कायदातज्ञाच्या रुपाने ते राज्याचे सल्लागार म्हणून काम करतात. उदाहरण द्यायचे झाले तर जामिया अजहर एक धार्मिक संस्था आहे. परंतु युरोपियन चर्चप्रमाणे तिला विरोधकांना जिवंत जाळण्याचा अधिकार नाही किंवा त्यांचा निर्घृणपणे छळ करून त्यांना नष्ट करून टाकण्याचाही अधिकार नाही. लोकांचे धार्मिक विचार व दृष्टिकोन टीकात्मक कसोटीवर घासून परखून, त्यात जी कमतरता आढळली तिचे तार्किक स्पष्टीकरण व विश्लेषण करणे, एवढे तिचे काम आहे. दुसरीकडे हाच अधिकार व्यक्तींनाही प्राप्त आहे. तेही जामिया अजहरच्या धार्मिक दृष्टिकोनावर व तत्त्वांवर तार्किक चर्चा करुन तिच्या चुका दाखवू शकतात. कारण इस्लामवर कोणाही व्यक्तीचा अगर वर्गांचा एकाधिकार नसून ज्यांना धर्माचे

संपूर्ण ज्ञान प्राप्त आहे व जे जीवनातील व्यवहारी समस्या सोडविण्यासाठी आपली आवडनिवड बाजूला ठेवून नि:पक्षपातीपणाने धार्मिक दृष्टिकोन व्यक्त करु शकतात, अशाच व्यक्तींना धर्माच्या संबंधात अधिकार प्राप्त असतो.

## इस्लामी व्यवस्थेचा वास्तविक अर्थ

इस्लामी व्यवस्थेत उलेमांना म्हणजे इस्लामी कायदेतज्ञांना प्रभुत्व असेल व ते सर्व उच्च पदावर आरुढ असतील असा इस्लामी व्यवस्थेचा अर्थ कदापिही नाही. इस्लामी व्यवस्था स्थापन झाल्याने जो मुख्य बदल निर्माण होतो तो केवळ इतकाच की इस्लामी शरिअत अथवा ईश्वरी कायद्याच्या मूळ पायावरच शासन पद्धत उभारलेली असते. याखेरीज अन्य कसलाही बदल होत नाही. इंजिनीयर व डॉक्टर आपले काम पुरेपूर रीतीने करीत असतात. तसेच अर्थशास्त्रज्ञही आपल्या क्षेत्रात क्रियाशील असतात. होय एक फरक नक्कीच होतो, तो म्हणजे त्याच्या आर्थिक उलाढालींच्या मर्यादा, इस्लामी अर्थपद्धतीच्या प्रकाशात ठरविल्या जातात व त्याच्याच सहाय्याने ते आपल्या आर्थिक नीतीच्या रुपरेषा आखत असतात.

## इस्लामी श्रद्धा व विज्ञान

इतिहास या गोष्टीस साक्ष आहे की इस्लामी श्रद्धा व इस्लामी राज्य आणि विज्ञान व त्याचे सिद्धान्त लागू करण्याच्या बाबतीत कधीही टक्कर अथवा झुंज झाली नाही. इस्लामी इतिहासात, कोणाही विज्ञानशास्त्राला एखाद्या संशोधनाकरिता कधीही जिवंत जाळले गेले नाही व कोणालाही अशा अपराधाखातर कठोर यातना दिल्या गेल्या नाहीत. विज्ञान व इस्लामच्या या मूलभूत श्रद्धेच्या दरम्यान या संपूर्ण सृष्टीचा निर्माता केवळ एक ईश्वर आहे ही गोष्ट खोटी नाही. म्हणूनच इस्लाम मानवाला आकाश (अंतरिक्ष) व जमीन याचे अवलोकन व अभ्यास करण्याचे पुन्हा पुन्हा आवाहन करतो जेणेकरुन आपल्याला सान्निध्य मिळवावे. या सृष्टीनिरीक्षणामुळेच पश्चिमेतील अनेक असे वैज्ञानिक जे सुरुवातीला ईश्वराचे अस्तित्व मानत नव्हते आता ईश्वराचे अस्तित्व मान्य करतात.

## निरीश्वरवादाचे आंधळे प्रचारक

आपल्या अनुयायांना निरीश्वरवादाकडे झुकण्यास भाग पाडणारी युरोपियन चर्चप्रमाणे कोणतीही व्यवस्था इस्लामध्ये नाही, हे आम्ही वर सांगितलेलेच आहे. असे असतानाही काही लोक जेव्हा इस्लामी देशात निरीश्वरवादाचा प्रचार करताना दिसतात, तेव्हा आमच्या मनात असा प्रश्न उभा राहतो की, शेवटी या लोकांना हवे तरी काय? हे लोक खरे तर आपल्या भूतपूर्व वसाहतवादी धन्याचे अंधानुकरण करणारे लोक आहेत. असे अंधानुकरण करताना धर्मावर व धार्मिक उपासनांवर उलटसुलट टीका-टिपणी करण्याचे व मुस्लिमांना धर्मविन्मुख बनविण्याचे उघड स्वातंत्र्य दिले जावे, असे त्यांना हवे आहे. यालाच ते विचारस्वातंत्र्य असे गोंडस नाव देतात.

याचकरिता तर युरोपवासियांनी आपल्या धर्माविरुद्ध लढा दिला होता की त्यांना धर्माच्या दडपणापासून व त्याने पसरविलेल्या अंधविश्वासातून त्यांची सुटका व्हावी व त्यांना खऱ्या अर्थाने वैचारिक स्वातंत्र्य प्राप्त व्हावे. अशा रितीने ते लोक आपल्या कार्यांत काही अंशी बाजूला होते व तसे करण्यास विवश होते. इस्लाममध्ये चर्चप्रमाणे दडपशाही करणारी यंत्रणा नाही, तसेच अंधविश्वासालाही वाव नाही. पुढे जाऊन तर तो माणसाला अशी सर्व स्वातंत्र्ये देतो जी त्याच्यासाठी आवश्यक आहेत. ज्याच्या नावाने आमचे हे तथाकथित प्रगतिवादी इतका आरडाओरडा करताना दिसतात, शेवटी याचे कारण तरी काय? इस्लामवर हे लोक इतके रुष्ट का झाले आहेत?

## विचारस्वातंत्र्याची घोषणा कशासाठी?

विचारस्वातंत्र्याचा ध्वज धारण करणाऱ्या या कथित लोकांना, कसलेही विशेष स्वारस्य नाही, हीच गोष्ट सत्य आहे. त्याच्या आडून समाजात नैतिक अध:पतन घडवून आणून स्वैर लैंगिक अराजकतेचा रोग लावणे हा त्यांचा वास्तविक उद्देश आहे. आपले घृणास्पद उद्दिष्ट झाकण्यासाठीच ते आपल्या विचार स्वातंत्र्याची घोषणा जोरजोरात देत असतात. धर्म व नीती यांच्या विरुद्ध या लोकांनी जो घृणास्पद लढा सुरू केला आहे त्यामध्ये विचारस्वातंत्र्याच्या घोषणेचा हेतू केवळ इतरांची फसगत करण्याचा आहे. इस्लाम मानवाच्या विचारावर बंधने घालतो म्हणून हे लोक इस्लामचा विरोध करीत आहेत असे नाही. धर्म मानवजातीला खालच्या दर्जाच्या व नीच विकारवादापासून व विचारांच्या दास्यत्वातून मुक्त करु इच्छितो. हीच गोष्ट या उनाड प्रवृत्तीच्या प्रेमिकांना पसंत नाही व तेच त्यांच्या धर्मविरोधाचे मूळ कारण आहे.

## इस्लामवर हुकूमशाहीचा आरोप

विचारस्वातंत्र्याचे समर्थन करणारे असाही आरोप करीत असतात की इस्लामची राजकीय पद्धत वास्तवात एक हुकूमशाही पद्धत आहे. त्यात राज्याला व्यापक अधिकार असतात व राज्य अशा अधिकाराचा धर्माच्या नावाखाली निस्संकोचपणे उपयोग करीत असतो व धर्मांधपणामुळे अविचाराने लोक स्वत:ला ईश्वरी कायद्यांच्या स्वाधीन करुन टाकतात. इस्लामी राज्याच्या हातात सत्तेचे असे केंद्रीकरण झाल्याने हुकूशाहीचा जन्म होतो. त्यामुळे एक अशी व्यवस्था आस्तित्वात येते ज्यामध्ये जनतेचा दर्जा गुलामापेक्षा अधिक काही नसतो. जनतेला आपल्या बऱ्यावाईटाबद्दल विचार करण्याचा, समजण्याचा तसेच आपले मत सांगण्याचा व एखादा निर्णय घेण्याचा अधिकार मुळातच प्राप्त नसतो. त्यांचे स्वातंत्र्य कायमचे हिरावून घेतले जाते व त्यानंतर शासनाच्या अत्याचाराविरुद्ध आवाज उठविण्याचे धैर्यच कोणात उरत नाही. एखाद्या दुर्दैवी माणसाने तसा प्रयत्न केलाच तर त्याला धर्माविरुद्ध व ईश्वराविरुद्ध बंड करणारा असे म्हणून गप्प केले जाते.

## या आरोपातील तथ्यांश

या निराधार आरोपाचे सर्वोकृष्ट उत्तर खुद्द कुरआननेच दिले आहे. एकेठिकाणी असे सांगितले गेले आहे,

"त्यांची प्रत्येक कृती आपापसात सल्लामसतीने ठरविली जाते." (कुरआन ४२:३८)

एकेठिकाणी असे आले आहे,

"व जेव्हा तुम्ही लोकांमध्ये निर्णय घ्याल तेव्हा न्यायाने करा." (कुरआन ४:५८)

पहिले खलीफा माननीय अबू बक्र सिद्दीक (र) यांनी सांगितले की, 'व मी जर अल्लाहची व प्रेषित मुहम्मद (स) यांची अवज्ञा केली तर माझ्या आज्ञेचे पालन करणे तुमच्यावर बंधनकारक नाही.'

दुसरे खलीफा माननीय उमर (र) यांनी जेव्हा म्हटले, 'जर तुम्हाला माझ्यात कसलाही दोष दिसला तर तो दुरुस्त करा'

यावर एका व्यक्तीने म्हटले की, 'ईश्वराची शपथ! आम्हाला तुमच्यात कसलाही दोष आढळला असता तर आमच्या तलवारीने तो आम्ही दुरुस्त करुन टाकला असता.'

इस्लामच्या अशा शिकवणीमध्ये व त्याच्या अनुयायांच्या अशा उघड उदाहरणांमध्ये या निराधार आरोपात कसलेही तथ्य असल्याचे आढळून येते काय?

## धर्म व दडपशाही

धर्मांच्या नावावर अनेकवेळा दडपशाही करण्यात आली हा इतिहास आहे व आजसुद्धा त्याच्या नावाने अनेक जुलूम केले जात आहेत. परंतु हे सर्व जुलूम व अत्याचार खरोखरच धर्मांसाठी केले जात आहेत काय? हिटलरची हुकूमशाही धर्मावर आधारलेली होती काय? स्टालिन एक जुलमी व अत्याचारी हुकूमशहा होता व त्याचे शासन एक सैनिकी राज्य होते ही गोष्ट आज रशियात उघडपणे मान्य केली जाते. मग स्टालिनचे शासन धर्माधिष्ठित होते काय? माऊत्सेतुंग असो की फ्रॅन्को, दक्षिण आफ्रिकेचा डॉक्टर म्लान असो की राष्ट्रवादी चीनचा चँग-कै-शैक असो. हे सर्व हुकूमशहा धर्मांच्या आधारावर सत्तारुढ होते काय? सत्य असे आहे की विसाव्या शतकातील माणसाने आध्यात्मिक क्रूरपणा पासून तर सुटका करून घेतली आहे पण अजूनही तो हुकूमशाहीच्या व दडपशाहीच्या अतिभयानक व घृणास्पद अशा स्वरुपाला बळी पडला आहे. त्यावर माणसांची दिशाभूल करण्यासाठी व त्यांना मूर्ख बनविण्यासाठी तऱ्हेतऱ्हेच्या गोंडस नावांची लेबले लावली गेली आहेत. एकेकाळी धर्मांना जे पावित्र्य होते तसे पावित्र्य आजही त्यांना प्राप्त आहे.

## दोष कोणाचा आहे ?

कोणीही बुद्धिवान माणूस हुकूमशाहीचे समर्थन करु शकत नाही व ती योग्य आहे असेही समजू शकत नाही. उत्तमातील उत्तम कायद्यांनाही विकृत करून व त्यांच्यात दोष निर्माण करुन स्वत:च्या स्वार्थांसाठी व उद्दिष्टांसाठी, यंत्रासारखा त्याचा वापर केला जाऊ शकतो. यावरून हे स्पष्ट होते की दोष त्या कायद्यांचा नसून त्या स्वार्थांध व्यक्तींचा आहे जे आपले घृणास्पद हेतू झाकण्यासाठी त्याच्या नावाचा वापर करतात.

फ्रान्सच्या क्रांतीच्या वेळी स्वातंत्र्याच्या नावाने अतिघृणास्पद व हिडीस अत्याचार केले गेले. आम्ही अशा अत्याचारांचा आडोसा घेऊन संपूर्ण स्वातंत्र्य चळवळीस विरोध करावा, असा याचा अर्थ कदापिही होत नाही. याचप्रमाणे इतिहासात कायदा व घटना या नावावर शेकडो निरपराध लोकांना अनेकवेळा तुरुंगात डांबले गेले, त्यांचा छळ केला गेला. त्यांना ठेचून काढण्याचा व दडपण्याचा प्रयत्न केला गेला, पण या सर्व गोष्टी, कायदा व घटना निरर्थक असून त्यांना नष्ट करु टाकण्यात यावे, असे म्हणण्यास पुरेशा आहेत काय? त्याचप्रमाणे जर एखाद्या देशात धर्माच्या नावाखाली दडपशाही चालली असेल तर केवळ एवढ्यासाठी आम्ही जीवनातून धर्म बाजूला काढून फेकून द्यावयास हवा काय? एखादा धर्म जर अन्याय, अत्याचार व क्रूरपणावर आधारलेला असेल तर अशा धर्माचा निस्संशयपणे त्यागच करणे अधिक चांगले आहे. पण इस्लामप्रमाणे जो धर्मन्याय शिकवितो व सर्व प्रकारचे अत्याचार नष्ट करु इच्छितो, तर त्याचा विरोध करण्यात कसले औचित्य आहे? इस्लामने केवळ मुस्लिमांमध्येच न्यायाची श्रेष्ठ व पवित्र उदाहरणे घालून दिली असे नाही तर, इस्लामने त्याच्या कट्टर शत्रूंच्या बाबतीतही न्यायाची अशी तेजस्वी परंपरा स्थापन केली आहे की त्यासारखे उदाहरण शोधूनही सापडत नाही.

## दडपशाहीवर सर्वोत्तम उपाय

लोकांच्या मनामध्ये अल्लाहवरील इमान व श्रद्धा निर्माण करणे हा दडपशाहीला तोंड देण्याचा सर्वांत उत्कृष्ठ मार्ग आहे. तसेच त्यांना इतरांच्या स्वातंत्र्याचा (हक्काचा) आदर करण्यास शिकविले जावे. त्यांच्या रक्षणाची हमी खुद्द धर्मानेच दिली आहे. अशा प्रकारच्या ईश्वरवादी समाजातील व्यक्ती शासनाला आपल्या मर्यादांचे उल्लंघन करुन इतरांवर अत्याचार करण्याची परवानगी देऊच शकत नाहीत. इस्लामने जशी न्यायपूर्ण जीवनपद्धत स्थापन करुन दडपशाहीच्या विरोधावर भर दिला आहे, या प्रकारचे उदाहरण अन्य जीवनपद्धतीत आढळत नाही. इस्लाम जनतेवर हे कर्तव्य सोपवितो की शासनाने त्यांच्यावर जुलूम, अत्याचार केले तर त्याला सुधारण्याचा प्रयत्न करावयास हवा.

इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांचे असे सांगणे आहे, "तुम्हापैकी कोणी वाईट कृत्य पाहिले तर ते सुधारून टाका." (बुखारी, मुस्लिम)

आणखी एकेसमयी प्रेषित मुहम्मद (स) यांनी सांगितले, 'जुलमी शासकासमोर सत्य गोष्ट बोलणे, अल्लाहसमीप सर्वांत मोठे जिहाद आहे.'

जीवनातील हेच ते बहूमूल्य नियम होते, जे समजून घेतल्यानंतर लोकांना तिसरे खलीफा माननीय उस्मान (र) यांच्या संबंधात ते सरळ मार्गापासून ढळल्याचे जेव्हा लोकांना समजून आले तेव्हा ते त्यांच्याविरुद्ध उठले. त्यांनी केलेल्या या उठावामुळे बिघाडात आणखी वाढच झाली, ही गोष्ट वेगळी आहे.

शेवटी आम्ही आमच्या प्रगतिवादी मित्रांना हे सांगू इच्छितो की वास्तविक स्वातंत्र्य धर्माचा त्याग करण्यात नसून त्याचा समावेश आम जनतेमध्ये अन्याय व अत्याचार सहन न करण्याची भावना निर्माण करण्यात आहे. तसेच कोणी तसे करताना आढळल्यास त्याची सुधारणा करण्यात आहे. क्रांतीची हीच भावना इस्लामचा एक विशिष्ट गुण आहे.

प्रकरण बारावे

# इस्लाम जनतेसाठी अफूची गोळी आहे काय?

'धर्म ही जनतेकरिता अफूची गोळी आहे.' कार्लमार्क्सच्या या सुप्रसिद्ध विधानाचा कम्युनिस्ट प्रचारक इस्लामी देशांमध्ये डोळे मिटून आजापर्यंत पुनरुच्चार करीत आहेत. येथपर्यंत हा प्रचार झाला आहे की इस्लामही त्या टीकेतून सुटला नाही.

## युरोपवासी जनतेची विवशता

कार्लमार्क्स व कम्युनिझमच्या आरंभीच्या काळात इतर नेत्यांनी ज्या प्रकारच्या युरोपातील वातावरणात डोळे उघडले, तेथे अशा प्रकारची परिस्थिती त्या वेळी होती, ज्यामुळे चर्च व चर्चवाल्यांविरुद्ध त्यांना उठाव करणे भाग पडले. त्या काळी युरोपात विशेषकरुन रशियात जहागिरदारीची अतिशय जुलमी पद्धत चालू होती. त्यामुळे हजारो लाखो माणसे उपासमारीने व कडाक्याच्या थंडीने मरत असत. जे जिवंत राहत त्यापैकी बहुतेक क्षयरोग अथवा अन्य सांसर्गिक रोगांना बळी पडत असत. त्यांची विचारपूस करणारे कोणी नव्हते. याच्या उलट जहागिरदार समूह या गरिबांचे रक्तशोषण करून आपल्या सुखचैनीची सर्व साधने प्राप्त करीत. ते आपल्या सभोवतालच्या परिस्थितीकडे डोळेझाक करून मनसोक्त भोगविलासात दंग होते.

## धार्मिक माणसांचे चरित्र

अत्याचारावर ताण असा की श्रमजीवी लोकांनी या अन्यायाविरुद्ध आवाज उठविला, किंवा त्यांना आपल्या अभावाची व वंचितपणाची जाणीव झाली तर धार्मिक वर्ग म्हणजे धर्मगुरुंचा वर्ग त्यांना थोपटून, थोपटून पुन्हा झोपवित असे. भरडल्या गेलेल्या जनतेचे सहाय्य करण्याऐवजी त्यांना असे सांगून त्यांचे सांत्वन करीत असत की, 'जर तुमच्या उजव्या गालावर कोणी मारले तर तुम्ही तुमचा डावा गाल त्याच्यापुढे करा.' जर कोणी तक्रार व फिर्याद करुन तुमचा सदरा घेऊ इच्छित असेल, तर तुमचा लांब झगाही त्याला घेऊ द्या.' ते त्यांना सांगत की या जगात जे लोक अन्याय व अत्याचारांना बळी पडले आहेत, त्याच्या मोबदल्यात त्यांना सुख, शांतीयुक्त व चिरकाल टिकणारे मरणोत्तर जीवन प्राप्त होईल. म्हणून त्यांनी हालअपेष्टा सहन कराव्यात व आपल्या शासकाविरुद्ध कोणताही आवाज उठवू नये. अशाप्रकारे त्यांनी दु:खी व पीडित जनतेला रमवून व त्यांचे मनोरंजन करुन आपले हक्क मिळविण्याकरिता संघर्ष करण्यापासून रोखून धरले व क्रांतीच्या मार्गाने त्यांना पुढे जाऊ दिले नाही.

## सांत्वन व धमक्या

परलोकातील सुखाच्या व आरामाच्या अशा कायद्यांनी काम भागले नाही व या पिडलेल्या, गांजलेल्या लोकांनी आपले हक्क प्राप्त करण्याचा आग्रहच धरला तर हे चर्चचे लोक

धमक्या देऊन त्यांचे तोंड बंद करुन टाकीत. ते म्हणत की जो कोणी आपल्या जहागिरदार धन्याची अवज्ञा करील तो ईश्वराचा, चर्चचा व धर्मगुरुचा शत्रू व बंडखोर आहे. या काळात चर्च हा मोठा जहागिरदार होता ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. हजारो लाखो शेतमजूर त्यांच्या जमिनीत खपत असत. म्हणूनच श्रमजीवी मजुरांमध्ये व जहागिरदारांमध्ये जेव्हा संघर्ष सुरु झाला तेव्हा चर्च स्वाभाविकपणे रशियाच्या राजघराण्याच्या बाजूने व त्यांचे पाठीराखे असलेल्या जहागिरदारांच्या बाजूने उभे राहिले. वास्तविक हे सर्व एकाच माळेचे मणी होते व क्रांती जर घडून आलीच तर तिच्या मिठीतून जहागिरदारही वाचू शकणार नाहीत, तसेच धर्मगुरुंचा समूहही वाचू शकणार नाही ही गोष्ट ते चांगल्या तऱ्हेने जाणत होते. मग परलोकातील यशाच्या व फायद्याच्या वायद्यांनी व धमक्यांनी काम भागले नाही तर इतरांशी व धर्माशी बंड करणाऱ्यांना दंडुक्यांनी बडवून काढले जात असे. या बाबतीत जहागिरदारांना चर्चचा पूर्ण पाठिंबा असे. चर्चच्या अशाच प्रकारच्या अनेक कर्तृत्वामुळे युरोपातील जनता हळूहळू असे समजू लागली की माणसाचा खरा शत्रू धर्म आहे. 'धर्म ही अफूची गोळी आहे.' या कार्लमार्क्सच्या विधानात हाच ऐतिहासिक संकेत व तथ्य आहे.

## शासनाचे साथीदार

धार्मिक वर्गाच्या बाबतीत कम्युनिझमचे अनुयायी असेही म्हणतात की जे श्रमजीवी वर्गाविरुद्ध शासनाच्या बाजूने उभे राहत आले आहेत. चिरकाल स्वर्गसुखाची आशा दाखवून सर्व प्रकारचा अन्याय व अवमान सहनशीलतेने सोसण्याची शिकवण ते सामान्य जनतेला देत असत, जेणेकरून त्यांना हानीची जाणीव होऊ नये व जुलमी लोकांनी निस्संकोचपणे त्यांचे रक्तशोषण करू शकावे.

## जामिया अजहरचे उदाहरण

या संदर्भात जामिया अजहरच्या काही विद्वानांचा हवाला दिला जातो. ते बादशहांच्या व सुलतानांच्या हाताचे चुंबन घेत व त्यांच्या इच्छेनुसार कुरआनचा अर्थ लावून धर्माचे स्वरुप बिघडविण्यासाठी चुकत नसत. असे केल्याने शासकांचे आसन मजबूत होऊन त्यांचा दरारा व दबदबा टिकून राहावा व सामान्य जनतेला त्यांच्या विरुद्ध उठाव करण्यापासून रोखले जावे. म्हणूनच हे लोक सामान्य जनतेला असे सांगत की त्यांनी जर शासनाविरुद्ध उठाव केला अगर त्याची आज्ञा पाळली नाही, तर ते ईश्वराचे गुन्हेगार व बंडखोर ठरतील.

## खरा प्रश्न

या सर्व गोष्टी खऱ्या असणे शक्य आहे, पण प्रश्न असा आहे की या धंदेवाईक धार्मिक नेत्यांनी जे काही केले ते धर्माच्या आदेशांचे पालन करण्याच्या परिणामस्वरुप होते काय ? ती त्यांच्या स्वार्थप्रियतेची निपज होती.

## इहलोकप्रिय उलेमांचे (कायदातज्ञांचे) उदाहरण

जे इहलोकप्रिय उलेमा मुस्लिम इतिहासात होऊन गेले त्यांची रीती व नीति इस्लामी शिकवणीच्या अगदी उलट होती, हेच सत्य आहे. वर्तमान काळातील मार्गभ्रष्ट साहित्यिक, कवी तसेच वृत्तपत्रकार जसे भौतिक लाभासाठी मोठ्यात मोठी घाण व घाणेरडे कृत्य सहन करण्यास तयार असतात. या उलेमांचे उदाहरणही त्यांच्यासारखेच असते.. परंतु धार्मिक नेत्यांनी केलेला हा अपराध, गांभीर्यांच्या व भयानकतेच्या दृष्टीने जडवादी साहित्यिकांच्या, कवींच्या व पत्रकारांच्या अपराधापेक्षा कितीतरी पटीने मोठा होता. कारण धर्माच्या आत्म्याशी ते परिचित असल्याने व धर्माच्या ज्ञानाचे रक्षक व जोपासक असल्याकारणाने त्यांनी धर्माचे रक्षण करण्यासाठी उभे राहावे, अशी उचित अपेक्षा त्यांचेकडून केली जाते. अल्लाहचा धर्म बिघडवून ते जो घृणास्पद अपराध करतात त्याचे गांभीर्यही त्यांना ठाऊक असते.

## व्यावसायिक धार्मिक वर्ग व इस्लाम

पुढे जाण्याआधी आम्ही ही गोष्ट स्पष्ट करणे आवश्यक समजतो की इस्लाममध्ये एकतर कोणत्याही व्यावसायिक धार्मिक वर्गाचे अस्तित्व नसते. दुसरे असे की धार्मिक नेत्याची जी उक्ती व कृती असते तसाच इस्लामचा मानस असणे हे काही आवश्यक नाही. मुस्लिमांच्या दुर्भाग्याचे खरे मूळ कारण त्यांचे स्वत:च्या धर्माबद्दलचे अज्ञान व त्यांचे धर्मांबद्दल औदासिन्य आहे.

## इस्लाम एक मोठी स्वातंत्र्य चळवळ

दडपशाहीविरुद्ध आवाज उठविण्याचा व चळवळ करण्याचा श्रमजीवी वर्गाला अधिकार इस्लाम देत नाही, हा इस्लामवरचा आरोप खोटा आहे. मुस्लिमांचा इतिहास याचे सर्वांत मोठे प्रमाण आहे. म्हणून ज्या क्रांतीने इजिप्शियनांना गतकाळातील इजिप्शियन हुकूमशहा बादशहापासून सुटका करुन दिली ती वास्तविकपणे प्रारंभीची धार्मिक चळवळच होती. फ्रांसविरुद्ध जेव्हा मुस्लिमांनी आवाज उठविला तेव्हा त्यात मुस्लिम उलेमाच अग्रभागी होते. मोहम्मद अलीच्या अन्यायाविरुद्ध आवाज उठविणारे उमर किराम हेही एक धार्मिक नेतेच होते. सुदानमध्ये इंग्रजाविरुद्ध स्वातंत्र्य चळवळीचे नेतृत्व तेथील प्रसिद्ध धार्मिक नेते अल मेहदी यांनीच केले होते. तसेच लिबीयामध्ये इटालियन व मोरोक्कोमध्ये फ्रेंच साम्राज्याविरुद्ध संघर्ष करण्यातही इस्लामचाच हात होता. ब्रिटीश साम्राज्याविरुद्ध काशानी यांनी केलेले क्रांतिकारक आंदोलनही इस्लामी आत्म्याचाच एक चमत्कार होता. सर्व प्रकारच्या सामाजिक अन्यायांविरुद्ध व मानवी अपराधांविरुद्ध इस्लाम एक मोठी स्वातंत्र्य चळवळ आहे हे याचगोष्टीचे मोठे प्रमाण आहे.

## कुरआनमध्ये अनुमानाचा कम्युनिस्टांचा घोटाळा

कम्युनिस्ट प्रचारक कुरआनमधील या दोन आयतींचा उल्लेख करुन व आपल्या इच्छेनुसार त्यांचा अर्थ लावून, असे सिद्ध करण्याचा प्रयत्न करतात की इस्लाम लोकांना सर्व प्रकारचा अन्याय व अवमान सहनशीलतेने व धैर्याने सोसण्याची शिकवण देतो.

'व ज्या वस्तूंच्या बाबतीत अल्लाहने काहींना काहीपेक्षा प्राधान्य दिले आहे, त्या वस्तूंची आकांक्षा करु नका.' (कुरआन ४:३२)

'ज्या वस्तू आमचा विरोध करणाऱ्या विभिन्न समूहाला त्यांची परीक्षा घेण्यासाठी देऊन ठेवल्या आहेत, व ज्या केवळ इहलोकातील जीवनाचीच भूषणे होत, अशा वस्तुकडे पापणीवर करुन पाहू नका. तुमच्या पालनकर्त्याकडून मिळणारी देणगी (जी परलोकात मिळेल) कितीतरी पटीने अधिक चांगली व चिरकाल टिकणारी आहे.' (कुरआन २०:१३१)

## कुरआनचा खरा अर्थ

जेव्हा पुरुषांना जिहाद (धर्मयुद्ध) मध्ये भाग घेणे सक्तीचे ठरविले गेले, तेव्हा एका स्त्रीने इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांना असा प्रश्न विचारला की ईश्वरी मार्गात पुरुषाप्रमाणे जिहाद करण्यापासून स्त्रियांना का वंचित ठेवले गेले आहे? पहिली आयत उतरण्याचे असे कारण टीकाकार सांगतात, अशा प्रकारे ती आयत अवतीर्ण झाली. अधिक लोकप्रिय झालेले दुसरे एक कथन असे आहे की वास्तविकपणे या आयतीद्वारा माणसाला आशा आकांक्षाच्या काल्पनिक जगात रमण्यापासून रोखले गेले आहे. माणसातील कर्तृत्वशक्ती नष्ट करुन टाकणाऱ्या हवेत कल्पनेचे किल्ले बांधण्याच्या रोगापासून वाचण्याची धोक्याची सूचना दिली गेली आहे. तसे झाल्यास माणूस द्वेष व मत्सरासारख्या रोगाला बळी पडून भौतिक दृष्टीनेही ते हानीकारक ठरु शकते. म्हणून या आयतीमध्ये त्या गोष्टीपासून दूर राहण्याची शिकवण देण्यात आली असून माणसांना असे कार्य करण्यास उद्युक्त केले गेले आहे. त्यामुळे त्याच्या योग्यतेमध्ये व क्षमतेमध्ये वृद्धी होऊन त्याला वास्तविक आदराचे व सन्मानाचे स्थान प्राप्त होते.

दुसरी आयत माणसाला भौतिक स्थरावरुन उंच होण्याचे आवाहन करते व त्याला हे दाखवून देते की केवळ जगातील धनसंपत्ती व साधनसामुग्रीची विपुलता माणसाच्या श्रेष्ठत्वाचे व मोठेपणाचे प्रमाण नाही. वास्तविकपणे जे लोक भौतिक समृद्धीखेरीज इतर सर्व सद्गुणाविरहित आहेत अशा लोकांशी मत्सरही केला जाऊ शकत नाही व त्यांचे अनुकरणही केले जाऊ शकत नाही. या आयतीत खुद्द इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांनाच संबोधित केले गेले होते. त्यांना हे सत्यही दाखवून देण्यात आले की अल्लाहजवळ सुस्थितीत व संपन्नावस्थेत असणाऱ्या विरोधकांना कसलेही महत्त्वाचे स्थान अगर दर्जा नाही. कारण त्यांच्यापाशी ईमानरुपी धन नसून त्यापासून ते वंचित आहेत. उलट जे काही महत्त्व आहे, ते खुद्द इस्लामच्याचे प्रेषित मुहम्मद (स) यांनाच आहे. कारण ते सत्याच्या मार्गावर ठामपणे उभे आहेत व म्हणून वास्तविक सन्मानाचा हक्क त्यांचाच आहे.

## सहनशीलता व अल्लाहवरील श्रद्धेचा अर्थ व त्याचे प्रसंग

या दोन्ही आयतींचा वास्तविक अर्थ असा आहे. थोडा वेळ यापासून बाजूला होऊन (इस्लामचे विरोधक जसे म्हणतात तसे) अशी कल्पना करु या की या आयतीमध्ये माणसाला सहनशीलतेची, सोशिकपणाची व अल्लाहवर गाढ श्रद्धा बाळगण्याची शिकवण दिली गेली आहे व इतरांना जी ईश्वरी देणगी व सुख प्राप्त झाले आहेत त्याबद्दल मत्सर करण्यापासून रोखले गेले आहे. तरीही प्रश्न असा आहे की या आदेशांचे खरे प्रसंग कोणते आहेत व कोणत्या प्रसंगी त्यावर बंधने घालावयास हवीत?

## चित्राच्या दोन बाजू

या प्रश्नाचे उत्तर समजून घेण्यासाठी पहिली गोष्ट मनावर बिंबवली पाहिजे की इस्लाम एक परिपूर्ण जीवनपद्धत आहे. ती संपूर्ण पद्धत याच्या सर्व अंगप्रत्यंगासह स्वीकारावी लागते तेव्हाच त्याचे वास्तविक स्वरुप निष्पन्न होते. इस्लामच्या पालनाचा खरा हेतू अशावेळीच साध्य होऊ शकतो. याद्दष्टीने पाहिले तर, इस्लाम गरिबांना व अभावग्रस्तांना सहन करणारा व आभार मानणारा होण्याची शिकवण देतो. तसेच व त्यांना आपल्यापेक्षा अधिक धनवान व संपन्न असलेल्या लोकांच्या धनाबद्दल व समृद्धीबद्दल मत्सर न बाळगण्याचे शिकवितो. एवढीच गोष्ट नसून, त्याचबरोबर दुसरीकडे तो सुस्थितीतील संपन्न लोकांनाही अशी मागणी करतो की त्यांनी स्वार्थप्रियता सोडावी व ईश्वराने प्रदान केलेली संपत्ती त्याच्याच मार्गात जास्तीतजास्त खर्च करावी. तोच त्याच्या मुक्तीचा मार्ग आहे. नाहीतर परलोकात त्यांना घोर यातना भोगाव्या लागतील. चित्रांच्या या दोन्ही बाजू जर लक्षात ठेवल्या तर इस्लामने जो मार्ग अंगीकारला आहे, तोच वास्तविकपणे एक समतोल व न्याय्य मार्ग आहे, हे कळून चुकते.

## इस्लामची आर्थिक नीती

इस्लाम एकीकडे माणसाला स्वत्वाच्या पलीकडे जाऊन पूर्ण निष्ठेने व निस्वार्थीपणाने खर्च करण्याचा मार्ग दाखवितो तर दुसरीकडे त्याला द्वेष व मत्सराच्या मार्गापासून दूर राहण्याची ताकीद देतो. तसेच त्याने स्वत:ला स्वत:तच गुरफटून घेऊन अवमानीत करीत फिरू नये असे इच्छितो. अशा रितीने इस्लाम समाजाला अशी वास्तविक आध्यात्मिक शांती प्रदान करतो, जी आर्थिक न्यायाच्या निकडीशीही पूर्णपणे एकरुप असते. कारण इस्लाम धनाचे विकेंद्रीकरण समाजात अशारितीने करु इच्छितो की अतिधनप्राप्तीमुळे काही लोकांनी धुंद होऊन कुमार्गाला लागूनये तसेच निर्धन वर्ग कायमचा हलाखीला, अभावाला बळी पडू नये.

## इस्लामी समाजाची वैशिष्ट्ये

इस्लामी मूलतत्त्वांवर जेव्हा एखाद्या समाजाची उभारणी होते, तेव्हा मुस्लिमेतर समाजात सर्वसाधारणपणे दु:खी व पीडित वर्गाच्या वाट्याला ज्याप्रकारचे आर्थिक अन्याय व अभाव येतो. तशा सर्व स्वरुपाचा येथे अंत होतो. ज्यामध्ये धनवान व संपन्न लोकांना आपल्या कर्तव्याची जाणीव असून ते पार पाडण्यात तयार आहेत, अशा समाजाच्या बाबतीतच ही गोष्ट खरी आहे. कारण जर धनवान व समृद्ध वर्गाने आपली कर्तव्ये पार पाडण्यात कुचराई केली व अल्लाहच्या मार्गात आपले धन खर्च केले नाही, तर निर्धनांना व गांजलेल्यांना सोशीकपणाने व धैर्याने आपली वंचना व अन्यायावर संतोष मानण्याची शिक्षा कशी दिली जाऊ शकते? तसेच त्यांच्या होणाऱ्या अन्याय व अत्याचाराविरुद्ध त्यांनी आवाज उठवू नये असे त्यांना कसे सांगितले जाऊ शकते? इस्लामची अशी पद्धत नक्कीच नाही. जे लोक अन्याय व अत्याचारासमोर गुडघे टेकून त्याला कसलाही प्रतिकार करीत नाहीत, असे लोक इस्लामसमीप इहलोकात तसेच परलोकात घोर यातनांना पात्र आहेत.

"स्वत:वर अत्याचार करणाऱ्या लोकांचा आत्मा जेव्हा यमदूतांनी काढून घेतला, तेव्हा त्यांना विचारले गेले, 'तुम्ही कशा अवस्थेत पडला होता?' त्यांनी उत्तर दिले, 'आम्ही भूमीवर कमकुवत व विवश होतो.' देवदूतांनी विचारले की, 'ईश्वराने निर्माण केलेली जमीन हिजरत (स्थलांतर) करण्याइतकी विस्तृत नव्हती काय?' ज्यांचे स्थान नरकाग्नी आहे असे हे लोक आहेत व नरकाग्नी एक फारच वाईट स्थान आहे. होय जे पुरुष, स्त्रिया व मुले खरोखरीच विवश आहेत व बाहेर पडण्याचा कोणताही मार्ग त्यांना आढळत नाही, अशांना अल्लाह क्षमा करील हे अशक्य नाही. अल्लाह मोठा क्षमाशील व माफी करणारा आहे.' (कुरआन ४:९७-९८)

## एक अक्षम्य अपराध

कमकुवतपणामुळे अन्याय व अत्याचार निमूटपणे सहन करणे, कुरआनच्या अनुसार एक अक्षम्य अपराध आहे. म्हणून अशा लोकांना 'स्वत:वर जुलूम करणारे' अशा रीतीने कुरआन संबोधितो. कारण हे लोक अल्लाहने मानवाकरिता निश्चित केलेल्या मानवसन्मानाच्या श्रेष्ठ स्थानाहून पतन पावून, पराभूत व तुच्छ अवस्थेत संतोष मानून घेतात. ते श्रेष्ठ स्थान प्राप्त करण्यासाठी आपली सर्व शक्ती व क्षमता पणाला लावावी हे माणसाचे कर्तव्य आहे.

## इस्लामच्या दृष्टीने अन्याय व अत्याचार

हिजरत (स्थलांतर) चा आदेश जेव्हा अवतरला, तेव्हा मुस्लिम शत्रूंनी वेढलेले व त्यांच्या दडपणाला बळी पडले होते. धार्मिक क्रूरपणामुळे व असहिष्णूपणामुळे त्यांना जगणे अवघड झाले

होते. त्यावेळी हिजरतचा आदेश अवतरला पण हिजरत ही अन्याय व अत्याचाराची सामना करण्याचे एक स्वरुप होते. याशिवाय इतर अनेक मार्गांनी त्याचा सामना केला जाऊ शकत होता. कसल्याही अवस्थेत याप्रसंगी आम्ही जी वास्तवता वाचकांच्या मनात बिंबवू इच्छितो ती अशी की, इस्लाम अन्याय व अत्याचार निमूटपणे सहन करणे, अतिभयानक कृती समजतो व त्यावर इतका भर देतो की मुस्लिमांपैकी जे लोक खरोखरीच अशक्त, विवश व पिडलेले, गांजलेले होते व त्यांच्याजवळ अत्याचारांना तोंड देण्यासाठी व जुलमी लोकांशी सामना करण्यासाठी कसलीही साधने नव्हती तसेच शक्ती नव्हती, अशा लोकांसाठी वरील आयतीत केवळ क्षमा करण्याचा वायदा केला गेला आहे, नक्की क्षमा केलीच जाईल असे नाही. त्यांची विवशता खरी व उचित होती आणि त्यांचा कमकुवतपणा व वाईट अवस्था ही सत्य घटना होत्या. जर माणसाजवळ अन्याय व अत्याचाराचा सामना करण्याची थोडीशी जरी शक्ती असेल तर त्याने ते सहन करणे व ते संपविण्याचा अगर नष्ट करण्याचा प्रयत्न न करणे ही गोष्ट बरोबर नाही, याच सत्यावर वरील आयतीत जोर दिला गेला आहे.

उरता उरले कमकुवत, विवश व पिडलेले मुस्लिम, तर इस्लाम त्यांनाही एकटे सोडीत नाही, उलट संपूर्ण मुस्लिम समुदायावर त्यांच्या रक्षणाची व त्यांना सहाय्य करण्याची जबाबदारी टाकून, त्या उद्देशाने अत्याचाराशी लढण्याचा आदेश देतो.

"शेवटी तुम्ही अल्लाहच्या मार्गात असहाय्य व हतबल पुरुषांसाठी, स्त्रियांसाठी व मुलांसाठी लढू नये याचे कारण काय, जे कमजोर असल्याने दडपले गेले आहेत व करुणा भाकत आहेत की, 'अल्लाह ! या जुलमी लोकांच्या वस्तीतून आम्हाला बाहेर काढ व तुझ्यातर्फे आमचा कोणीतरी पाठीराखा व सहाय्यक कर." (कुरआन ४:७५)

अल्लाह अन्याय व अत्याचार करणाऱ्यापुढे मान वाकविणाऱ्या लोकांना पसंत करत नाही, ही गोष्ट या आयतीत उघड होते. अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करु इच्छिणाऱ्या प्रत्येक माणसाला अशी हाक देतो की त्यांना सत्यप्रिय व्यक्तीबरोबर, अन्याय व अत्याचाराविरुद्ध खांद्याला खांदा लावून एका ओळीत उभे राहावे. जेणेकरून अत्याचार करणाऱ्याच्या तावडीतून लोकांची सुटका होऊन त्यांच्या अत्याचारास त्यांनी बळी पडू नये.

## एका गैरसमजुतीचे निरसन

वरील आयतींचा संबंध फक्त धर्म व श्रद्धेशी आहे. ती केवळ अशा अवस्थेतच लागू पडते जेव्हा मुस्लिम परावलंबी, पिडलेले, कमकुवत असतील व त्यांना आपले धार्मिक विधी पार पाडण्याचेही स्वातंत्र्य नसेल, असा विचार काही लोकांच्या मनात येणे शक्य आहे पण असा विचार

बरोबर नाही. कारण इस्लाम एक परिपूर्ण व्यापक जीवनपद्धती असल्यामुळे इस्लाम धार्मिक उपासना पद्धत करण्यास, तसेच सामाजिक आर्थिक व राजकीय जीवनात सुधारणा व त्याच्या हितास व कल्याणास समान महत्त्व देतो व त्यात काही फरक मानत नाही. कारण या सर्वांचा आधार इस्लामी श्रद्धेवर असतो व येथूनच त्यांचा उगम होतो. म्हणूनच इस्लामच्या उपासना पद्धतीत अडथळा करणारे असोत की इस्लामी जीवनपद्धतीचा मार्ग बंद करणारे असोत, इस्लामच्या दृष्टीने हे दोघेही सारखेच आहेत. मग भलेही हे लोक नावाने व आचरणाने सत्य नाकारणारे असोत की नावाने मुस्लिम असून आचरणाने अल्लाहशी बंडखोर व सत्य नाकारणारे असोत, हाच कुरआनचा निर्णय आहे.

"व जे लोक अल्लाहने अवतरलेल्या कायद्यानुसार निर्णय करीत नाहीत ते सत्य नाकारणारे आहेत." (कुरआन ५:४४)

इस्लामची अशी इच्छा आहे की धन, कसल्याही परिस्थितीत केवळ काही घरांतच साठून राहू नये, उलट सर्व समाजात त्याचे चलन व्हावे. त्याचबरोबर इस्लामी राज्याचे हे कर्तव्य आहे की त्याने लोकांना रोजगार उपलब्ध करून द्यावा. तसे करणे शक्य नसेल किंवा कोणी नागरिक शारीरिक उपलब्ध विवशतेमुळे अगर कमकुवतपणामुळे काम करण्यास अक्षम असेल तर राज्याच्या कोषागारातून त्याला मदत द्यावी. या शिवाय मागील पानात सांगितल्याप्रमाणे इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांच्या सवलती देण्यासही बांधलेले असते.[१] एखाद्या खाजगी अगर सरकारी संस्थेत काम करणाऱ्यांनाही सवलत लागू आहे, कारण जीवनातील हे सारे पैलू इस्लामी व्यवस्थेचे विविध भाग व अविभाज्य अंग आहेत. यातील कोणत्याही भागात अल्लाहच्या कायद्याकडे जो कोणी डोळेझाक करतो तो सच्चा मुस्लिमच नव्हे. जेव्हा तो ईश्वराच्या भूमीवर त्याचाच कायदा लागू करण्यासाठी संघर्ष व धडपड करील तेव्हाच तो आपल्या श्रद्धेच्या बाबतीत याच रीतीने निष्ठावान ठरु शकतो.

इस्लामची राजकीय सामाजिक व आर्थिक व्यवस्था जगात लागू करण्यासाठी जे लोक धडपड करीत नाहीत व त्यात भाग घेत नाहीत त्यांना कुरआन जुलूम, अन्याय व दडपशाहीशी राजीखुषीने तडजोड करणारे अपराधी म्हणून घोषित करतो व त्यांना स्वत:वर जुलूम करणारे असे म्हणतो.

---

१. ते लेखकाचा संकेत इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांच्या कथनाकडे आहे ज्यामध्ये त्यांनी म्हटले आहे, जो कोणी आमचा (इस्लामी राज्याचा) कर्मचारी असून एखाद्या कामावर नियुक्त असेल, त्याला पत्नी नसेल तर त्याचा विवाह केला जाईल, घर नसेल तर त्याला घर दिलं जाईल व त्याच्याकडे चाकर नसतील तर त्याला चाकर दिले जातील.

## कुरआनची आयत

'ज्या वस्तूमध्ये अल्लाहने काही लोकांना इतरापेक्षा प्राधान्य दिले आहे, अशा वस्तूंबद्दल लालसा बाळगू नका.'

"व आम्ही विरोध करणाऱ्या वेगवेगळ्या समूहांना ज्या वस्तू परीक्षा घेण्यासाठी देऊन ठेवल्या आहेत त्या वस्तूकडे पापणी वर करुन कदापी पाहू नका."

वरील आधाराने जे असे सिद्ध करण्याचा प्रयत्न करतात की इस्लाम अन्याय व अत्याचार निमूटपणे सहन करण्याची शिकवण देतो. ही गोष्ट थोड्या वेळापुरती खरी मानली तरी खुद्द त्यांच्या परिणामानेच त्यांच्या प्रतिपादनाचे खंडन होते. कारण त्यापासून जे परिणाम निघतात ते इस्लामशी अगदी विसंगत आहेत.

या लोकांनी लावलेला आयतींचा तथाकथित अर्थ असा होईल की, धन काही लोकांच्या हातातच साठून राहील व उरलेले सर्व लोक त्याच्या लाभापासून व फळापासून वंचित राहतील. (वास्तविकपणे जहागिरदारी पद्धतीत व भांडवलवादी पद्धतीत असे घडते.) पण अशी अवस्था ईश्वरी इच्छेच्या अगदी उलट आहे, कारण कुरआनमध्ये असा उघड आदेश आहे,

"जेणेकरून धन फक्त धनवानांच्याच हातात फिरत राहू नये." (कुरआन ५९:७)

दुसरा परिणाम असा होईल की धनवान लोक आपल्या धनांवर भुजंगासारखे बसून राहतील व धनाचा खर्च केवळ स्वत:साठीच व स्वत:च्या भोगविलासासाठीच करतील. अशाच लोकांच्या बाबतीत कुरआनमध्ये असे सांगितले गेले आहे,

"जे लोक सोनेचांदी साठवून ठेवतात व अल्लाहच्या मार्गात ते खर्च क्रीत नाहीत त्यांना भयानक यातनांची सुवार्ता द्या." (कुरआन ९:३४)

यावरुन अल्लाहला ही गोष्ट अगदी नापसंत आहे हे स्पष्ट होते. कुरआनमध्ये अनेक ठिकाणी भोगविलासाचा धिक्कार केला गेला आहे.

"व आम्ही एखाद्या वस्तीत भयसूचना देणारा (प्रेषित) धाडला नव्हता काय? पण तेथील सुस्थितीतील लोक म्हणत की, तुम्हाला जे आदेश देऊन पाठविले गेले, त्यांना आम्ही नकार देतो." (कुरआन ३४:३४)

"जेव्हा एखादी वस्ती नष्ट करून टाकण्याचा आम्ही इरादा करतो, तेव्हा तेथील सुस्थितीत असलेल्या लोकांना हुकूम देऊनही ते अवज्ञा करीत असतात, तेव्हा कोपाचा निर्णय त्याच वस्तीकरिता केला जातो व आम्ही तिला नष्ट करून टाकतो." (कुरआन १७:१६)

"व डावे हातात असलेले ! किती वाईट आहेत ! ते अग्नीत व उकळत्या पाण्यात, तसेच काळ्याकुट्ट धुराच्या वेढ्यात असतील, व तो शीतल व आनंददायक असणार नाही. हे लोक या आधी पृथ्वीवर फार मजेत होते." (कुरआन ५६:४१-४५)

तात्पर्य असे की, सामाजिक अन्याय व अत्याचाराविरुद्ध ज्या लोकांनी जिहाद सुरु केले तर त्यापासून वाईटाखेरीज व सर्वनाशाखेरीज इतर कसलीही फलनिष्पत्ती होऊ शकत नाही. ईश्वराची प्रसन्नता प्राप्त होण्यासाठी मान खाली घालून सामाजिक अन्याय व अत्याचार सहन करण्याची शिकवण इस्लाम लोकांना देतो, असे इस्लामबाबत म्हणणे म्हणजे केवळ एक खोटा आरोप आहे. सामाजिक दुष्कर्मे फैलावताना उघड्या डोळ्यांनी निमूटपणे पाहत राहणे व त्यांना प्रतिबंध करण्याचा कसलाही प्रयत्न न करणे, हे वास्तविकपणे 'कुफ्र'चे अर्थात सत्याचा इन्कार करण्याचे लक्षण आहे ज्यामुळे अल्लाहचा कोप भडकतो होतो आणि काही लोक त्याच्या धिक्कारास व आपत्तीस पात्र ठरतात.

"बनी इस्राईलमध्ये ज्या लोकांनी सत्याचा इन्कार करण्याच्या पद्धतीचा अंगिकार केला, त्यांचा धिक्कार दाऊद व ईसा इब्ने मरियम यांच्या मुखाने केला गेला, कारण ते वरचढ होऊन बसले होते व अतिरेक करु लागले होते. कुकर्मांपासून एकमेकांना परावृत्त करण्याचे त्यांनी सोडून दिले होते. फारच वाईट रीती त्यांनी अंगिकारली होती." (कुरआन ७:७८-७९)

इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांचे असे सांगणे आहे,

'कुकर्म घडत असताना तुम्हापैकी कोणीही पाहिले, तर नष्ट करण्याचा प्रयत्न करा.'

'जुलमी शासकासमोर सत्य गोष्ट बोलणे, हेच सर्वोकृष्ट जिहाद आहे.'

इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांच्या या दोन वचनांना एकत्र करुन पाहिले, तर सामाजिक अन्याय अत्याचार व दुष्कर्मे समाजात केवळ अशा वेळी जास्त प्रमाणात फोफावतात, जेव्हा तेथील शासक भलेपणाच्या व न्यायाच्या मार्गापासून पदभ्रष्ट झालेले असतात. हेच महत्त्वाचे सत्य पुढे येते. अशा शासकाविरुद्ध जिहाद करणे, हे प्रत्येक मुस्लिमांचे कर्तव्य आहे व ईश्वराची प्रसन्नता प्राप्त करण्याचा हाच मार्ग आहे. असे असूनही इस्लाम माणसाला नम्रपणे सर्व प्रकारचा अन्याय, अत्याचार सहन करण्याची शिकवण देतो, अशी टीका टोमणे करणारे हे कसले विद्वान आहेत? ते धार्मिक संकुचितपणामुळे अंध बनलेले आहेत व आपल्या इच्छाआकांक्षाचे गुलाम आहेत. इस्लामच्या विरुद्ध सर्व प्रकारच्या असत्य गोष्टी पसरविण्याचा रोगच त्यांना जडला आहे, केवळ तेच लोक असे म्हणू शकतील.

## या आयतीमधील विचार करण्यासारखा एक पैलू

वरील आयतीमध्ये माणसाला हवेत काल्पनिक किल्ले बांधण्यापासून जे रोखले गेले आहे, त्यातील सर्वात मोठी खुबी म्हणजे माणूस अशा तऱ्हेची जी स्वप्ने रंगवीत असतो त्यामुळे त्याची कर्तव्य शक्ती क्षीण होत जाते. कारण त्यात कसल्याही विधायक कृतीला वाव नसतो. या आयतीमधील आणखी एक पैलू विचार करण्यासारखा आहे. राज्यांचे, समाजाचे व राष्ट्रांचे आस्तित्व वास्तवात असते व ते स्वाभाविक असते. असे या आयती दाखवून देतात. माणसाची इच्छा असली तरी त्यांना समाप्त करु शकत नाही. म्हणून त्यांचे अस्तित्व मान्य करुन, त्याच्या कार्य नियमानुसार स्वत:ला आकार व रुप द्यावे; हीच सर्वोत्तम रीती नीती आहे.

## स्वप्नसृष्टीतील इच्छांचा शेवट

सतत स्वप्नसृष्टीत रंगून राहण्याच्या संदर्भात असे म्हणता येईल की, त्यापासून लाभाऐवजी हानीच होते. कारण जगात काही व्यक्तींना योग्यतांची व क्षमतांची अशी काही ईश्वरी देणगी असते की, त्यामुळे त्यांना विपुल प्रसिद्धी व लोकप्रियता लाभते. या उलट काही लोकांना मनातून प्रसिद्धीची व ख्यातीची तर उत्कट इच्छा असते; पण ती प्राप्त होण्यासाठी आवश्यक असणारी योग्यता व क्षमतेचा त्यांच्यात अभाव असतो. म्हणून ते ती प्राप्तही करु शकत नाहीत व तिला पात्रही असत नाहीत. अशा लोकांच्या बिनबुडाच्या इच्छांची पूर्तता करण्याचे जरी राज्याने ठरविले, तरी ते काही करु शकत नाही. तसेच त्यांना द्वेष, मत्सर व इतर मानसिक रोगांपासून मुक्तही करु शकत नाही. योग्यता व क्षमतारुपी रत्न, यांचा त्यांच्यात अभाव असतो तो कोठूनतरी आणून त्यांना देऊ शकत नाही.

## आनंद व सौंदर्यामध्ये समानता

या गोष्टीच्या अधिक स्पष्टीकरणासाठी असे समजा की दोन स्त्रिया आहेत. त्यापैकी एक सौंदर्यवती असून पाहणाऱ्याने चित्त वेधून घेणारी आहे व दुसरीत कसलेही सौंदर्य व आकर्षण नाही. तसेच तिच्यात गांभीर्य व प्रतिष्ठाही नाही. असे असूनही तिला वाटते की लोकांनी तिच्या रुपाचे कौतुक करावे व सर्वांचे लक्ष तिच्याकडे लागून राहिलेले असावे. प्रश्न असा आहे की राज्य या दोन्ही स्त्रियांना सौंदर्याच्या व आकर्षणाच्या बाबतीत समान दृष्टीने पाहू शकेल काय? विवाहित दांपत्याचे उदाहरण देऊनही याचे स्पष्टीकरण केले जाऊ शकते. पतीपत्नी परस्परावरील प्रेमाने, विश्वासाने व सद्भावनेच्या वातावरणात हसत खेळत जीवन व्यतित करीत आहेत. संततीरुपी धन लाभलेले आहे व त्यामुळे त्यांच्या वैवाहिक जीवनाची शान आणखी वाढली आहे. या उलट दुसरे एक वैवाहित जोडपे जीवनातील सर्व प्रकारच्या आनंदापासून वंचित आहे व सर्व प्रयत्न करुनही त्यांना संततीरुपी धन प्राप्त होत नाही. जगातील सर्व शक्ती एकत्र येऊनही या दु:खी जोडप्याच्या जीवनात आनंद व हर्ष निर्माण करु शकतात काय?

## एकच उचित मार्ग

तात्पर्य असे की, मानवी जीवनात असे अनेक पैलू आहेत ज्यामध्ये आर्थिक सुस्थिती उपयोगी पडत नाही; तसेच सामाजिक न्यायाची कसलीही योजना फलद्रूप होत नाही. अशा परिस्थितीत माणसाला केवळ एकच मार्ग उचित असतो व तो म्हणजे त्याने ईश्वरी इच्छेवर संतोष करून सोशीकपणाने त्याचे आभार मानून ठामपणाने आपले जीवन व्यतित करावे. तसेच त्यांनी मनात असे मानावे की या बाबतीत माणसाला ज्या मापाने निसर्ग देत असतो, ते माप पृथ्वीवरील मापापेक्षा वेगळे आहे; तसेच इहलोकातील सर्व अभावांचा मोबदला सफलतेच्या व आनंदाच्या रुपाने पुरेपूर रीतीने मिळण्यास वाव व तरतूद आहे.

## रशियाची प्रतिपादनाची वास्तवता

शुद्ध आर्थिक व सामाजिक दृष्टिकोनातून या जगात पूर्ण समानता शक्य आहे, असे कोण म्हणू शकतो? आज जगात असा एकही देश दाखविला जाऊ शकत नाही जेथील सर्व लोकांना समान हुद्दे व अधिकार तसेच समान मोबदला मिळतो. सोवियत रशियाचा असा दावा आहे की, त्याने संपूर्ण समानता स्थापन केली आहे. कारागीराला स्वत:ची प्रगती करण्याची महत्त्वाकांक्षा आहे व तो इंजिनीयर होऊ इच्छितो. परंतु आपल्या बौद्धिक कमतरतेमुळे सर्व सोई व संधी असूनही ते आपले उद्दिष्ट गाठण्यात सफल होत नाही. तर शेवटी राज्य त्याला कशा रीतीने मदत करु शकते. तसेच एखादा मजूर शारीरिक दुर्बलतेमुळे कामाच्या ठरलेल्या वेळेपेक्षा अधिक वेळ काम करण्यास अक्षम असल्यास त्याने जादा कामाच्या मोबदल्याची आकांक्षा बाळगली, जशी एखाद्या निकोप प्रकृतीच्या मजूराला मिळते, तर राज्य त्याची ही इच्छा कशी पुरी करु शकते? अशा तऱ्हेच्या प्रकरणात राज्य काही करु शकत नाही हे स्पष्ट आहे. अशा प्रकारचे लोक आपल्या अतृप्त इच्छाआकांक्षा व मत्सर भावनेचा उद्रेक व्हावा, या खेरीज अन्य काही परिणाम निघू शकत नाही. असे असंतुष्ट व वैतागलेले लोक कोणतेही काम समाधानकारक रीतिने पार पाडू शकत नाहीत. कारण सत्तेच्या लोभ व मोठमोठ्या मोबदल्याची लालसा त्यांना स्वस्थ सुखाने बसू देत नाही. लोभ व मोहाच्या लालसेचा हा रोग दंडुक्याने, हत्येने व दडपणाने संपविणे अधिक चांगले आहे की माणसाने आपल्या आंतरिक प्रेरणेंने व निश्चयाच्या सहाय्याने त्यावर मात करावी? वरील आयतीत सहनशीलतेच्या व आभाराच्या शिकवणीची हीच सुखी बाजू आढळून येते.

## चर्चेचे सार

इस्लामी आव्हानाचे सार थोडक्यात असे आहे. इस्लाम माणसाच्या सर्व सनदशीर व वैध इच्छा, आकांक्षा व गरजांकडे लक्ष देतो व त्या पुऱ्या करण्याचे मार्ग काढतो. पण त्याचबरोबर ज्या गोष्टीत बदल घडवून आणणे माणसाच्या आवाक्याबाहेर असते, अशा सर्व वास्तविकतेचा तो खुशीने स्वीकार करतो. जेथे काही अन्याय व अत्याचार आढळला आणि तो थांबविणेही शक्य असेल, तर माणसाच्या श्रद्धेची व ईश्वराच्या प्रसन्नतेच्या प्राप्तीची अशी निकड आहे की, त्याने तो संपविण्याचा व नष्ट करण्याचा प्रयत्न करण्यात कसली कसूर व कमतरता करता कामा नये.

"मग तो अल्लाहच्या मार्गांत लढेल अगर ठार होईल, तो विजयी होईल, त्याला आम्ही श्रेष्ठ मोबदला अवश्य देऊ." (कुरआन ४:७४)

काहीही असले तरी ज्याला सामान्यजनांच्या अफूची गोळी म्हणता येऊ शकेल, असा इस्लाम धर्म नक्कीच नव्हे. कारण अन्याय व अत्याचाराच्या सर्व रुपांचा तो विरोध करतो व त्याच्याशी तडजोड व बचावू तह करणारा, घोर यातनांस पात्र असल्याचे मानतो.

प्रकरण तेरावे

# इस्लाम व मुस्लिमेतर अल्पसंख्य लोक

इस्लामी राज्यात मुस्लिमेतर अल्पसंख्य लोकांशी केले जाणारे वर्तन काही लोकांना अतिनाजूक विषय वाटतो. कारण त्यामुळे मुस्लिम व मुस्लिमेतर यामध्ये तिरस्कार व द्वेषभावना उत्पन्न होण्याची भीती असते. म्हणून असे लोक या विषयावर बोलण्यास मागेपुढे करतात.

## अल्पसंख्याकांची निराधार भीती

तरीही आमची अशी इच्छा आहे की पौर्वात्य ख्रिश्चनांशी मनमोकळेपणाने बोलावे व त्यांना असे विचारावे की त्यांना इस्लामी राज्याची भीती का वाटते? इस्लामी कायद्यापासून ते भ्यालेले आहेत की व्यावहारीक जीवनात त्यांची अंमलबजावणी होण्यास ते घाबरतात?

## कुरआन व अल्पसंख्य लोक

या दृष्टीने कुरआनच्या खालील आयती विचार करण्यासारख्या आहेत,

"जे लोक धर्माच्या बाबतीत तुमच्याशी युद्ध करीत नाहीत व तुम्हाला घराबाहेर काढीत नाहीत, अशा लोकांशी न्यायपूर्ण व उपकारात्मक वर्तन करण्यास अल्लाह तुम्हाला मनाई करीत नाही. अल्लाह न्यायपूर्ण वर्तन करणाऱ्यावर प्रेम करतो." (कुरआन ६०:८)

"आज पवित्र वस्तू तुमच्यासाठी उचित ठरविल्या गेल्या आहेत व ग्रंथवाल्या लोकांनी बळी दिलेले मांस (वैध मांस) खाण्याची अनुमती दिली गेली आहे. व तुम्ही बळी दिलेले मांस त्यांनाही उचित ठरविले गेले आहे. तसेच तुमच्या आधी ज्यांना ग्रंथ दिले गेले आहेत त्यांच्या चारित्र्यवान स्त्रियांही तुमच्याकरिता उचित ठरविल्या गेल्या आहेत." (कुरआन ५:५)

आम्हाला जे हक्क, कर्तव्ये व जबाबदाऱ्या दिल्या गेल्या आहेत तेच त्यांनाही दिले गेले आहेत. हाच धर्मशास्त्राचा एक नियम आहे. त्यांच्याशी चांगली वर्तणूक करण्याची त्यांना योग्य तो न्याय देण्याची व त्यांच्या उपासनेशी अगर इतर सक्तीच्या कर्तव्यांशी संबंध नसलेल्या सर्व हक्कांच्या व अधिकारांच्या संदर्भात आहे. त्याचा संबंध समाजातील कठीण प्रश्नाच्या अगर समाजातील लोकांच्या हक्कांशी संबंधित सर्व बाबतीत तसेच त्यांच्यात व मुस्लिमांत पूर्ण समानता स्थापन करण्याचा उपदेश या गोष्टींनी होतो. तसेच त्यांनी आपापसात मिसळण्यास गाठीभेठी घेण्यास एकमेकांबरोबर खाण्यापिण्यास अनुमती देऊन त्यांच्या व मुस्लिमांच्या दरम्यान चांगले संबंध स्थापन करु इच्छितो. सर्वांत मोठी गोष्ट अशी की विवाहासारखे भक्कम नातेही ग्रंथधारकांशी केले जाऊ शकते.

## सर आर्नल्डची साक्ष

इस्लामच्या या शिकवणीनुसार आचरण करण्याचा प्रश्न उरला तर त्याबाबतीत आमच्याकडून काही सांगण्याऐवजी आम्ही युरोपातील ख्रिश्चन साहित्यिकांचा आधार देत आहोत. ज्यामुळे ते अकारणच इस्लामचे समर्थन करताहेत, असा संशय वाटू शकणार नाही. सर आर्नल्ड आपल्या 'प्रीचिंग ऑफ इस्लाम' या पुस्तकात असे लिहितात,

'त्या काळी ख्रिश्चन व मुस्लिमांमध्ये जे प्रेमाचे संबंध असल्याचे आढळतात ही गोष्ट त्या लोकांनी बळाच्या अगर दडपणाच्या परिणामस्वरुप इस्लाम धर्मांचा स्वीकार केला नव्हता हे सिद्ध करते.' खुद्द इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांनी कित्येक ख्रिश्चन टोळ्यांशी तडजोडी केल्या व त्यानुसार त्यांचे रक्षण करण्याची जबाबदारी पत्करली व त्यांना त्यांच्या धर्मांनुसार आचरण करण्याच्या स्वातंत्र्याची हमी दिली. इस्लामच्या उदयापूर्वी ख्रिश्चनाच्या धार्मिक नेत्यांना जे अधिकार होते त्यांचे ते सर्व अधिकार व सत्ता त्यांना शिल्लक ठेवली.' (पान ४८)

'हिजरी सन पहिले यामधील अरब विजेत्यांनी अरब वंशीय ख्रिश्चनांशी जे औदार्याच्या रीतीचा अवलंब केला व याच रीतीची परंपरा त्यांच्या भावी पिढ्यांनीही पाळली, ते पाहून आम्ही ठामपणाने व विश्वासपूर्वक असे म्हणू शकतो की ज्या ख्रिश्चन समूहांनी इस्लाम धर्माचा स्वीकार केला होता, तो त्यांनी राजीखुशीने केला होता.' (पान ५१)

'जेव्हा मुस्लिमांचे सैन्य जॉर्डनच्या खोऱ्यात पोचले, तेव्हा माननीय अबु उबैध (र) यांनी फहील या ठिकाणी आपली राहुटी टाकली तेव्हा तेथील अरब वंशीय ख्रिश्चनांनी त्यांना असे लिहिले की - हे मुस्लिमांनो! आम्ही तुम्हाला रोमन लोकांपेक्षा जरी ते आमच्याच धर्माचे असले तरी श्रेष्ठ मानतो, कारण तुम्ही आम्हाला दिलेले वचन चांगल्या रीतीने पाळले आहे. तुमची आमच्यावर फार कृपा आहे, आम्हावर कसलाही अन्याय करीत नाही व त्यांच्या शासनापेक्षा आम्हांवर तुमचे शासन अधिक चांगले आहे कारण त्यांनी आमचे घरदार, धन व संपत्ती सर्व काही लुटले आहे.' (पान ५५)

सर आर्नल्ड पुढे असे लिहितात,

सीरिया प्रांतातील जनतेच्या भावनांशी अशी अवस्था होती. ई. सन ६३३ ते ६३९ च्या मोहिमेच्या काळात जेव्हा अरबांनी हळू हळू रोमन लोकांना सीरियातून बाहेर काढले, तेव्हा इ. स. ६३७ मध्ये दमास्कसमधील काही अरबांनी काही अटीवर तह केला. असे करुन त्यांनी अरबांच्या हल्ल्यापासून स्वत:ला वाचविले व त्याचबरोबर काही आर्थिक फायदेही पदरात पाडून घेतले. त्यानंतर थोड्याच काळात सीरियातील इतर शहरांतील रहिवाशांनीही त्यांचा कित्ता गिरविला. हम्स, आर्थूंसा, अरिथुसा, हीरो, पोलीस व इतर शहरे एका पाठोपाठ, तह व तडजोड करुन अरबांच्या स्वाधीन झाले. जेरुसलमच्या वयोवृद्ध धर्मगुरुनेही अशा तऱ्हेच्या अटीवर शहर

मुस्लिमांच्या ताब्यात देऊन टाकले. दुष्ट श्रद्धा असलेल्या बादशहांच्या दडपशाहीच्या कारभारामुळे त्यांना रोमन साम्राज्य व त्याच्या ख्रिश्चन सरकारशी संबंध असण्यापेक्षा मुस्लिमांचे धार्मिक औदार्य अधिक चांगले वाटले. हल्लेखोर सेनेच्या हल्ल्याच्या भीतीची पहिली लाट ओसरल्यानंतर या लोकांत अरब विजेत्यांबद्दल व त्यांच्या बाजूने एक खोलवर भावनात्मक खळबळ माजली.' (पान ५५)

इस्लामी राज्यासंबंधी एका मोठ्या ख्रिश्चन विद्वानाची ही साक्ष आहे. यानंतर ख्रिश्चन लोकांनी इस्लामी व्यवस्थेपासून भयभीत होण्याचे कारण उरते काय?

## धर्माबाबत कट्टरपणाला कोण बळी पडले आहेत मुस्लिम की मुस्लिमेत्तर

ख्रिश्चन लोक मुस्लिमांच्या धर्मांच्या बाबतीतील कट्टरपणाला भ्याले असणे शक्य आहे. हे जर खरे असेल, तर धार्मिक कट्टरपणाचा खरा अर्थ त्यांना समजला नाही, असे वाटते. जर त्यांना त्याचा खरा अर्थ जाणून घ्यायचा असेल तर तो खालील उदाहरणात सापडेल.

## धार्मिक न्यायालये

चर्चने जी धार्मिक न्यायालये स्थापन केली होती त्यांचा खरा हेतू स्पेनमधून मुस्लिमांचे उच्चाटन करण्याचा होता. या न्यायालयांनी मुस्लिमांना भयानक शिक्षा ठोठावल्या व त्यांना छळण्यासाठी असा घृणास्पद पद्धतीचा अवलंब केला जे त्यापूर्वी कधीही आढळून आले नव्हते. त्यांनी मुस्लिमांना जिवंत जाळले, त्यांची नखे उपसून काढली, डोळे बाहेर काढले गेले व त्यांच्या शरीराचे अवयव कापले गेले. या सर्व कृतांचा उद्देश मुस्लिमांना त्यांच्या धर्मापासून परावृत्त करुन, ख्रिश्चन धर्मश्रद्धेचे पालन करणारे बनविण्याचा होता.

पूर्वेत इस्लामी देशात वास्तव्य करणाऱ्या ख्रिश्चनांनाही अशा प्रकारच्या वागणुकीला कधीतरी तोंड द्यावे लागले आहे काय?

## मुस्लिमांची सर्रास कत्तल

पक्षपातीपणाची पूजा करणारे हे लोक युगोस्लाविया, अल्बानिया, रशिया व युरोपच्या अंमलाखाली असलेल्या उत्तर आफ्रिका, सोमालीलँड, केनिया, झांझीबार व मलायामध्ये शांतता व सुव्यवस्था राखण्याच्या नावाखाली व कधीकधी राष्ट्र शुद्धीकरणाच्या नावाखाली, मुस्लिमांची सर्रास कत्तल करीत आहेत.

## इथियोपिया धार्मिक कट्टरपणा व संकुचित दृष्टिकोनाचे एक उदाहरण

प्राचीन काळापासून इजिप्तबरोबर ऐतिहासिक, भौगोलिक, संस्कृतिक व धार्मिक नात्याने निगडित असलेला इथियोपिया देश हा धार्मिक संकुचितपनाचे आणखी एक उदाहरण

आहे. त्यात मुस्लिमांची तसेच ख्रिश्चनांची लोकसंख्या एकत्र मिसळलेली आहे. मुस्लिमांच्या लोकसंख्येचे प्रमाण ३५ ते ६५ टक्के असूनही, संपूर्ण देशात मुस्लिमांच्या मुलांना इस्लामी शिक्षण अगर अरबी भाषा शिकवण्याची कसलीही तरतूद अस्तित्वात नाही. मुस्लिमांनी स्वप्रयत्नांनी ज्या काही थोड्याशा खाजगी शाळा (धार्मिक शिक्षण देणाऱ्या) उघडल्या आहेत, त्यांच्यावर मोठमोठे कर लादण्यात येत आहेत. त्यांच्या मार्गात अनेक अडचणी निर्माण करण्यात येत आहेत व त्याच्या परिणामस्वरुप त्यांना अपयश येते व नंतर कोणालाही नवीन शाळा उघडण्याचे साहस होत नाही. इस्लामी शिक्षणाची प्रगती होणे अशक्य व्हावे असे प्रयत्न करण्यात येतात व शिकविणारेही ठराविक रुळलेल्या पद्धतीच्या चाकोरीबाहेर येऊ नयेत यावर कटाक्ष ठेवण्यात येतो.

## मुस्लिमांची दयनीय अवस्था

इटलीच्या हल्ल्यापूर्वी इतियोपियामध्ये अशी अवस्था होती की एखाद्या मुस्लिम ऋणकोने आपल्या ख्रिश्चन धनकोचे कर्ज जर मुदतीत परत केले नाही, तर सावकार त्याला आपला गुलाम बनवून घेत असे. अशा तऱ्हेने सरकारच्या डोळ्यादेखत मुस्लिमांना गुलाम बनवून त्यांची विक्री केली जात असे. त्यांना तऱ्हेतऱ्हेच्या यातनात झोकून दिले जात असे. मुस्लिम निग्रो एकूण लोकसंख्येच्या एकतृतीयांश असूनसुद्धा त्यांचे प्रतिनिधित्व करण्यास मंत्रीमंडळात कोणीही मुस्लिम मंत्री नाही किंवा इतर कोणत्याही महत्त्वाच्या अधिकारपदावर नाही.

इस्लामी देशांत वास्तव्य करणाऱ्या ख्रिश्चनांना कधीतरी अशा वागणुकीचा अनुभव अगर संबंध आला आहे काय? व त्यांचे धर्मबंधू आजसुद्धा मुस्लिमांशी ज्या प्रकारचे वर्तन करीत आहेत, तसाच व्यवहार जर त्यांच्याशी केला गेला तर त्यांना ते आवडेल काय? काहीही झाले तरी धार्मिक कट्टरपणाचा खरा अर्थ असा आहे.

## अल्पसंख्याक व आर्थिक स्वातंत्र्य

कम्युनिस्टांसमीप मानवी जीवन खऱ्या अर्थाने आर्थिक स्वातंत्र्याचेच दुसरे नाव आहे. थोड्या वेळापुरती ही कल्पना खरी मानली तरी इस्लामी देशांत वास्तव्य करणारे ख्रिश्चन लोक जीवनांतील या महत्त्वाच्या मूल्यापासून कधी वंचित राहिले आहेत काय? इस्लामी राज्याने त्यांना संपत्ती करण्यास, खरेदी करण्यास व धनसंपत्तीचा संचय करण्यास कधी मनाई केली आहे? किंवा केवळ परधर्माचे म्हणून शिक्षणापासून, हुद्यापासून अगर सरकारी हुद्यापासून कधी वंचित ठेवले आहे?

## इंग्रजांचा खोडसाळपणा

नैतिक व आध्यात्मिक जीवनाच्या संदर्भात, इस्लामी देशातील रहिवाशी ख्रिश्चनांना, त्यांची धर्मपरंपरा दडपली गेली अशा एकाही दडपणशाहीला तोंड द्यावे लागले नाही. वर्तमान

काळात याची जी दोन उदाहरणे आढळतात. त्यांना जाणूनबुजून उद्युक्त करणारे ब्रिटिश साम्राज्य, त्याचे खरे कारण होय. तसे झाल्याने भिन्नभिन्न लोकसमूहांत विषाची बीजे पेरली जावीत व त्यांच्यात आपापसात वैमनस्य वाढावे.

## जिझिया व त्याची हकीकत

काही मुस्लिम विरोधी लोक जिझियाचे उदाहरण देऊन मुस्लिमेत्तराकडून ते वसूल करण्याचे प्रमुख कारण धार्मिक असहिष्णुता होती असे म्हणतात. या आरोपाचे सर्वोत्कृष्ट उत्तर आर्नल्डने दिले आहे. त्याने आपले 'प्रीचिंग ऑफ इस्लाम' या पुस्तकात लिहिले आहे की, 'या उलट, मुस्लिम असलेल्या काही इजिप्शियन शेतकऱ्यांना जेव्हा सैनिकी सेवेतून वगळले जात होते, तेव्हा ख्रिश्चनावर लादला जात होता तसाच कर, मोबदल्याच्या स्वरुपांत त्यांच्यावरही लादला जात असे.' (पान ६२)

पुढे जाऊन सर आर्नल्ड असे लिहितात,

मुस्लिम पुरुषांना जशी सक्तीची सैनिकी सेवा करावी लागते, तशा सेवेऐवजी वर वर्णन केल्याप्रमाणे सुदृढ प्रकृतीच्या पुरुषाकडून जिझिया कर वसूल केला जात होता. तसेच ख्रिश्चन लोक मुस्लिम सेनेत दाखल होऊन सैनिक सेवा करत, तेव्हा त्यांना या करापासून वगळल्याचे घोषित करण्यात येत असे. म्हणूनच अन्ताकियाच्या शेजारी वास्तव्य करणाऱ्या अल जुराजमाव्या ख्रिश्चन समूहाशी, मुस्लिमांनी अशा अटीवर तह केला होता की ते त्यांचे मित्र राहतील व युद्धांत त्यांच्या बाजूने सहभागी होतील. याच्या मोबदल्यात त्यांना जिझिया द्यावा लागणार नाही, उलट युद्धभूमीवरील लुटीच्या मालात त्यांनाही योग्य वाटा दिला जाईल.

जिझिया हे मुस्लिमांच्या अनुदारपणाचे फळ नसून जे लोक सैनिकी सेवा करीत नसत अशा सर्व पुरुषांकडून धर्माचा भेदभाव न करता वसूल केला जाणारा एक कर होता.

## कुरआन मध्ये जिझियाचा आदेश

या बाबतीतील संबंधित आयतीवर दृष्टिक्षेप टाकल्यास तो निष्फळ होणार नाही. कुरआनमध्ये असे सांगितले आहे,

''जे ग्रंथधारक अल्लाहवर व निवाड्याच्या दिवसांवर श्रद्धा बाळगत नाहीत व जे काही अल्लाहने व त्याच्या प्रेषित मुहम्मद (स) यांनी निषिद्ध ठरविले आहे त्यांना वर्ज्य करीत नाहीत व सत्य धर्माचा स्वीकार करीत नाहीत, त्यांच्याशी तोपर्यंत युद्ध करा, जोपर्यंत ते आपल्या हातांनी जिझिया देत नाहीत व लहान होऊन राहात नाहीत.'' (कुरआन ९:२९)

या आयतीत मुस्लिमांना केवळ अशाच मुस्लिमेत्तराशी युद्धास उभे राहण्यास सांगण्यात आले आहे जे इस्लामविरुद्ध युद्धास उभे राहतात. त्याचा मुस्लिम देशांत वास्तव्य करणाऱ्या मुस्लिमेत्तराशी कसलाही संबंध नाही.

## वर्तमान अस्वस्थपणास जबाबदार

मुस्लिमांत व मुस्लिम देशातील मुस्लिमेत्तर रहिवाशांत जे काही मतभेद व तंग वातावरण सध्या आढळते, ते वसाहतवादी, साम्राज्यवाद्यांची व कम्युनिस्टांची निपज आहे, हे सत्यही आम्ही शेवटी सांगून टाकू इच्छितो.

मुस्लिम व ख्रिश्चन या दोहोंच्या कच्च्या दुव्याशी कम्युनिस्ट परिचित आहेत म्हणून ते मजुरांना भेटतात तेव्हा त्यांना सांगतात की 'जर तुम्ही कम्युनिस्ट चळवळीला पाठिंबा दिलात तर सर्व कारखाने आम्ही तुमच्या ताब्यात देऊ. किसानांना जमिनीच्या मालकीहक्काची सुखस्वप्ने दाखवितात. बेकार विद्यार्थ्यांना म्हणतात की 'जर तुम्ही कम्युनिजमचा स्वीकार केलात तर तुमच्या योग्यते व पात्रतेनुसार तुमच्यासाठी नोकऱ्या उपलब्ध करुन देण्यात येतील. लैंगिक स्वैराचाराला बळी पडलेल्या नवयुवकांना असा स्वतंत्र समाज निर्माण करण्याचे वचन देऊन त्यांना सोकविण्याचा प्रयत्न करतात, की जेथे कायद्याच्या व रुढींच्या कसल्याही प्रतिबंधाविना, त्यांना त्यांच्या सर्व इच्छावासना विनासायास पुऱ्या करता येतील.

दुसरीकडे ख्रिश्चनांशी बोलताना असे म्हणतात की, 'जर तुम्ही कम्युनिजमला पाठिंबा दिलात, तर धर्माच्या नावावर माणसांत भेदभाव करणाऱ्या इस्लामला आम्ही नष्ट करुन टाकू पण,

"त्यांच्या तोंडून निघणारी गोष्ट मोठी आहे, ते मात्र असत्य बडबडत असतात."

(कुरआन १८:५)

## इस्लामवर दोषारोप

तात्पर्य असे की धर्माच्या आधारावर इस्लाम माणसमाणसांत भेदाभेद करतो असे म्हणणे म्हणजे केवळ एक खोटा आरोप आहे. कारण इस्लाम तर धर्म व श्रद्धा या बाबतीत कसलाही भेदभाव न करता सर्व मानवांना त्यांचे मूलभूत मानवी हक्क प्रदान करतो. तो माणसांना शुद्ध माणुसकीच्या आधारावर एकत्र करतो व त्यांना पसंत असलेल्या धर्माचा स्वीकार करण्याच्या व त्यानुसार आचारण करण्याच्या संपूर्ण स्वातंत्र्याची हमी देतो.

याच आधारावर मुस्लिमांप्रमाणेच, इस्लामी देशातील रहिवाशी ख्रिश्चन लोक आपल्या शेजाऱ्यांशी सुखाने जीवन व्यतित करण्याची इच्छा करतात व त्यांच्या बरोबरचे आपले ऐतिहासिक संबंध पूर्वीप्रमाणेच सुरळीत राखण्याची आकांक्षा धरतात. त्यांचे व मुस्लिमांचे, दोघांचेही हित सुरक्षित राहील अशी इच्छा करतात, अशी मला आशा वाटते. तसेच आमचे ख्रिश्चन बंधू या कम्युनिस्ट व साम्राज्यवादी दुष्टांच्या बोलण्यास फसणार नाहीत अशी आशा वाटते.

प्रकरण चौदावे

# इस्लाम व कम्युनिझम

निस्संशय इस्लाम जीवनातील सर्व प्रकारच्या चांगुलपणाचा, सद्‌गुणांचा संयोग तसेच निकोप जीवनमूल्यांचे नाव आहे. हा एक शाश्वत धर्म असून मानवी पिढ्यांच्या सुधारणेसाठी कायदा पद्धत आहे. गेली चार शतके इस्लामी समाज ज्या प्रकारच्या कठीण तणावात व असंतोषात गुरफटलेला आहे. त्यामुळे आर्थिक समस्यांशी निगडित असलेला इस्लामी कायद्याचा भाग तुंबला गेला आहे व स्थगित झाल्यासारखा आहे; तसेच आपले निरंतर विकास कार्य पुढे चालू ठेवू शकत नाही. म्हणून आपल्या आध्यात्मिक व वैचारिक शुद्धीकरणासाठी इस्लामी श्रद्धेचा अवलंब करुन आर्थिक समस्या सोडविण्यासाठी कम्युनिझमला मार्गदर्शक बनवून घ्यावे हेच अधिक चांगले नाही काय? कारण असे केल्याने आमच्या आर्थिक अडचणीही दूर होतील व आमच्या सामाजिक व्यवस्थेचा कोणत्याही अंगावर त्याचा अनिष्ट परिणाम होणार नाही, अशा रीतीने आम्ही आमच्या चरित्र्याचे, सामाजिक रुढीचे व मूल्यांचे रक्षण करु शकू. इतकेच नाही तर वर्तमान युगातील सर्वांत आधुनिक आर्थिक दृष्टिकोनाचा लाभही घेऊ शकू.

## कम्युनिस्ट तज्ञ व अनुमान

हेच कम्युनिस्टांचे आवडते अनुमान आहे. दीर्घकाळपर्यंत ते खेळत असलेला हाच राक्षसी डाव आहे. सुरुवातीला तर या लोकांनी इस्लामविरुद्ध उघडउघड आक्रमक व वैराची रीती व नीती अवलंबली व त्याच्यावर निरनिराळ्या शंकाकुशंका घेऊन त्यांचे अवमूल्यन करण्याचा प्रयत्न केला. परिणामत: त्यांच्या अशा अवरोधामुळे मुस्लिमांच्या इस्लामी भावना अधिक उर्जित होऊन दृढ झाल्या. हे पाहिल्यावर त्यांनी आपली पद्धत बदलून फसवाफसवीचा मार्ग अवलंबविण्याचे ठरविले. म्हणून सध्या त्यांनी अवलंबलेली तर्कप्रणाली काहीशी अशा प्रकारची आहे.

'कम्युनिझम इस्लाम धर्मात कसलीही ढवळाढवळ करीत नाही. कारण तात्त्विक दृष्टीने तर ते सामाजिक न्यायाचेच दुसरे नाव आहे. राज्यावर आपल्या राज्यातील लोकांच्या बहुमोल जीवनावश्यक गरजा भागविणे व त्या सर्व वस्तु गोळा करणे या राज्याच्या कर्तव्याचे अधिक स्पष्टीकरण करतो. म्हणून इस्लाम कम्युनिझमच्या विरुद्ध आहे हे सिद्ध करुन, इस्लाम सामाजिक न्यायाच्या विरुद्ध व त्याचा शत्रू आहे असे तुम्ही इस्लामी जगताला दाखवून देऊ इच्छिता काय? इस्लाम सामाजिक न्यायाविरुद्ध खचितच नाही; तसेच सामाजिक न्यायाला पोषक असणाऱ्या कोणत्याही जीवनपद्धतीविरुद्ध तो असूच शकत नाही.

## पाश्चिमात्य साम्राज्यवादाचा पावलावर पाऊल

हा तर्क पाश्चिमात्य साम्राज्यवाद्याच्या तकपिक्षा काही वेगळा नाही. कम्युनिस्टांप्रमाणेच साम्राज्यवाद्यानीही सुरवातीला उघडउघड हल्ले केले; पण त्यांच्या हल्यामुळे

मुस्लिमात अधिकच जागृती निर्माण झाली. हे पाहून त्यांनी आपले तंत्र बदलले व असे म्हणण्यास सुरुवात केली की, 'पाश्चिमात्यांची केवळ हीच इच्छा आहे की पौर्वात्यांना सुसंस्कृत बनवावे. इस्लाम वर्तमान संस्कृतिचे मूळ असल्याने तो कधीही संस्कृतीविरुद्ध जाऊ शकणार नाही. त्यांनी मुस्लिमांची अशी खात्री करुन दिली की, ते त्यांचे रोजे (उपवास) नमाज व आपले वैराग्य त्याग न करता, या नवीन संस्कृतीचा अंग झाले, की मुस्लिमांत इस्लामी स्वभाव व आचरण जिवंत ठेवण्याची पात्रताच उरणार नाही. काही पिढ्यानंतर ते कायमचे व पूर्णपणे नव्या संस्कृतीचे गुलाम बनतील, ही गोष्ट ते चांगल्या रीतीने जाणत होते. त्यांचा अंदाज अगदी अचूक होता म्हणूनच मुस्लिमांत या नवीन संस्कृतीने प्रभावित झालेले असे लोकही निघाले ज्यांना इस्लामबद्दल कसलेही ज्ञान नव्हते. उलट त्यांच्यात अकारणच इस्लामबद्दल तिरस्कार व द्वेष निर्माण झाला.

## कम्युनिस्टांचा खरा हेतू

हाच डाव कम्युनिस्ट सध्या इस्लामी देशात खेळू इच्छितात. ते मुस्लिमांना असे सांगतात की एका आर्थिक पद्धतीच्या रुपाने तुम्ही कम्युनिझमचा स्वीकार करुनही, तुम्ही मुस्लिम राहाल. तुमच्या नमाज, रोजे, व वैराग्याच्या कर्मावर कसलीही बंधने असणार नाहीत. कारण कम्युनिझम केवळ एक आर्थिक पद्धत आहे. ती माणसाच्या धार्मिक बाबतीत ढवळाढवळ करीत नाही. म्हणून मुस्लिमांनी कम्युनिस्टांची आर्थिक पद्धत अवलंबली की मुस्लिमांच्या दर्जाने जगणे त्यांना मुश्किल होईल, ही गोष्ट कम्युनिस्ट चांगले जाणतात. व काही वर्षाच्या आतच त्यांची विचारप्रणाली धुऊन स्वच्छ करुन, त्यांना आपल्या जीवनप्रणालीचा आकार देता येईल. त्यांच्या जीवनातील इस्लाम व त्याचे उरलेसुरले सर्व प्रभाव नष्ट करुन टाकण्यात येतील, हे ते चांगले जाणतात.

कारण वर्तमान युग अतिवेगाने पुढे जात आहे व त्यात मोठमोठे दूरगामी फेरबदल अगदी सहज रीतीने आणले जाऊ शकतात. दु:खाची गोष्ट अशी, की ही सर्व सत्ये अस्तित्वात असूनही, असंख्य मुस्लिम स्वखुशीने कम्युनिस्टांच्या या लाघवी बोलण्यास बळी पडत असतात. कारण असे केल्यानेही आपली रसहीन इस्लामी कर्तव्ये पार पाडण्यापासून वाचण्याचे एक निमित्त त्यांच्या हातात मिळते. स्वत:चा मार्ग स्वत: तयार करण्याची, चिंतनमनन करण्याची तसेच विधायक कार्यात आपली शक्ती खर्च करण्याच्या कटकटीपासून त्यांना सुटका मिळते. सतत मुक्त व मोकळे असावे व अफूचे व्यसन असलेल्या माणसासारखे नुसती स्वप्ने रंगवित बसण्याखेरीज काही काम करायला लागू नये. कोणत्याही प्रश्नाचा स्वत:ला विचार करायला लावू नये व इतरांनीच त्याच्या प्रश्नाविषयी चिंतन करावे, त्याला मार्गदर्शन करावे व इतरांच्या सांगण्यानुसार डोळे मिटून त्यांनी वर्तन करावे, इतकेच त्यांचे काम असावे.

## इस्लाम कम्युनिझमविरोधी आहे

इस्लामच्या मूलतत्त्वाशी तिचा संघर्ष होत नाही, तसेच बदलत्या परिस्थितीनुसार मुस्लिम समाजाच्या एखाद्या समस्येच्या सोडवणुकीच्या मार्गांचा ज्यात समावेश आहे, अशा कोणत्याही जीवनपद्धतीचा, तात्त्विक रुपाने इस्लाम विरोध करीत नाही. ही गोष्ट येथे आम्ही स्पष्ट करु इच्छितो, परंतु कम्युनिझमचा इस्लामी जीवनपद्धतीशी सैद्धांतिक व तात्त्विक दृष्टीने विरोध असल्या कारणाने वरकरणी काही बाबतीत इस्लामचे कम्युनिझमशी साम्य असले, तरी ते एकमेकांपासून अगदी वेगळे आहेत. इस्लामी सर्वश्रेष्ठ जीवनपद्धतीचा त्याग करून मुस्लिम कम्युनिझमचा, भांडवलवादाचा किंवा भौतिकवादी समाजवादाचा अंगिकार करु शकत नाहीत. कारण त्यांचा इस्लामशी कसलाही संबंध नाही, उलट खोलवर व महत्त्वाचा फरकच आहे. काही बाबतीत जरी इस्लामशी साम्य असल्याचे आढळते, तरी अल्लाहने आपल्या पवित्र ग्रंथात स्पष्टपणे असे सांगितले आहे,

"व जे लोक अल्लाहने अवतरलेल्या नियमानुसार आदेश देत नाहीत, ते अगदी सत्य नाकारणारे आहेत." (कुरआन ५:४४)

कम्युनिझमचा अंगीकार केल्याने आम्ही मुस्लिम राहू शकतो काय? याचे उत्तर ठामपणे नकारात्मक आहे. कारण कम्युनिझम केवळ एक आर्थिक सुधारणांचा कार्यक्रम नाही. जे लोक या स्वरुपात कम्युनिझम सादर करतात त्याची एकतर फसगत तरी झालेली असते किंवा त्यांचा हेतू व नियम वाईट असून ते इतरांची फसगत करु इच्छितात. सत्य असे आहे की कम्युनिझम आपल्या तत्त्वात व आपल्या प्रत्यक्ष व्यवहारात इस्लामच्या नेमका उलट आहे, म्हणून या दोहोंमध्ये संघर्ष असणे अटळ आहे.

## मतभेदाचे तात्त्विक पैलू

तात्त्विक दृष्टीने इस्लाम व कम्युनिझममध्ये फरकांचे जे नानाविध पैलू आढळून येतात, त्याचे वर्णन पुढीलप्रमाणे केले जाऊ शकते.

## जडवादी दृष्टिकोन

पहिली गोष्ट अशी की कम्युनिजम एक शुद्ध जडवादी व भौतिकवादी दृष्टिकोन आहे. त्याची वास्तवता एवढीच आहे, की ज्यांचे आम्हाला ज्ञानेंद्रियांद्वारा ज्ञान होऊ शकते, जी सत्ये आमच्या ज्ञानेंद्रियापलीकडची आहेत, ती सर्व अंधश्रद्धेची भेंडोळी असून त्यांना कसलीही वास्तवता नाही. म्हणून त्यांच्यासाठी माणसाला कसल्याही प्रकारची भीती बाळगण्याचे काहीएक कारण नाही. म्हणून एंजिल्सने असे लिहिले होते 'भौतिक घटक हेच केवळ जीवनातील सत्य आहे. त्याचप्रमाणे या भौतिकवाद्यांचा एक प्रदर्शन आहे. तसेच ते आपल्या सभोवतालच्या भौतिक

वातावरणांचे प्रतिबिंब आहे. इस्लामी आत्मा याव्यतिरिक्त त्याला कसलीही वास्तवता नाही. यावरुन हे उघड आहे की, कम्युनिझम एक शुद्ध जडवादी दृष्टिकोन असून, त्याच्याजवळ मानव जीवनातील सर्व आध्यात्मिक प्रदर्शन हा चेष्टेचा विषय आहे व तो अशास्त्रीय विचाराची व दृष्टिकोनाची फल निष्पत्ती आहे.'

## मानवतेची हलकी व निकृष्ट कल्पना

मानवी जीवनाची व मानवी प्रयत्नांची ही कल्पना इतक्या निकृष्ट दर्जाची आहे की, इस्लाम तिच्याशी कधी सहमत होऊच शकत नाही. त्याच्यासमोर माणसाचे स्थान अतिचांगले व श्रेष्ठ आहे. तसेच त्याचा देह जड आहे व तो जमिनीवर चालतो. त्याच्या विचाराची व आत्म्याची भरारी अमर्याद असते म्हणून त्याच्या भौतिक मानवी गरजासुद्धा कार्लमार्क्स म्हणतो तसे, केवळ अन्न, निवारा व रोजगारा पुरतेच मर्यादित नाही.

## एक भ्रम

कम्युनिझमचा केवळ अर्थिक कार्यक्रमाचा आम्ही अवलंब केला आणि अल्लाह व त्याचे प्रेषित मुहम्मद (स) यांच्यावरील मूलभूत श्रद्धा व सिद्धांतापासून आम्ही परावृत्त असणार नाही. तसेच आमच्या आध्यात्मिक पद्धतीचाही आम्ही त्याग करणार नाही, मग कम्युनिझमचा हा भौतिकवादी दृष्टिकोन आमच्या जीवनावर प्रभाव कसा टाकू शकेल? असा प्रश्न वाचकांच्या मनात या ठिकाणी उद्‌भवणे साहजिक आहे. कारण कम्युनिझम केवळ एक आर्थिक सुधारणांचाच कार्यक्रम आहे व त्या दृष्टीने या गोष्टीवर प्रभाव व परिणाम होणे अशक्य आहे. हीच चुकीची समजूत आहे. याचे कारण असे की, खुद्द कम्युनिझमच्या तत्त्वानुसार कोणत्याही राष्ट्राचा आर्थिक कार्यक्रम त्या राष्ट्राच्या भौतिक जीवनतत्त्वाहून वेगळा असूच शकत नाही. उलट या दोहोंचा एकमेकांशी घनिष्ट संबंध असतो. त्यांना एकमेकांपासून वेगळे करुन ते समजलेच जाऊ शकत नाही. कारण त्यांचा पाया एकाच आर्थिक व्यवस्थेवर असतो व त्यांची ठेवणसुद्धा भौतिकवादी जीवनसिद्धांतांवर असते. हेच सत्य कम्युनिस्ट साहित्यिकांनी आपल्या साहित्यात सविस्तरपणे प्रस्तुत केलेले आहे. नाहीपेक्षा मार्क्स व एंजिल्स यांनी लिहिलेल्या पुस्तकावरचा दृष्टिक्षेप, हे सत्य समजण्यास पुरेसे आहे.

## इतिहासाची वर्गसंघर्षावर धारणा

कम्युनिझम वर्गसंघर्षावर अधिष्ठित भौतिकवादावर विश्वास बाळगतो, तो विरोधी पक्षातील लढा भांडवलवादी व श्रमिक वर्गसंघर्ष अटळ असल्याचे मानतो. हेच ते गूढ तत्त्व आहे जे माणसांच्या सर्व आर्थिक व भौतिक प्रगतीचे मूळ आहे. आजपर्यंत जी प्रगती झाली आहे, ती याच वर्गकलहाची फलनिष्पत्ती आहे. आपल्या प्रगतीसाठी मानवतेला गुलाम पद्धत, जहागीरदारी

पद्धत व भांडवलवादी पद्धतीहून अनेक युगांपर्यंत जावे लागेल. तेही याचेच फळ आहे आणि याच मार्गाने व माध्यमातून ते आपले उद्दिष्ट म्हणजे कम्युनिस्ट क्रांतीप्रत पोहोचू शकतील. वर्गकलहावर आधारलेला हाच भौतिकवादाचा दृष्टिकोन आहे. त्याच्या मार्गदर्शनात कम्युनिस्ट आपले तत्त्वज्ञान बरोबर असल्याचे सिद्ध करण्याचा प्रयत्न करीत असतात व हाच तात्त्विक आधार नजरेसमोर ठेवल्याने, सध्याच्या सैद्धांतिक लढ्यात कम्युनिजमचाच विजय होईल अशी त्यांची खात्री आहे. कम्युनिझम वर्गसंघर्षावर आधारलेला भौतिकवाद यांच्या दरम्यान शास्त्रीय कार्यकारण संबंध आहे असे ते मानतात. त्यामध्ये ईश्वर, त्याचे प्रेषित मुहम्मद (स) व धर्म यांना मुळातच कसलाही वाव नसतो; कारण त्यांच्या दृष्टीने या सर्व बाबी केवळ आर्थिक तत्त्वांची निपज असून त्यांच्या आर्थिक पार्श्वभूमीहून वेगळे असे कायमचे व महत्त्वाचे अस्तित्व नाही. म्हणून मानव जीवनातील वास्तविक ध्येय अगर लक्ष्य ठरविण्याच्या दृष्टीनेही ते निरुपयोगी व कुचकामी आहेत. जीवनात जे काही मूल्य असेल तर ते आर्थिक उत्पादनाच्या साधनांनाच आहे. कारण त्यांत बदल झाल्याने मानव जीवनावर त्याचा परिणाम घडून येतो व तिच्यात क्रांतीचा जन्म होतो. कम्युनिस्टांच्या या दृष्टिकोनातील चुकीचा प्रत्यय या गोष्टीने चांगला व स्पष्ट रीतीने येऊ शकतो की, अशी मोठमोठी प्रतिपादने व दावे करुनसुध्दा इस्लामने आणलेल्या क्रांतीपूर्वी, अरब द्वीपकल्पात एखादी क्रांती झाल्याचे दाखवून देऊ शकत नाही, की अरबांच्या आर्थिक साधनांत काही असे बदल घडून आल्याचेही सिद्ध करु शकत नाही. त्यांना इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांनी आणलेला क्रांतीचा आधार म्हटले जाऊ शकते व जगाला एका नव्या जीवनपद्धतीशी परिचय करुन देण्यास कारणीभूत ठरु शकते.

## निरीश्वरवादी जीवनपद्धत

इस्लाम व कम्युनिझम परस्परविरोधी आहेत, हे यावरुन सिद्ध होते. ते दोन्ही एकच आहेत, असे कदापि म्हटले जाऊ शकत नाही. इस्लामच्या दृष्टीने 'ईश्वराची कृपा व त्याची माया' सर्व निर्मिलेल्या वस्तूवर असते व त्यांच्या पासून सर्वांना समान लाभ प्राप्त होत असतो. तो स्वयंभू ईश्वरच आपल्या दासांच्या मार्गदर्शनासाठी प्रेषित पृथ्वीवर धाडीत असतो. जेणेकरुन त्यांनी लोकांना आर्थिक परिस्थितीहून कितीतरी महान व श्रेष्ठ असलेल्या वास्तवतेवर म्हणजे इस्लामच्या सन्मार्गावर चालवावे. या उलट कम्युनिझममध्ये मानव स्वभावाचे व प्रकृतीचे सर्व टप्पे वर्गकलहाचे व संघर्षाच्या परिणामस्वरुप असतात. त्यात ईश्वरेच्छेला अगर अन्य कसल्याही प्रेरक तत्त्वाला निश्चितपणे कसलाही प्रवेश नसतो किंवा हस्तक्षेप नसतो. जे काही आहे ते केवळ आर्थिक स्थिती आणि तिच्या दबावाखाली व दडपणाखाली उफाळून येणाऱ्या गरजा हे मुख्य आहे. कोणताही मुस्लिम, मुस्लिम राहून व इस्लामच्या सत्य मार्गावर श्रद्धा बाळगून, कम्युनिझमच्या या तत्त्वज्ञानावर कसा विश्वास ठेवू शकतो व त्याचा एकनिष्ठ सेवक कसा होऊ शकतो ?

## कम्युनिझमचा निषेधात्मक सिद्धान्त

इस्लाम व कम्युनिझममध्ये महत्त्वाचा व ठळक दुसरा फरक असा आहे की, माणूस भौतिक व आर्थिक परिस्थितीपुढे विवश असतो व एखाद्या बाहुल्यापेक्षा त्यांचे अधिक महत्त्व नसते. असा नकारात्मक दृष्टिकोन कम्युनिझम माणसाबाबत बाळगतो. कार्ल मार्क्स असे लिहितो की, 'माणसाचे सामाजिक, राजकीय व वैचारिक जीवन, आर्थिक परिस्थिती जसे घडविते तसेच बनत असते. मानवातील प्रेरणा आपली सामाजिक परिस्थिती निर्माण करु शकत नाही. उलट सामाजिक परिस्थितीच मानवात प्रेरणा व चेतना निर्माण करते.

## मानवाबाबत इस्लामचा दृष्टिकोन

या उलट मानवाच्या बाबतीत इस्लामचा असा दृष्टिकोन स्वीकारार्ह आहे की माणूस स्वतंत्र निश्चय व अधिकार यांचा धनी असतो. तो परमश्रेष्ठ ईश्वराच्या इच्छेखेरीज इतर कशाच्याही अधीन नसतो. कुरआनचे सांगणे आहे,

"अंतरिक्षात व जमिनीच्या दरम्यान जितक्या वस्तू आहेत त्या सर्वांची घडण व सजावट त्याने (ईश्वराने) आपल्याकडून तुमचेसाठी केली आहे." (कुरआन)

अधिकार व शक्तीच्या बाबतीत मानवाला जगात सर्वश्रेष्ठ स्थान प्राप्त आहे व येथील शेष सर्व मानवाच्या सेवेसाठी आहेत. ही वास्तवता इस्लाम अशा रीतीने उघड करून दाखवितो. इस्लामचेच उदाहरण आम्ही देऊ शकतो. त्याची प्रगती वर्गकलहाच्या भौतिक तत्त्वावर अगर नियमांवर बांधलेली नाही. कार्ल मार्क्सच्या म्हणण्यानुसार आर्थिक परिस्थितींना मानवाचे भाग्य घडविण्यात खरे व निर्णायक महत्व असते व माणूस तिच्यापुढे विवश असतो. तसा विचार प्रारंभीच्या मुस्लिमांच्या मनात एका क्षणापुरताही आला नसेल. त्या मुस्लिमांनी स्वेच्छेने व हेतू पुरस्पर आपल्या आर्थिक व्यवस्थेची बांधणी व उभारणी अल्लाहच्या आदेशानुसार व त्याचे प्रेषित मुहम्मद (स) यांच्या शिकवणीनुसार केली होती. ही पद्धत त्यांच्या इतर सामाजिक संबंधाबाबतही होती. म्हणूनच जेव्हा त्यांनी गुलामांना मुक्त केले, तेव्हा त्यामागे कोणतीही आर्थिक अगर भौतिक लाभाची भावना कार्यरत नव्हती. उलट जहागीरदारी पद्धत कधीही इस्लामी जगातात स्थापन न होऊ देणाऱ्या इस्लामी शिकवणीचाच तो परिणाम होता. खरेच जहागीरदारी पद्धत शतकानुशतकांपासून युरोपातील इतर भागांत चालत आली होती.

## समूहाचे महत्त्व अतिशयोक्ती पूर्ण

इस्लाम व कम्युनिजवर चर्चा करताना तिसरी गोष्ट आमच्या मनात असली पाहिजे ती ही की, 'खाजगी संपत्तीच्या' प्रकरणात म्हटल्याप्रमाणे कोणत्याही आर्थिक पद्धतीला तिच्या सामाजिक तत्वापासून वेगळे काढलेच जाऊ शकत नाही. म्हणून कम्युनिजमला एका आर्थिक व्यवस्थेचा दर्जा प्राप्त झाल्यानंतर आम्ही कम्युनिस्टांच्या अशा तत्त्वांचा अंगीकार करण्यापासून

वाचूच शकत नाही. हे तत्व असे सांगते की माणूस हा आर्थिक परिस्थितीचे एक विवश बाहुले आहे व आर्थिक तत्त्वे हीच संपूर्ण सामाजिक क्रांती घडवून आणणारी कार्यशील शक्ती असल्याचे मानते. आर्थिक पद्धतीने कम्युनिस्ट तत्त्व हे अनिवार्य व अटळ फळ असून त्यानुसार मानव जीवनात समूहाला अगर समाजाला निर्णायक महत्त्व असते व व्यक्तीचा दर्जा त्याच्या सेवकापेक्षा अधिक काही नसतो.

## इस्लाममध्ये व्यक्तीचे महत्त्व

हा दृष्टिकोन इस्लामी दृष्टिकोनाच्या अगदी उलट आहे. इस्लामी दृष्टिकोनानुसार मूळ महत्त्व समाजाला नसून व्यक्तीला आहे. याच कारणामुळे आपले उद्दिष्ट साधण्याकरिता, समाजापेक्षा व्यक्तीला अधिक महत्त्व देतो. इस्लाम माणसाच्या अंतरात्म्याला इतका ज्ञानपूर्ण व सभ्य करु इच्छितो की, त्याने स्वेच्छेने आपल्या सर्व सामाजिक जबाबदाऱ्या व कर्तव्ये पार पाडावीत. आपला व्यवसाय त्याने निवडावा, कारण कोणताही व्यवसाय सोडण्यासही त्याच्यावर काही बंधन नसते.

शासकाने जर ईश्वराने ठरवून दिलेल्या मर्यादांचे उल्लंघन केले तर इस्लामच्या प्रत्येक व्यक्तीला शासनाच्या आदेशाचे पालन करण्यास नकार देण्याचा अधिकार प्राप्त असतो. अशा तऱ्हेने, इस्लाम प्रत्येक व्यक्तीला समाजाच्या नैतिक तत्त्वांचा रक्षक बनवितो व सर्व सामाजिक बिघाड व दोष दूर करणे, हे व्यक्तीचे कर्तव्य असल्याचे घोषित करतो. कम्युनिझममध्ये व्यक्तीला कसलेही महत्त्व नसते व संपूर्ण आर्थिक उत्पादनाच्या साधनांवर नियंत्रण ठेवण्याचा हुकूमशाही शासनासमोर त्याला हतबल करुन ठेवले जाते, अशा प्रकारच्या समाजात इस्लामचा हा मानस व हेतू पुरा होऊच शकत नाही, हे स्पष्ट आहे.

## सामाजिक संबंधाचा कम्युनिस्ट आधार

शेवटी, या संदर्भात ही गोष्ट आम्ही विसरता कामा नये की कम्युनिस्ट तत्त्वानुसार सामाजिक संबंधाची बांधणी व तिचा क्रम या संदर्भात, प्रमुख व मूळ महत्त्व केवळ आर्थिक तत्त्वानांच आहे. मानव जीवनातील आर्थिक बाजूला जे महत्त्व आहे, त्याचा इस्लाम निषेधही करीत नाही किंवा ते कमीही करीत नाही. एका राष्ट्राच्या जीवनात तेथील आर्थिक सुस्थितीला जे महत्त्वाचे स्थान असते, त्याकडेही इस्लाम डोळेझाक करीत नाही, तसेच नैतिक व सामाजिक आचरणावरील त्याच्या प्रभावाचाही इन्कार करीत नाही. परंतु जीवन म्हणजे आर्थिक समस्यांखेरीज बाकी काहीच नाही, या गोष्टीचा इस्लाम तीव्र विरोध करतो. तसेच माणसाचे आर्थिक प्रश्न सुटले तर त्याचे इतर प्रश्न आपोआपच सुटतील, असे कम्युनिस्टांप्रमाणे इस्लाम मानत नाही. या वास्तवतेचे अधिक स्पष्टीकरण, व्यवहारी जीवनातील खालील उदाहरणांनी चांगले होऊ शकते.

## आर्थिक समस्या सोडविणे हा माणसाच्या दुःखनिवारणाचा मार्ग नव्हे

एकसारखी आर्थिक स्थिती असलेल्या दोन तरुणांचे उदाहरण घ्या. यातील एकजण आपल्या आंधळ्या-बहिऱ्या इच्छा वासनांचा गुलाम आहे व भोगविलासप्रिय आहे. दुसरा भोगविलासाऐवजी शिक्षण प्राप्त करण्यात व ज्ञानार्जन करुन आपली बौद्धिक शक्ती वाढविण्यात सदैव मग्न आहे. प्रश्न असा उद्‌भवतो की या दोघा तरुणांना समान वागणूक दिली जावी काय व त्यांच्या अवस्थेत कसलाही फरक नाही काय? या दोहोंचे जीवन सारख्याच प्रमाणात भलेपणा, चांगुलपणा व सफलता यांची वाढ करणारे मानले जाईल काय?

त्याचप्रमाणे अतिप्रभावी अद्वितीय व्यक्तिमत्त्व असलेल्या एखाद्या माणसाचे उदाहरण घ्या. त्याचे सर्व म्हणणे लोक आनंदाने व आदराने ऐकतात व मानतात. अशा थोर व्यक्तीला अशा दुसऱ्या व्यक्तीसमान मानणे शक्य आहे काय ज्याला कसले व्यक्तिमत्त्व नसून समाजात त्याला कसलीही प्रतिष्ठा अगर आदर नसून केवळ एक ऐतखाऊ व कुचकामाचा आहे तो व इतरांच्या चेष्टेचा विषय बनून राहिला आहे. आर्थिक समस्याच अशा हास्यास्पद माणसाची समस्या आहे काय की जी सुटल्याने त्याच्या इतर सर्व समस्या आपोआप सुटून जातील? अशा प्रकारच्या त्याच्या जीवनात त्या सर्व गुणांची सजावट व शोभा कधीतरी येऊ शकते काय, जी पहिल्या व्यक्तीच्या जीवनात आढळते ?

त्याचप्रमाणे एखादी रुपवती व प्रतिष्ठा असलेली स्त्री आणि दुसरी सौंदर्याचा व प्रतिष्ठेचा अभाव असलेली स्त्री एकमेकांसमान आहेत काय? व सर्व आर्थिक अडचणींची सोडवणूक झाली, तर दुसरी स्त्री ही पहिलीसारखी होऊ शकेल काय?

## नैतिक मूल्यांनाच प्राधान्य आहे

माणसामाणसांतील हाच फरक डोळ्यांपुढे ठेवून इस्लामने आर्थिक जीवन मूल्यांऐवजी नैतिक मूल्यांना प्राथमिक महत्त्व दिले आहे. कारण त्याच्या दृष्टीने मानवी जीवनाचा आधार आर्थिक मूल्यावर नसून काही बिगर आर्थिक मूल्यावर उभारलेला आहे. ती स्थापित करण्यासाठी, कृतीचे स्वरुप देण्यासाठी तितकेच कष्ट व धडपड करावी लागते जितके आर्थिक मूल्ये जीवनात स्थापन करण्यासाठी लागतात. म्हणून ईश्वर व मानव म्हणजेच स्वामी व दास यांच्या दरम्यान सदासर्वदा असणाऱ्या व टिकून राहाणाऱ्या नात्यावर इस्लाम जोर देतो. कारण हेच अल्लाहच्या व माणसाच्या दरम्यानचे नाते प्रत्यक्ष जीवनातील नैतिक मूल्यांचा संपूर्ण विकास होण्याचे सर्वोकृष्ट साधन होऊ शकते. आपल्या भौतिक गरजांच्या स्वाधीन होऊन सर्वनाश करणारी ओढाताण, तिरस्कार व द्वेष यांना बळी पडलेल्या माणसाला जीवनातील खालच्या पातळीवरुन वर काढतो. इस्लाम मानवाला अशा उच्च स्थानाप्रत पोचवितो जेथे माणूस आपल्या इच्छावासनांचा गुलाम न राहाता जेथे भलेपणा, चांगुलपणा व प्रेम यांचेच जणू शासन असते अशा एक मंगलमय जगात त्याला नेऊन सोडतो.

## आध्यात्मिक मूल्यांच्या सर्वश्रेष्ठपणाची आणखी एक बाजू

आध्यात्मिक शक्तींना व मूल्यांना मानवी जीवनात इस्लामच्या दृष्टीने आणखी एक बहुमोल महत्त्व असते. ह्या आध्यात्मिकतेचा मानवी जीवनांवर खोलवर प्रभाव पडतो. त्यांचेकडे नीट लक्ष देऊन त्यांची योग्य बांधणी केली तर ती मानवसमाजाला तितकीच उपकारक व परिणामकारक ठरू शकेल जितके एखादे आर्थिक तत्त्व. उलट सामाजिक परिवर्तनाच्या दृष्टीने त्यांचे क्षेत्र, इतर तत्त्वांच्या क्षेत्रापेक्षा अधिक विस्तृत आहे.

## इतिहासाच्या झरोक्यातून

मुस्लिमांचा इतिहास या सत्याचे एक बोलके प्रमाण आहे. म्हणूनच इस्लामचे पहिले खलीफा माननीय अबू बक्र (र) यांना धर्मविन्मुख बंडखोरांच्या विरोधात एकटेच ठामपणे उभे ठाकलेले, आम्ही पाहतो. खरे तर माननीय उमर बिन खत्ताब (र) यांच्या सारखी श्रेष्ठ व्यक्तीसुद्धा, या धर्माविरुद्ध असलेल्या लोकांशी युद्ध आरंभ करण्याविरुद्ध होती, तरीसुद्धा माननीय अबू बक्र (र) यांचे पाय डळमळले नाहीत व ते दृढनिश्चयाने आपल्या मतावर राहिले. त्यांच्या अशा अतुलनीय धैर्याच्या व ठामपणाच्या पाठीमागे कसला गुण कार्यान्वित होता? तो एखाद्या भौतिक लाभाचा विचार होता काय? की केवळ इहलोकाच्या लाभाची लालसा होती? की कोणत्यातरी सुखाची कल्पना होती ज्यामुळे अशा कठीण समयी त्यांच्यात असे धैर्य व असे मनोबल निर्माण केले व त्यामुळे सरतेशेवटी यश त्यांच्या पदकमलावर येऊन पडले. अशा कठीण प्रसंगी त्यांना कोणत्याही भौतिक लाभाची व सुखाच्या भावनेचे सहाय्य यशप्राप्तीसाठी झाले नाही हे निश्चित. तसे असते तर इतके मोठे कर्तव्य ते यशस्वीरित्या पार पाडू शकले नसते व इस्लामी इतिहासाच्या त्या कठीण काळात आपले कर्तव्य इतक्या उत्कृष्ट रीतीने पार पाडू शकले नसते. त्यांचे ते अतुलनीय धैर्य व संकटाच्या वादळात स्वत:वर इतका ताबा ठेवणे, या गोष्टी त्यांच्या आध्यात्मिक बलाचाच चमत्कार होता. मानव इतिहासातील हा एक महत्त्वपूर्ण अध्याय आहे. आध्यात्मिक बलामध्ये इतकी प्रबळ भौतिक शक्ती व आर्थिक शक्तीचा समावेश असतो की त्यासारखे दुसरे उदाहरण आढळत नाही, हे यावरुन कळून चुकते. असेच उदाहरण माननीय उमर बिन अब्दुल अजीज (र) यांचे आहे. त्यांनी आपल्या प्रबळ आध्यात्मिक शक्तीच्या सहाय्याने पूर्वीच्या खलीफांच्या सामाजिक नियमांना लागू केले आणि त्यानंतर असे ऐतिहासिक व आर्थिक चमत्कार पाहावयास मिळाले की इस्लामी समाजामध्ये दान घेणारा माणूस पाहावयास मिळत नसे.

## आध्यात्मिक पैलूंच्या महत्त्वाची मूळ कारणे

म्हणूनच इस्लाम या आध्यात्मिक अंगाला बहुमूल्य महत्त्व देतो, कारण तो मानवाला त्याच्या आश्चर्यकारक विकासाच्या नावाखाली भौतिक साधनांचा वापर करण्यापासूनही रोखत

नाही. इस्लाम चमत्काराचाही इन्कार करीत नाही, पण त्याची अपेक्षा करीत, हातपाय नसल्यासारखे स्वस्थ बसून राहणेही त्याला मान्य नाही उलट या संदर्भात त्याचा नियम असा आहे,

'ज्या गोष्टीना कुरआनद्वारा प्रतिबंध होऊ शकत नाही, त्या सर्व गोष्टींना निस्संशय, अल्लाह आपल्या शक्तीने पायबंद घालीत असतो.'

(तिसरे खलीफा माननीय उस्मान (र) यांचे कथन)

## कम्युनिझमचा मानवी पैलू हानीकारक

कम्युनिस्टांनी दाखविलेल्या पद्धतीनुसार जो कोणी आपल्या भौतिक व आर्थिक गरजा पुऱ्या करण्याचा प्रयत्न करतो त्याला आपल्या नैतिक व आध्यात्मिक जीवनाकडे लक्ष पुरविणे शक्यच होत नाही. याचे कारण असे, कम्युनिझममध्ये सगळे महत्त्व केवळ एकाच अंगाला म्हणजेच आर्थिक बाजूला असते. हे जर मान्य केले गेले तर मानव जीवनाचा सर्वांगीण विकास चालू राहूच शकत नाही. शरीरातील एकाच अवयवाची हृदय किंवा यकृत वाजवीपेक्षा अवास्तव वाढ होण्याचे उदाहरण घ्या. अशी एकाच अवयवाची वाजवीपेक्षा जास्त प्रमाणात झालेली वाढ, शरीराच्या इतर भागाच्या वाढीस हानिकारक सिद्ध होते व इतर अवयव आपले कार्य सुरळीत करु शकत नाहीत. तशीच अवस्था कम्युनिझममध्ये जीवनाच्या आर्थिक पैलूसंबंधी आहे त्याला असाधारण महत्त्व असल्याने जीवनातील इतर पैलूची वाढ खुंटते.

काही लोक इस्लाम व कम्युनिझमची अशी तात्त्विक तुलना केलेली पसंत करीत नाहीत, हे आम्ही जाणतो. कारण त्यांच्या मते अशा प्रकारची तात्त्विक चर्चा खालच्या दर्जाची असते व त्यापासून काही फायदा होत नसतो. जीवनातील व्यावहारिक समस्यांना मूळ महत्त्व आहे. म्हणून त्यांना तात्त्विक समस्यापेक्षा व चर्चेपेक्षा अधिक प्राधान्य दिले पाहिजे, असे त्यांना वाटते. म्हणून एखाद्या पद्धतीचा अंगिकार करताना अनावश्यक वादविवाद करून गुंतागुंत निर्माण करावयास नको. त्यामध्ये आपला दृष्टिकोन असा असावयास हवा, की विचाराधीन पद्धत व्यवहारी व प्रत्यक्ष जीवनात कितपत लाभकारक व व्यवहारी सिद्ध होऊ शकते हे पाहिले जावे. म्हणूनच या महानुभावांचा जेव्हा तात्त्विक चर्चेशी संबंध येतो तेव्हा ते त्रासिक बनतात व वैतागतात. व्यवहारी जीवनात शेवटी इस्लाम व कम्युनिझमच्या दरम्यान संघर्ष कसा आढळून येऊ शकतो, ही गोष्ट त्यांच्या ध्यानात येत नाही. म्हणून या दोहोतील संघर्षाचा ते मुळातच इन्कार करतात.

## इस्लाम व कम्युनिझममधील मतभेदाचा व्यवहारी प्रश्न

आमची विचारप्रणाली अशी नाही, कारण कोणत्याही समस्येच्या व्यवहारी व तात्त्विक बाजू वेगळ्या व विभक्त केल्या जाऊ शकत नाही. पण कम्युनिजम व इस्लाममध्ये केवळ तात्त्विक मतभेदच नसून त्यामध्ये खोलवर व्यावहारिक फरकही आहे. या फरकातील काही अंगे आम्ही खालील ओळीत देत आहोत.

## कुटुंब संस्थेचा नाश

स्त्रीचे मूळ जीवनकार्य, मानववंशाची वाढ करणे आहे, असा इस्लामी दृष्टिकोन आहे. म्हणून स्त्रीने घराबाहेर पडणे इस्लामला पसंत नाही. काही असाधारण अथवा तात्पुरत्या निकडीच्या परिस्थितीखेरीज शेतात व कारखान्यात जाऊन कामे करत हिंडण्याची परवानगी देत नाही. घरात कोणीही पुरुष, पती, बाप किंवा भाऊ अगर इतर नातेवाईक, कुटुंबातच नसतील जे तिचा भार वाहू शकतील, अशाच वेळी ती कामाकरिता किंवा मजुरीकरिता घराबाहेर पडू शकते. याच्या उलट कम्युनिझम पुरुषाप्रमाणे कारखान्यात व शेतात कामे करण्याची स्त्रियांवर सक्ती करतो. कम्युनिस्ट जीवनतत्त्व स्त्रीपुरुषांत कोणताही महत्त्वाचा मानसशास्त्रीय फरक बिल्कुल मानतच नाही. कम्युनिस्ट अर्थपद्धतीचा स्वाभाविक आधारच, उत्पादनाची भौतिक साधने जास्तीतजास्त वाढविण्याच्या कल्पनेवर उभारलेला आहे. राज्यातील सर्व व्यक्ती (पुरुष व स्त्रिया) घराबाहेर पडून व आपली सर्व शक्ती, योग्यता व पात्रता त्याकरिता वाहिल्या पाहिजेत. त्यासर्वांनी शेतांना व प्रयोगशाळांना आपले कार्यक्षेत्र बनवून टाकले पाहिजे. केवळ अशाच वेळी हा उद्देश साध्य होऊ शकतो हे स्पष्ट आहे. या मोहिमेत स्त्रियांनाही समाजातील इतर व्यक्तींच्या खांद्याला खांदा लाऊन समान रीतीने सहभागी होणे भाग आहे व त्यांच्या प्रमाणेच कर्तव्ये पार पाडावी लागतात. या बाबतीत तिला कसलीही सवलत अगर सूट मिळण्याचा हक्क नाही व प्रसूतिकाळ सोडून इतर दिवशी ती आपल्या कामावर गैरहजरही राहू शकत नाही. अशा अवस्थेचे अनिवार्य फळ असे निघेल की मुले आईच्या प्रेमापासून व मायेपासून वंचित राहतील व तेसुद्धा व्यापाराच्या इतर मालाप्रमाणेच राज्यातील कारखान्यात घाऊक प्रमाणात तयार केले जातील.

याचा अर्थ असा आहे की कम्युनिस्ट अर्थव्यवस्थेचा अंगीकार केल्यास आमच्या स्त्रियांना घराबाहेर पडून बाहेर काम करावे लागेल. त्यामुळे कौटुंबिक पद्धतीचा नाश होईल. खरेतर कुटुंबच इस्लामी शासन पद्धतीचा, नैतिकतेचा व आर्थिक पद्धतींचा मूलभूत पाया असून इस्लामी जीवनपद्धतीत कुटुंबाला मूळ महत्त्व असते. याच्या उत्तरादाखल एखाद्या सद्गृहस्थाने असे विचारले, की कम्युनिस्ट अर्थपद्धतीचा अंगीकार केल्यानंतर स्त्रियांना शेतात, कारखान्यात जाऊन कामे करण्यास भाग पाडले जाणार नाही. हा त्यांनी आपल्या मनाने रचलेला दृष्टिकोन असून तो कम्युनिस्ट दृष्टिकोन कदापिही नाही व कम्युनिस्ट त्यापासून संतुष्टही होऊ शकणार नाहीत. या बाबतीत कम्युनिस्टांनी कधीही दांभिकपणा अगर सोंग केले नाही. आर्थिक साधनांची वाढ करण्याच्या संदर्भात आम्ही मानव जीवनातील त्यांची आवश्यकता मानतो पण हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी कम्युनिस्ट अर्थव्यवस्थेचा अंगिकार करण्याची काही गरज नाही, कारण खुद्द

कम्युनिस्टांनी आपल्या अर्थव्यवस्थेत जी वृद्धी व विकास केला आहे, ती त्यांनी स्वत: निर्मिलेल्या आर्थिक साधनांनी केलेली नसून, त्यांनी इतर युरोपियन देशांकडून उसने घेतलेल्या आर्थिक साधनांद्वारे केला आहे. प्रश्न असा आहे की जर कम्युनिस्ट राज्य इतर राष्ट्रांकडून प्रगतीशील उत्पादक साधने मागून घेऊन प्रगती करु शकते, तर त्याच मार्गाने एक इस्लामी राष्ट्र जेव्हा आधुनिक तंत्राने शेती करण्यास अगर उद्योगधंद्यात आधुनिक पद्धतीचा वापर करुन जास्तीतजास्त उत्पादनाचा लाभ मिळविण्याच्या विरुद्ध तो नाही, तर मग इस्लाम प्रगती का करु शकणार नाही ?

## श्रमजीवी लोकांची हुकूमशाही

कम्युनिस्ट अर्थपद्धतीची इमारत श्रमजीवीवर्गाच्या हुकूमशाहीच्या पायावर उभारलेली आहे. दुसऱ्या शब्दांत सांगायचे म्हणजे आपल्या नागरिकांपैकी कोणी कोणते काम करायचे व कोणी काय करायचे हे ठरविण्याचा अधिकार केवळ सरकारलाच असतो. मग त्यांची असे काम करण्यास अनिवार्य व आवश्यक असलेली पात्रता असे वा नसो. अथवा त्यांच्या स्वभावधर्माशी आवडीनिवडीशी ते काम सुसंगत असो वा नसो. त्यांच्या विचारांवर व व्यवहारावर कडक निर्बंध लावले जातात. सरकारच्या संमतीविना कोणताही विचार केला जाऊ शकत नाही व काही लिहिले जाऊ शकत नाही. सार्वजनिक समित्यांचे स्वरुपही सरकारच तयार करीत असते व त्यांची उद्दिष्टे व त्यांचा कार्यविधी ठरविण्याचा अधिकार सरकारलाच असतो. एका व्यक्तीच्या हुकूमशाहीपेक्षा कम्युनिझमची ही श्रमजीवी वर्गांची हुकूमशाही कितीतरी दृष्टीने अधिक वाईट असते. या दोहोंतील फरकही वाचकांनी आपल्या नजरेसमोर ठेवला पाहिजे जेथे एका व्यक्तीची हुकूमशाही स्थापन होते, तेथे हुकूमशहा जर सज्जन व शिष्ट व्यक्ती असेल आणि त्याला देशाचे व राष्ट्राचे हित प्रिय असेल तर कसलाही कायदा लागू करताना अगर एखादा निर्णय घेताना, तो जनतेच्या खऱ्या अगर चुकीच्या प्रतिनिधींना सल्लामसलतीत समावेश करुन घेईल व त्यांच्या इच्छांनुसार कृती करील. श्रमजीवी हुकूमशाहीकडून अशी गोंडस आशाही केली जाऊ शकत नाही. कारण तिचा एकच उद्देश असतो. तो आर्थिक उद्देश असतो, जे कृत्य त्याची पकड अधिक मजबूत करते अशा कृत्यातच त्यांना स्वारस्य असते. खुद्द 'श्रमजीवी हुकूमशाहीची' व्याख्याच या वास्तवतेवर प्रकाश टाकते.

## कम्युनिझमचा तात्त्विक पराभव

या दोषांखेरीज कम्युनिझममध्ये आणखी एक मोठा दोष आढळतो, तो असा की, त्याचा कसलाही भरीव व तात्त्विक आधार आस्तित्वात नाही. याच कारणामुळे कम्युनिझम तत्त्व व

व्यवहार या दोहोंच्या बाबतीत इतर पद्धतीशी तडजोड करण्याच्या नीतीवर मार्गक्रमण करताना दिसून येतो. म्हणून पहिल्यांदा त्याने खाजगी संपत्ती पूर्णपणे समाप्त केल्याची घोषणा करुन टाकली व एकदम सर्व कामगारांची श्रेणी व त्यांचे वेतन समान करुन टाकले. पण लवकरच या दोन्ही बाबतीत त्यांना तडजोड करावी लागली कारण नंतरच्या अनुभवाने असे दाखवून दिले की, खाजगी संपत्तीच्या कल्पनेमुळे आपल्या कामावरील निष्ठा व श्रमाची आवड या आधारावर वेतनात फरक असणे आर्थिक दृष्टिकोनातूनही लाभदायक असते. कारण त्यापासून कामगारात आपल्या कामाबद्दल आवड व स्वारस्य निर्माण होते व त्याची फलनिष्पत्ती उत्पादनांत वाढ होण्यात होत असते. खाजगी संपत्ती व वेतनांतील फरक मान्य करुन कम्युनिस्टांनी कार्लमार्क्सच्या दोन महत्त्वाच्या व मूलभूत तत्त्वाकडे डोळेझाक करुन घेतली. इस्लामपासून नजीक असलेल्या एका दृष्टिकोनाचा अवलंब केला. प्रश्न असा आहे, की इतर सिद्धान्ताना व तत्त्वांना कंटाळून मानवता जेव्हा वारंवार इस्लामकडे पुन्हा वळून येत आहे, तेव्हा आम्ही मुस्लिमांनी आपल्या केवळ खऱ्या जीवनविधानाचा त्याग करुन कम्युनिझमच्या कडेवर का म्हणून जाऊन बसावे?

प्रकरण पंधरावे

# इस्लाम व आदर्शवाद

## कम्युनिस्ट प्रचार

प्रथम आम्हाला असे विचारण्यात येते की 'तुम्ही मुस्लिम लोक ज्याचा उल्लेख करता तसा इस्लाम कोठे आहे? त्याच्या वास्तविक स्वरुपाचा प्रत्यक्ष जीवनात तुम्ही केव्हा अवलंब केला आहे? तुमचा तर असा दावा आहे की इस्लाम एक आदर्श जीवन व्यवस्था आहे.[1] पण तसे कधी प्रत्यक्ष व्यवहारी जीवनात अस्तित्वात होते काय?' त्याच्या उत्तरादाखल इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) व पहिल्या चार खलीफांच्या विशेषकरुन पहिल्या दोन खलीफांच्या अंमलाखालील काळाकडे आम्ही निर्देश करतो. कारण इतिहासात त्यासारखे दुसरे उदाहरण तुम्हाला आढळणार नाही.

दुसरे खलीफा माननीय उमर बिन खताब (र) यांना तुम्ही एक आदर्श शासनकर्ते समजता व त्यांना इस्लामचा एक महान नेता मानता, पण त्यांच्या कारकिर्दीच्या काळातही आम्हाला जाहगीरदारी आर्थिक विषमता, असमानता, दडपशाही अज्ञान व मागासलेपणाखेरीज आणखी काही दृष्टीस पडत नाही. तुम्ही तर म्हणता की इस्लामने मुस्लिमांना शासक आपली जबाबदारी पार पाडण्यात अपयशी ठरले तर त्यांच्याकडून जाब

---

१. आदर्शवादाचा अर्थ पूर्वेतील लोक चांगला करतात व त्याचा उच्चार अशावेळी करतात जेव्हा एखाद्या पद्धतीतील संपूर्ण गुणाकडे निर्देश करण्याचा हेतू असतो. पण प्रस्तुत प्रकरणात हा शब्द त्या सर्वांगीण गुणाच्या अर्थाने वापरण्यात आलेला नाही. कारण या पुस्तकातील आमचा हेतू इस्लामसंबंधी पसरविलेल्या नानाविध शंकाकुशंका व गैरसमजुतीचे विश्लेषण करण्याचा आहे. येथे हा शब्द पाश्चिमात्य लोक लावतात त्या अर्थाने वापरलेला आहे. पाश्चिमात्यांनुसार, आदर्शवाद शब्दाचा अर्थ, सतत विचारात मग्न राहून जीवनातील दुर्भिक्ष, दारिद्र्य, संकटे अडचणी, अन्याय व अत्याचाराकडे डोळेझाक करणे असा आहे, जेव्हा दरिद्री जनतेचे क्षेमकुशल विचारणारा कोणीही नसतो व त्यांची संकटे व अडचणी दूर करण्यासाठी कोणतीही व्यवहारी उपाययोजना केली जात नाही, तेव्हा ते अन्याय व अत्याचाराच्या जात्यात भरडले जातात व त्यांना परिस्थितीच्या दयेवर सोडून देण्यात येते. युरोपवासीयांना या शब्दांचा उचित तिरस्कार वाटू लागण्याचे हेच कारण आहे. कारण एकीकडे तो लोकांना जहागीरदारी पद्धतीतील काबाडकष्ट करण्यात व अवमानात लोटून देतो, तर दुसरीकडे त्यांना निरर्थक तात्त्विक गुंतागुंतीत टाकून अडकविण्याचा प्रयत्न करतो व त्यांचा, त्यांच्या जीवनाशी व त्यांच्या समस्यांशी दूरचासुद्धा कसलाही संबंध नसतो. अशा प्रकारच्या गुंतागुंतीचे व पेचाचे उत्तर मानव स्वभाव केवळ तिरस्काराच्याच रुपाने देऊ शकतो, हे स्पष्ट आहे. ही अशी वैचारिक पार्श्वभूमी आहे जिच्या कारणास्तव आज युरोपातील लोक आदर्शवादाच्या सर्व प्रकारांची टिंगल व टवाळी करीत आहेत. याच स्थितीचा लाभ घेऊन कम्युनिझमचे ध्वजधारक इस्लामलाही अशा तऱ्हेचा एक निरर्थक व रिकामा सिद्धान्त असे म्हणतात. त्यापासून आपले अज्ञान, अडाणीपणा व आपले वैचारिक व बौद्धिक दारिद्र्यच व्यतीत होते, यापेक्षा जास्त त्यात काही नाही, असे म्हणतात.

विचारण्याचा अधिकार दिला आहे. ही तर मोठी गोष्ट झाली, पण त्या बिचाऱ्यांना आरंभीच्या तीस वर्षांच्या काळात आपले शासक स्वत: निवडण्याचा अधिकार कधी दिला गेला होता? तुम्ही असाही दावा करता आहात की इस्लाम संपत्तीचे न्यायपूर्ण रितीने वाटप करण्याच्या आधारावर असणारी एक न्यायपूर्ण अर्थव्यवस्था आहे, परंतु आरंभीच्या काळातील आदर्श युगातसुद्धा आर्थिक विषमतेची दरी केव्हा बुजवली गेली? सामान्य जनतेकरिता रोजगार उपलब्ध करण्याची जबाबदारी व कर्तव्ये शासनावर व इस्लामवर असते, असेही तुम्ही म्हणता. पण त्या लक्षावधी गांजलेल्या बेकार लोकासंबंधी तुमचे काय म्हणणे आहे, जे दारिद्र्याच्या व उपासमारीच्या भयानक भोवऱ्यातून बाहेर पडण्याच्या धडपडीत हातात भिक्षापात्र घेण्यास विवश झाले अथवा आयुष्यभर अभावग्रस्त राहून दुर्भिक्षाला बळी पडले? इस्लामने स्त्रीला सर्व हक्क देऊन ठेवले आहेत या गोष्टीचा तुम्हाला अभिमान वाटतो, पण या सर्व हक्कांपासून स्त्रीला कधीतरी लाभ करुन घेता आला काय? प्रतिकूल आर्थिक व सामाजिक परिस्थितीध्ये स्त्रीला त्यापासून लाभ करून घेण्याची संधीच कधी दिली नाही हे सत्य नाही काय? तुम्ही माणसाच्या आध्यात्मिक विकासाच्या बाबतीत मोठमोठ्या बाता मारत असता ते तुमच्या विचारानुसार ईश्वराच्या भयाचे फळ होते. तुमच्या मते या ईश्वरी भयामुळेच शासक व शासित राष्ट्रातील भिन्न भिन्न वर्गांत सहकार्य, न्याय व चांगुलपणाच्या पायावर आधारलेले संबंध निर्माण झाले, पण एका अल्पशा कालावधीखेरीज या आध्यात्मिक विकासाची झलक कोठे दिसून येते? त्या आध्यात्मिक विकासाने शासनाला नि:शस्त्र जनतेच्या हक्कांवर घाला घालण्यापासून का रोखले नाही? व त्याने त्यांचे स्वातंत्र्य का हिरावून घेतले? तुम्ही ज्या जगाबद्दल बोलत असता, ते एका काल्पनिक जगाखेरीज दुसरे काहीही नाही. खिलाफतच्या आरंभीच्या ज्या छोट्याशा काळावर तुम्ही मोहून गेला आहात त्यावरुन केवळ इतकेच सिद्ध होते की त्या काळात काही अनन्यसाधारण योग्यतेचे व पात्रतेचे काही लोक अस्तित्वात होते ज्यांनी ते आश्चर्यजनक कर्तृत्व करुन दाखविले. पण अशा व्यक्ती व त्यांची कर्तबगारी ही जीवनात अपवादात्मक आहेत. म्हणूनच त्यांचे नंतर तशा व्यक्ती व तशी कर्तबगारी कधीही दिसून आली नाही व पुढेही दिसून येण्याची शक्यता नाही. अशा प्रकारच्या शंकाकुशंका कम्युनिस्ट व त्याचे समर्थन करणारे इस्लामवर काढीत असतात. दुर्दैवाने मुस्लिमांपैकीही काहींना इतिहासाचे बिलकुल ज्ञान नाही व इस्लामसंबंधित ते आपल्या साम्राज्यवादी धन्याकडून जेवढे शिकले फक्त तेवढेच त्याना ठाऊक आहे.

## आदर्शवादाचे दोन प्रकार

मूळ प्रश्नावर विचार करण्यापूर्वी आम्ही आदर्शवादाच्या दोन मूलभूत प्रकारांतील फरक स्पष्ट करु इच्छितो. आदर्शवाद अथवा आदर्श पद्धतीचा एक प्रकार असा की जो केवळ वैचारिक जगापुरताच मर्यादित असून प्रत्यक्ष व्यवहारी जीवनात तो कोठेही आढळून येत नाही. तसेच

जीवनातील व्यवहारी प्रश्नांची तो सोडवणूक करु शकतो किंवा अंमलबजावणी करण्यायोग्य असतो, असा इतिहासातही कोणता पुरावा आढळत नाही. याउलट आदर्शवादाचा आणखी एक प्रकार आहे, जो केवळ काल्पनिक जगापुरताच मर्यादीत नसून, तो व्यवहारीक असल्याचा उघड दाखला इतिहासांत आढळतो, व माणसांच्या व्यवहारीक जीवनावर त्याचा खोलवर ठसा उमटलेला आढळून येतो.

## मूलभूत प्रश्न

आदर्शवादाचे हे दोन प्रकार लक्षात ठेवून विचार केला गेला तर चर्चेचा मूलभूत प्रश्न असा असल्याचे वाटते, की आपल्या प्राकृतिक स्वभावानुसार इस्लाम केवळ एक रिकामा सिद्धान्त आहे. त्याचे प्रत्यक्ष आचरणाच्या जगात कसलेही अस्तित्व नसून त्या नुसार आचरण केले जावू शकत नाही कारण त्याची सर्वगुंफण काल्पनिक व सैद्धान्तिक तत्वांचे एकत्रीकरण करुन झाली आहे? अथवा जर इस्लाम मूलभूत पद्धतीचा आहे तर जीवनातील एखाद्या व्यवहारीक पद्धतीला, सर्व युगात व्यवहारीक परिणामाच्या बाबतीत एकसारखेच यश प्राप्त व्हावे असेही आवश्यक नाही.

आदर्शवादाच्या या दोन प्रकारामध्ये जो मोठा फरक आहे त्याच्या स्पष्टीकरणाची गरज नाही. जर इस्लाम केवळ एक सिद्धांत व विचार असता, तर माणूस त्यावर न्याय्य तऱ्हेने आचरण करण्याची शक्यताच नाही. सामाजिक परिस्थितीमध्ये कालांतराने बाह्यरुपाने बरेच फेरबदल घडून आलेले असतील, परंतु ही जर एक व्यवहारी पद्धत आहे व केवळ काही बाह्य तत्वे त्याची पूर्ण अंमलबजावणी होण्याच्या मार्गात अडथळे बनून राहिले आहेत, तर मग प्रकरणाचे स्वरुपच पूर्णपणे बदलते. अशा अवस्थेत जर प्रतिकूल परिस्थिती बदलली किंवा इस्लामला अनुकूल झाली तर व्यवहारीक रितीने लागू होण्याची आकांक्षा पूर्ण होऊ शकते.

## इस्लाम एक व्यवहारीक पद्धत आहे

इस्लाम आदर्शवादाच्या प्रकारात मोडतो काय? या प्रश्नाचे उत्तर अगदी सोपे आहे. कारण ते इतके स्पष्ट आहे की त्याबाबत दुमत होऊच शकत नाही. इतिहासात इस्लाम संपूर्ण शानदार रीतीने स्थापन केला गेला आहे, हेच या गोष्टीचे खुले प्रमाण आहे. इस्लाम ती एक व्यवहारीक जीवनपद्धत आहे व त्यावर इच्छा असल्यास आजसुद्धा माणूस अंमल व आचरण करु शकतो. इस्लाम केवळ एक कल्पना अगर विचार नाही. दुसरीकडे गत काळात होता तसाच मानव आजही आहे त्याचा स्वभावधर्म तसाच आहे व त्यात काहीही बदल झालेला नाही. म्हणून ज्या माणसाने एकदा इस्लामवर यशस्वीरीतीने आचरण केले आहे त्याने आज आपल्या व्यवहारी जीवनात त्याला स्थान देवू नये व आपल्या आयुष्याला त्यानुसार आकार देऊ नये, याचे काहीही कारण नाही.

## जीवनधर्माच्या पुनरुत्थानाची चळवळ

वर्तमान युगातील काही प्रगतीवाद्यांचा असा दावा आहे की याकाळात इस्लामचे पुनरुत्थान होणे शक्यच नाही. त्यांच्या मते जीवनधर्माच्या पुनरुत्थानाचे प्रयत्न व्यर्थ आहेत, कारण त्यांना यश प्राप्त होण्याची कसलीही आशा नाही. पण आम्ही आमच्या या प्रगतीशील मित्रांना असे विचारु इच्छितो की इस्लाममुळे प्रारंभीच्या मुस्लिमांना नैतिक श्रेष्ठत्वाचे जे स्थान प्राप्त झाले होते, त्या टप्प्यापर्यंत पुन्हा पोहोचणे, आजच्या माणसाच्या आवाक्याबाहेरची गोष्ट आहे काय? जर ते खरे असेल तर त्यांच्या प्रगतीच्या घोषणांचे काय झाले व माणूस सतत प्रगतीच्या मार्गाने पुढे जात आहे व आपल्या बौद्धिक व नैतिक स्थितीच्या दृष्टीने पूर्वीपेक्षा उच्च व श्रेष्ठ स्थानावर पोहोचला आहे, या त्यांच्या दाव्याचे काय झाले?

## पहिले चार आदर्श खलीफांच्या खिलाफतवर शंका

राशिदाची (पहिल्या चार खलीफांची) खिलाफत अर्थात त्यांच्या कारकिर्दीचे आदर्शयुग फारच अल्पकाळाचे होते. त्यानंतर मुस्लिमांच्या इतिहासात फारच कमी प्रमाणात व नेहमी अल्पशा कालावधीपुरतेच (जसे माननीय उमर बिन अब्दुल अजीज (र) चा काळ) आढळते. इस्लामी जीवनपद्धतीच्या स्वरुपाने प्रत्यक्ष व्यवहार करण्यायोग्य नाही, असेच यावरुन सिद्ध होत नाही काय? या प्रश्नाचे उत्तर जाणून घेण्यासाठी थोडेसे खोलवर जाऊन मूळ समस्येचा आढावा घेऊ या. कारण कोठेतरी इस्लामी जगतातील स्थानिक चालीरीतीच्या रुपाने व कोठेकोठे जगातील राष्ट्रांच्या अनुभवाच्या तसेच विश्वव्यापी सत्याच्या रुपाने, इतिहासाच्या पानांत त्याचे उत्तर अंकित केले गेले आहे.

## लक्षात ठेवण्याच्या दोन गोष्टी

### पहिली गोष्ट

प्रश्नाच्या या बाजूचा विचार करताना आम्हाला दोन गोष्टी लक्षात ठेवल्या पाहिजेत.

पहिली गोष्ट ही की पहिल्या चार खलीफांच्या कारकिर्दीत इस्लामच्या कृपाछत्राखाली मानवतेची जी उन्नती झाली व ज्याप्रकारे इस्लामने मानवतेला तुच्छ व क्षुद्र अवस्थेतून वर काढून नैतिकतेच्या उच्चस्थानाशी तिचा परिचय करुन दिला, ती एक अशी घटना आहे जिचे स्पष्टीकरण, विश्लेषण अगर टीका नैसर्गिक नियमांच्या प्रकाशात करणे शक्य नाही. इस्लामद्धारा दिसून येणाऱ्या भूमीवरील अनेक चमत्कारांपैकी तो एक चमत्कार होता. पण हा चमत्कार सहजरीतीने घडून आला नाही. त्याकरीता मुस्लिमांना नैतिक क्रांतीच्या व नवनिर्माणाच्या अनेक टप्प्यांतून जावे लागले तेव्हा कोठे असे लोक जन्माला आले. ते या चमत्काराचे जिवंत उदाहरण होते व त्यांचे

जीवन त्यांचे व्यवहारी स्पष्टीकरण होते. ज्या जलदगतीने इस्लामचा जगात प्रसार व प्रगती झाली, त्यासारखे दुसरे उदाहरण इतिहासात आढळत नाही. इतिहासाच्या भौतिक व आर्थिक विश्लेषणाच्या सहाय्याने इस्लामच्या या आश्चर्यजनक प्रगतीचे स्पष्टीकरण करणे अशक्य आहे. काहीही असले तरी इस्लामच्या अशा जबरदस्त प्रसाराचा एक परिणाम असा झाला की ज्या जाती अजून पूर्णपणे इस्लामच्या सत्याशी परिचित नव्हत्या व ज्यांना इस्लामच्या सामाजिक, आर्थिक व राजकीय पद्धतीच्या मूल्यांचाही काही अंदज नव्हता अशा काही जाती इस्लामच्या क्षेत्रात दाखल झाल्या. या नवागतांना इस्लामबद्दलचे ज्ञान जवळजवळ शून्यच होते. त्यावर चीड आणणारी गोष्ट अशी की त्या काळातील मुस्लिम शासकांनीही त्यांच्या इस्लामी शिक्षण संस्काराच्या बाबतीत कसलीही तरतूद केली नाही, जशी तरतूद प्रारंभीच्या अरबी मुस्लिमांकरिता करण्यात आली होती.

त्यामुळे इस्लामी राज्याच्या सीमा विस्तार पावत गेल्या व मुस्लिमांची संख्याही वाढत गेली. पण नवमुस्लिमांची ही वाढती संख्या इस्लामच्या शिकवणीपासून व त्याच्या तत्त्वांपासून पूर्वीप्रमाणेच अनभिज्ञ राहिली. म्हणून पहिल्यांदाच जेव्हा मुस्लिम शासकांना उघडपणे इस्लामी आदेशाविरुद्ध वर्तन करण्याचे साहस झाले. कारण त्या काळी इस्लामी समाजात कोणीही माहीतगार व प्रशिक्षित जनमत अस्तित्वात नव्हते. आता त्यांच्या चुकांवर टीका टिप्पणी करणारे व त्यांना रोखणारे कोणी नव्हते. म्हणून त्यांनी लोकांचे हक्क हिरावून घेतले व त्यांचा सर्व प्रकारे छळ व अत्याचार करण्यास सुरुवात केली. बनी उमैय्या, बनी अब्बास, तुर्की व गुलाम बादशहांचा इतिहास जुलूम व अत्याचाराच्या अशा घटनांनी कलंकित झालेला आहे. हाच तो काळ होता, जेव्हा शासकांना इस्लामला एखाद्या बाहुल्याच्या स्वरुपात आणून सोडले होते व मुस्लिमांचे हक्क अतिशय निष्ठूरपणे ठेचून व दडपून ठेवले.

## दुसरी गोष्ट

या संदर्भात लक्षात ठेवण्यासारखी दुसरी गोष्ट अशी की इस्लाममुळे मानवतेची जी प्रचंड प्रगती झाली ती केवळ कोणत्याही भौतिक अथवा नैसर्गिक तत्त्वाची निपज नव्हती. ज्या इस्लामने एकाच उड्डाणात मानवतेला गुलामीच्या व जहागीरदारीच्या अवमानाच्या गर्तेतून वर काढून सामाजिक न्यायाच्या उच्च स्थानाप्रत नेऊन पोचविले - त्या तऱ्हेचे दुसरे उदाहरण शोधून सापडत नाही. मानवतेची आंधळ्या बहिऱ्या शिक्षणापासून व वासना लालसांच्या दास्यत्वातून सुटका झाली व ती नैतिकतेच्या सर्वोच्च स्थानावर आरुढ होऊन बसली.

आरंभीच्या काळातील मुस्लिमांचे आश्चर्यजनक नैतिक उत्कर्ष हा इस्लामचाच चमत्कार होता, कारण इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) व त्यांचे सोबती हे जणू श्रेष्ठतम आध्यात्मिक बलाचेच प्रतीक होते. या अशा आध्यात्मिक बलाच्या कारणामुळेच त्यांनी अशी कर्तबगारी करुन

दाखविली जी आज आश्चर्यजनक चमत्कारासारखी वाटते. जेव्हा त्यांची ही शक्ती अथवा आध्यात्मिक बलाचा हा झरा आटू लागला तेव्हा त्यांच्या मनात ईश्वरी उपदेश व मार्गदर्शनरुपी ज्योत काही प्रमाणात सर्व काळांत तेवत होती. आम्ही या प्रकरणात संपूर्ण मानवजातीचे लक्ष, इस्लामी इतिहासाच्या या उज्ज्वल काळाकडे वेधू इच्छितो व आकर्षित करु इच्छितो.

## ह्या प्रगत युगात इस्लामी पद्धतीची स्थापना अधिक सुलभ

आता व्यवहारी जीवनात इस्लामच्या प्रारंभिक काळाप्रमाणे कोणतीही आध्यात्मिक क्रांती केलीच जाऊ शकत नाही, कारण या वेळी इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) आमच्यात नाहीत, तसेच त्यांचे श्रेष्ठ सोबतीही नाहीत, असा काही लोक चुकीचा समज करुन बसले आहेत. हा विचार कदापिही खरा नाही. कारण गेल्या तेरा शतकांत मुस्लिम समुदायाला तसेच मानवतेला जो दीर्घ अनुभव तसेच प्रगती व उन्नती प्राप्त झाली आहे त्या कारणास्तव राजकीय व आर्थिक संदर्भात जगात ज्या गोष्टी चमत्कार समजल्या जात होत्या त्या आता चमत्कार उरल्या नसून त्यांची प्राप्तीही आता अशक्य उरली नाही. त्याकरिता जी पात्रता व क्षमता लागते ती आजच्या माणसात पुरेपूर आहे म्हणून प्रारंभीच्या काळातील मुस्लिमांचे उज्ज्वल उदाहरण डोळ्यांपुढे ठेवून, वर्तमान युगांतही इस्लामी जीवनपद्धतीला प्रत्यक्ष व्यवहारात व आचरणात आणणे काहीही कठीण नाही. कारण पूर्वीपेक्षा आजचे जग इस्लामच्या कितीतरी जवळ येऊन ठेपले आहे. म्हणूनच पूर्वीच्या मानाने अल्पशा प्रमाणात प्रयत्न केल्याने आम्ही आपले उद्दिष्ट गाठू शकतो.

## लोकशाही पद्धतीने शासकांची निवड व इस्लाम

उदाहरणार्थ, पुष्कळशा राष्ट्रांत सध्याच्या काळात आपल्या शासकांची निवड खुल्या सार्वत्रिक निवडणुकीने केली जाते. तसेच आपण निवडलेल्या प्रतिनिधींना त्यांची कर्तव्ये व्यवस्थित रितीने पार पाडण्यात जर अपयश आले तर त्यांना पदच्युत करण्याचा किंवा अधिकारापासून दूर करण्याचा अधिकार लोकांना असतो. खरे तर हे इस्लामी पद्धतीच्याच एका वैशिष्ट्याचे नवीन प्रदर्शन आहे. हेच वैशिष्ट्य इस्लामने तेरा शतकापूर्वी जगासमोर सादर केले होते. माननीय अबू बक्र (र) व माननीय उमर (र) यांच्या काळात हा नियम लागू करणे हा चमत्कार होता, पण आज तो चमत्कार राहिला नसून, एक वास्तवता बनली आहे. ती प्राप्त करणे पूर्णपणे आमच्या आवाक्यात आहे. अट एवढीच आहे की आम्ही निष्ठेने व प्रामाणिकपणे त्यास आपल्या जीवनात लागू केला पाहिजे. इतरांची नक्कल करुन व अनुकरण करुन हा नियम जर आम्ही इंग्लंड, अमेरिकेतून आयात करु शकतो तर शेवटी इस्लामच्या नावाने त्याचा अंगीकार का करु शकत नाही? खरे तर इस्लाममध्ये हा नियम काही नवीन नसून, पूर्वीपासूनच तो इस्लाममध्ये आहे.

## मूलभूत गरजांची गोष्ट

त्याचप्रमाणे राज्यातर्फे आपल्या कर्मचारी वर्गासाठी लागणाऱ्या मूलभूत जीवनावश्यक वस्तूंचा पुरवठा करण्याच्या हमीचा प्रश्न आहे. या संदर्भात इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स) यांचा स्पष्ट आदेश आहे, की आपल्या कर्मचाऱ्यांना लागणाऱ्या जीवनावश्यक वस्तू उपलब्ध करण्याची शासनावर जबाबदारी आहे. या इस्लामी सिद्धान्ताचा अवलंब करण्यासाठी विसाव्या शतकात कम्युनिस्टांना श्रमजीवी हुकूमशाहीचा आधार घ्यावा लागला. खरे तर इस्लामने कितीतरी पूर्वी हुकूमशाहीचे सहाय्य न घेता, यशस्वीरीत्या ती इस्लामी जीवनपद्धती अमलात आणून दाखवून दिली होती. म्हणून आज आम्हाला राज्याच्या कर्मचाऱ्यांचे जीवनावश्यक गरजांचे रक्षण हवे असेल, तर त्याकरिता कम्युनिस्टांकडे पाहण्याची गरज कदापिही नाही, इस्लामचे मार्गदर्शन व त्याचे उज्ज्वल उदाहरण पुरेसे आहे.

## चर्चेचा मूळ विषय

काहीही असले तरी मूळ प्रश्नाचा विषय असा आहे की एखादी विशिष्ट सामाजिक, आर्थिक व राजकीय पद्धत व्यवहार्य आहे किंवा नाही? याच कसोटीवर घासून पारखून तिच्या व्यवहार्य असण्याच्या अगर नसण्याच्या बाबतीत निर्णय घेतला जाऊ शकतो. इस्लामच्या संदर्भात आम्ही असे म्हणू शकतो की तो पूर्णपणे या कसोटीला उतरतो कारण ती वास्तविकपणे एक व्यवहार्य जीवनपद्धत आहे. या भूतलावर यशस्वीरीतीने कार्यान्वित झालेली व अंगीकार केली गेलेली तीच पहिली परिपूर्ण जीवनपद्धत होय.

## इस्लाम केवळ इच्छा भावनांची निपज आहे काय?

वर्तमान संस्कृतीची इमारत वैज्ञानिक सत्याच्या मूळपायावर उभारलेली आहे व इस्लाम मात्र केवळ सदिच्छांवर व भावनांच्या आधारावर उभारलेला आहे. या कम्युनिस्ट साहित्यिकांच्या व त्यांच्या पाठीराख्यांच्या प्रतिपादनात थोडेही सत्य किंवा तथ्य नाही. इस्लामी कायद्यावर एक नजर टाकल्यास कम्युनिस्टांचा हा दावा किती भोंगळ आहे हे स्पष्ट होण्यासाठी पुरेसे आहे. इस्लामने जी कायदा व्यवस्था निर्माण केली ती केवळ सदिच्छा व भावनांवर नसून भक्कम पुराव्यांवर व प्रत्यक्ष घटनांवर आधारलेली आहे. त्याचप्रमाणे सरळ मार्गावर असलेले खलीफांचे उदाहरण आमच्या समोर आहे. त्यांनी सल्लागार समितीत सल्ला देताना अगर एखाद्या इस्लामी कायद्याचे स्पष्टीकरण व विश्लेषण करताना, अथवा तो कायदा लागू करताना, आपले निर्णय इच्छांच्या, आकांक्षांच्या व स्वत:च्या आवडीनिवडीच्या पायावर कधीही उभारलेले नव्हते.

पण सत्य असे आहे, की जीवनासाठी एक कायदा पद्धत सादर करूनसुद्धा इस्लाम

केवळ कायद्यावरच विसंबून न राहता तो माणसाच्या अंतर्मनाला सुसंस्कृत करण्यावर लक्ष केंद्रित करतो व त्याच्यामध्ये इतकी नैतिक चेतना जागृत करतो की माणूस स्वत:होऊनच कायद्याचे पालन करु लागतो. या उद्देशाकरिता त्याच्यावर कसलाही बाह्य धाक अगर लालूच दाखविण्याची गरज उरत नाही. राजकीय क्षेत्रात असा माणूस सर्वांत मोठे यश प्राप्त करतो. जेव्हा समाजाच्या सार्वजनिक हिताची निकड असेल व सुधारणा करण्याचे इतर सर्व मार्ग अयशस्वी ठरतात तेव्हाच इस्लामी कायदा कार्यान्वित केला जातो. तिसरे खलीफा माननीय उस्मान (र) यांचे हे कथन सुप्रसिद्ध आहे,

'ज्या वाईट गोष्टींना कुरआनद्वारा पायबंद बसत नाही त्या सर्व वाईट गोष्टी अल्लाह आपल्या शक्तीने रोखतो.'

हे कथन इस्लामी कायद्याचे हेच महत्त्वाचे वैशिष्ट्य स्पष्ट करते.

## इस्लामचे पुनरुत्थान आजसुद्धा शक्य आहे काही उदाहरणे

जे लोक इस्लामचे पुनरुत्थान अशक्य आहे समजतात, ते बहुधा असे म्हणताना ऐकले जाते की, माननीय उमर (र) यांच्या सारख्या महान व भारदस्त व्यक्ती इतिहासात वारंवार जन्माला येत नसतात.

हजारो साल नर्गिस अपनी बे नूरी पे रोती है।
बडी मुश्किल से होता है चमन में दीदावर पैदा॥

अशा प्रकारच्या गोष्टी वास्तविकपणे त्या लोकांचा बौद्धिक दिवाळखोरपणाच प्रकट करत असतात. कारण इस्लामी पद्धतीची स्थापना व इस्लामी कायदा व्यवहारात लागू करण्याच्या संदर्भात आज आमच्यात माननीय उमर (र) यांच्या सारख्या आदर्श व्यक्तींची आवश्यकता नसून, सोडून दिलेल्या त्या कायद्यांची व कायदेशीर उदाहरणांची गरज आहे. आम्ही जर निष्ठा बाळगली तर आम्ही त्याची अंमलबजावणी करु न शकण्याला काहीही कारण नाही. उदाहणार्थ, माननीय उमर (र) यांनी आपल्या खिलाफतीच्या कारकिर्दीत असा एक हुकूम जारी केला होता की जर एखाद्याने काही आर्थिक अगर सामाजिक विवशतेच्या कारणाच्या निकडीमुळे चोरीचा गुन्हा केला असेल तर त्याला हात तोडण्याची शिक्षा दिली जाऊ नये. कायद्याचे हे उदाहरण आज लागू करण्यासाठी आज खुद्द माननीय उमर (र) यांनी समक्ष हजर असण्याची काही गरज आहे काय? नक्कीच नाही, कारण त्यांचा तो हुकूम वास्तविकपणे त्यांचा इज्तेहाद (कुरआन व हदीसच्या आधारावर नवीन समस्येवर घेतलेला निर्णय) होता व इस्लामी धर्मशास्त्राच्या या सिद्धांतापासून घेतला गेला होता.

'संशय असलेल्या अवस्थेत शिक्षा देऊ नका' - हदीस

त्याचप्रमाणे माननीय उमर (र) यांनी आपल्या कारकिर्दीत असाही एक नियम केला होता की धनवान व श्रीमंत लोकांकडून अतिरिक्त धन काढून घेऊन त्याचे वाटप हलाखीच्या अवस्थेत असणाऱ्या गरीब लोकांत करण्याचा पुरेपूर अधिकार मुस्लिम शासक बाळगतात. आज इंग्लंडमध्ये नेमक्या यांच नियमाची अंमलबजावणी चालू आहे. पण हा नियम करण्यासाठी व तो लागू करण्यासाठी इंग्लंडला कोणत्याही उमरची गरज भासली नाही, हे उघडच आहे. इस्लामी कायदा व्यवहार्य असल्याचे व तो लागू होण्याचे हे सर्वांत मोठे प्रमाण आहे. कारण हा नियमही माननीय उमर (र) यांनी स्वत: तयार केलेला नव्हता तर कुरआनच्या या आयतीतून घेतला गेला होता.

"जेणेकरुन धन हे धनवान लोकांत फिरत राहू नये." (कुरआन)

माननीय उमर (र) यांनी खलीफाच्या नात्याने आपले मतही सांगितले की सरकारला आपल्या कर्मचाऱ्यांच्या व अधिकाऱ्यांच्या संपत्तीची व मिळकतीच्या साधनांची संपूर्ण चौकशी करण्याचा व शोध घेण्याचा पूर्ण अधिकार आहे, जेणेकरुन त्यांनी संपत्ती रीतसर मार्गाने मिळविली की गैरमार्गांनी मिळविली याची माहिती मिळावी. जरी आमच्यात कोणी उमर नसले तरी वर्तमान काळात या नियमाला सारे जग मानते व त्यानुसार कृतीही चालू आहे.

माननीय उमर (र) यांनी असाही कायदा केला होता की अनाथ व अनौरस (ज्यांच्या आईबापांचा ठावठिकाणा नाही) मुलांची देखरेख व संगोपन करण्याची जबाबदारी शासनावर आहे. त्यांच्या शिक्षण संस्काराचा खर्चाचा भार राज्याच्या खजिन्यातून वाहिला जाईल जेणेकरून माता-पित्यांच्या पापाची शिक्षा मुलांना भोगावी लागू नये. विसाव्या शतकात इंग्लंड, अमेरिकेलाही हाच कायदा करावा लागला. यावरुन इस्लामी कायदा व्यवहार्य होण्यास व तो लागू केला जाण्यास माननीय उमर (र) यांच्या सारख्या महान व्यक्तीच्या अस्तित्वावर विसंबून राहणार नाही, हेच सत्य यावरुन उघडपणे समोर येते. त्याची आम्हाला गरज आहे. ते माननीय उमर (र) यांच्या महान व्यक्तित्वाचा गुण नसून ते प्रारंभीच्या काळातील एक सुप्रसिद्ध व निष्णांत धर्मशास्त्रज्ञ होते आणि इस्लामचा वास्तविक आत्मा त्यांच्यात ओतप्रोत भरलेला होता. त्यांना इस्लामची तत्त्वे व सिद्धान्त जाणण्याची शुद्ध अंत: प्रेरणा लाभली होती. त्यांच्या वैयक्तिक जीवनाच्या उदाहरणापासून ज्ञानरुपी प्रकाश प्राशन करुन आम्ही आमचे जीवन शुशोभित करु शकतो. त्यांचे व्यक्तिमत्त्व सर्व काळात व सर्व स्थानी सर्व मुस्लिमांकरिता एक पवित्र आदर्श आहे, हा त्यांचा गुण आहे. पण त्यांचे हे सर्व व्यक्तिगत गुण आम्ही आमच्यात निर्माण करु शकलो नाही असे मानले तरी त्यांनी मागे सोडलेल्या इस्लामी धर्मशास्त्राचे पालन केले तरी ते आमच्या सामूहिक व व्यवहारी

जीवनाच्या हितासाठी पुरेसे होऊ शकते. कारण असे केल्याने कमीतकमी इतरांकडून नियमांची व कायद्याची भीक मागण्याच्या अपमानापासून तरी आम्ही वाचू शकू.

## इस्लाम पहिल्या चार खलीफांच्या कारकिर्दीबरोबरच समाप्त झाला नाही

इस्लामी पद्धतीबाबत आणखी एक गैरसमज आढळून येतो, आरंभीच्या चार खलीफांच्या कारकिर्दीचा काळ व माननीय उमर बीन अब्दुल अजीज (र) यांच्या अल्पशा कारकिर्दीचा काळ सोडला तर इस्लामी पद्धत कधी पूर्णपणे स्थापन झालीच नाही, असेही म्हटले जाते. पण असे म्हणणारे लोक ही गोष्ट विसरतात की पहिल्या चार खलीफानंतर व माननीय उमर बिन अब्दुल अजीज (र) यांच्या नंतर धर्म किंवा जीवनपद्धतीच्या रुपाने इस्लामचा संपूर्ण लोप झाला नव्हता, उलट तो तशाचा तसाच होता. इस्लामी दृष्टिकोनातून पहिल्या चार खलीफांच्या कालानंतर त्या शासन पद्धतीत काही अंशाने अगर पूर्णपणे एक विमनस्क व रोगट परिवर्तन घडून आले होते. परंतु समाज अध्यात्माच्या दृष्टीने अजूनही इस्लामी समाज होता. म्हणूनच त्या समाजाने 'धनवान' व निर्धन किंवा 'स्वामी' व 'दास' यासारखे वर्गवारी विभाजन कधीही पसंत केले नाही. याचे कारण असे की सर्व व्यक्ती बंधुत्वाच्या बंधनात गुंफलेल्या आहेत असा इस्लामी समाज होता. परिश्रमाच्या व त्याच्या फलाच्या वाटपात ते सर्व समान हक्काने सहभागी होते.

## इस्लामची अंमलबजावणी नंतरच्या काळात

त्याचप्रमाणे इस्लामी जगताच्या विविध भागात इस्लामच्याच नागरी व दिवाणी कायद्याचा अमल होता व त्याने युरोपसारखे, जहागीरदारांच्या दयेकृपेवर कधी जनतेला सोडले नव्हते. मुस्लिमांच्या इतिहासातील प्रत्येक काळ इस्लामी परंपरांनी प्रकाशमान झालेला दिसून येतो. मुस्लिमांना वेळोवेळी आपल्या शत्रूबरोबर जी युद्धे करावी लागली, त्या युद्धकाळांत अशा परंपरांची झलक सहज दिसून येते. या संदर्भात सलाहुद्दीन अय्युबीने केलेले धर्मयुद्ध मुख्यत्वेकरून उल्लेखनीय आहे. त्याचप्रमाणे आंतरराष्ट्रीय क्षेत्रात तडजोडी पार पाडण्याच्या व तडीस नेण्याच्या बाबतीत मुस्लिमांचा मागील इतिहासही फार उज्ज्वल आहे. ज्ञानार्जनाची ओढ व संस्कृती व सभ्यतेबद्दल त्यांची अभिरुचि अशी होती की इस्लामी जगात हे त्या काळचे ज्ञान व कलेचे कोठार होते. इस्लामने प्रज्वलित केलेल्या या मशालीनेच शेवटी समस्त युरोप उजळून गेला व प्रगती-विकासाच्या मार्गाने पुढे जाण्यायोग्य बनला.

सारांश असा की इस्लाम त्या गलिच्छ अर्थाने आदर्शवाद नाही, जो अर्थ पश्चिमेत साधारणत: समजला जातो. उलट ती एक परिपूर्ण व व्यवहार्य जीवनपद्धत असून, एकदा तिचा यशस्वीरीतीने प्रयोग व अमल झाला आहे. आजसुद्धा त्यावर अधिक सुलभतेने अमल केला

जाऊ शकतो. कारण गेल्या तेरा शतकांच्या काळात मानवाला जे अनुभव प्राप्त झाले त्याने मानवाला इस्लामच्या आणखी जवळ आणले आहे. या युगात ज्या पद्धतीला खऱ्या अर्थाने भोंगळ व पोकळ सिद्धान्त व तत्त्वाचे प्रतीक म्हटले जाऊ शकते, ती कम्युनिझम असून तिचा आजपर्यंत यशस्वीरितीने अंगीकार केला जाऊ शकला नाही. खुद्द कम्युनिस्टच ही गोष्ट मान्य करतात की खऱ्या कम्युनिझमचा टप्पा अजून पुढेच आहे. तरीसुद्धा जग हळूहळू कम्युनिझमकडे वळत आहे. जेव्हा सर्व जग एकाच कम्युनिस्ट शासनाच्या अमलाखाली येईल व संपत्तीचे जगातील सर्व लोकांत समान वाटप केले जाईल, तेव्हा कोठे खरा कम्युनिझम स्थापन होईल. त्याच वेळी धनवान व निर्धन यामधील वर्गकलह कायमचा संपेल, कारण या संघर्षाचे मूळ कारणच आर्थिक विषमता आहे.

## कम्युनिझमच्या कल्पनेचा स्वर्ग

कम्युनिझमच्या या काल्पनिक स्वर्गाचा वास्तवतेशी एखादा दूरचाही संबंध नाही. सत्याच्या स्वरुपात त्याचा उदय होऊच शकत नाही. स्व:ताची व समस्त जगाची घोर फसवणूक करण्यासारखे त्याचे स्वरुप आहे. ज्या कल्पनाविलासावर त्याचा डोलारा उभा आहे त्या सर्व खोट्या व बिन आधाराच्या आहेत. कारण माणसामध्ये कृत्रिम साधनाद्वारे समानता निर्माण केली जाऊ शकत नाही; तसेच संपत्तीचे समान वाटप केल्यानेही, माणसांच्या सर्व समस्या सुटून जाणार नाहीत. मानवतेच्या प्रगतीचे रहस्य वर्गकलहात दडलेले आहे ही गोष्टही खरी नाही. कम्युनिझम अशा एका आदर्शवादाचा ध्वजधारक आहे की ज्याची विचारशक्ती व आकलनशक्तीची क्षमता नष्ट झाली आहे, असे लोकच त्यापासून मोहित होऊ शकतात. या सिद्धान्ताचा अंकुरच मुळात भौतिकवादापासून फुटलेला आहे. तरीसुद्धा अतिवैज्ञानिक असल्याचा व जीवनातील तथ्याशी एकरुप असल्याचा त्यांचा दावा आहे.

**प्रकरण सोळावे**

# तर आता काय केले पाहिजे?

## कार्य करण्याचा मार्ग

इस्लामने आम्हाला जे उद्दिष्ट व लक्ष्य दिले आहे, ते साध्य करण्याची पद्धत कोणती आहे? इस्लाम एक सर्वांत श्रेष्ठ जीवनपद्धत आहे व आमची ऐतिहासिक, भौगोलिक व आंतरराष्ट्रीय स्थिती पाहता, आम्हा मुस्लिमांना, आदर, प्रतिष्ठा, नेतृत्व व सामाजिक न्याय प्राप्त करण्यासाठी इस्लामच एकमेव साधन आहे. प्रश्न असा उद्‌भवतो की वर्तमान परिस्थितीमध्ये आम्ही त्यानुसार अमल कशा प्रकारे करु शकतो ? आज सारे जग त्याच्या विरोधात आहे व खुद्द मुस्लिम देशांत अशा हुकुमशहांचा अमल आहे, की जे परक्यापेक्षा जास्त तीव्रतेने इस्लामचा विरोध करण्यात कार्यशील आहेत?

## श्रद्धा व विश्वासाचा मार्ग

होय, पुढे जाण्याचा मार्ग कोणता आहे? आम्ही काय करावयास हवे? कोणतेही आंदोलन यशस्वी होण्यासाठी आवश्यक असणारा व अवलंब केला जाणारा श्रद्धा व विश्वासाचा मार्गच आहे. तो इस्लामी ध्येय व उद्दिष्टाप्रत पोचण्याचा मार्ग आहे, हे त्याचे उत्तर आहे.

## महान ऐतिहासिक चमत्कार

आरंभीच्या काळातील मुस्लिमांच्या शांततेचे उगमस्थान या श्रद्धेतच (ईमान) होते. आजच्या मुस्लिमांच्या मुक्तीचे रहस्य यातच दडलेले आहे. मुस्लिमांच्या दर्जाने आम्ही ज्या प्रकारच्या परिस्थितींनी वेढलेले आहोत, ती आरंभीच्या काळातील मुस्लिमांच्या परिस्थितीहून काही वेगळी नाही. ते मूठभर लोक होते. त्यांनी संख्येने भौतिक साधनसामग्रीने व शस्त्राने, तसेच कला व राजकीय शक्ती, या सर्व बाबतीत त्यांच्यापेक्षा कितीतरी वरचढ व भारी असलेल्या व त्या काळी सर्वशक्तिमान असलेल्या रोमन व इराणी साम्राज्याविरुद्ध युद्ध आघाडी उभी केली होती. संख्येने व शक्तीने यांचा गर्व व अहंकार धुळीस मिळविला व तांबड्या समुद्रापासून ते भूमध्य समुद्रापर्यंत सर्व भागावर कब्जा केला. हे त्यांचे यश इतिहासातील एक महान चमत्कार आहे.

इतिहासातील भौतिक स्पष्टीकरणाने व विश्लेषणाने या ऐतिहासिक चमत्काराची वास्तविकता नीट समजली जाऊ शकत नाही. ती केवळ श्रद्धा व विश्वासाच्या आधारानेच समजली जाऊ शकते. हीच दृढ श्रद्धेची भावना होती ज्यामुळे मुस्लिम मुजाहिद (अल्लाहखातर धर्मयुद्ध करणारा) रणभूमीवर शत्रूसैन्य पाहिल्यावर अशी आरोळी ठोकीत,

'मी तेथे जाऊन त्या व्यक्तीला सत्य नाकारणाऱ्याला ठार करावे अथवा त्याच्या हातून स्वत: धारातीर्थी पडावे एवढीच एक गोष्ट माझ्या व स्वर्गाच्या दरम्यान अडसर आहे.'

अशी गर्जना करून ते रणभूमीत असे आनंदाने झेपावत असत जसा एखादा वर आपल्या नवविवाहित वधूच्या खोलीत प्रवेश करतो. शत्रूसैन्य पाहिल्यावर त्यांच्या तोंडून नकळतच असे उद्‌गार बाहेर पडत,

'तुम्ही आमच्या बाबतीत दोन चांगुलपणापैंकी व लाभापैकी एकाची प्रतिक्षा करता आहात काय?' अर्थात विजय अगर शहादत (हौतात्म्य).

हा तो मार्ग आहे, ज्यावर चालून आम्ही आपले ध्येय साध्य करु शकतो. या मार्गाने गेल्याखेरीज कोणतेही आंदोलन आपल्या यशाच्या स्थानापर्यंत पोहोचू शकत नाही.

## शस्त्रांची गरज आहे काय?

शस्त्रासंबंधीही आम्हाला प्रश्न करण्यात येतो. आमच्याजवळ सध्या शस्त्रे नाहीत व इतर आवश्यक साधनसामग्री नाही. मग त्यांच्या विना आम्ही इस्लामी पद्धत स्थापण्यासाठी करावे लागणारे युद्ध कसे जिंकू शकू, असेही म्हटले जाते. असे म्हणणाऱ्यात काही निष्ठावान लोकही आहेत आणि काही निष्कृष्ठ व हीन विचारांचे आहेत. शस्त्रे व भौतिक साधनसामग्री आवश्यक आहे, हे खरे आहे. तसेच सध्या यापैकी कोणतीही वस्तू आमच्याकडे नाही, यात शंका नाही. पण आमची प्राथमिक गरज शस्त्रे नाहीत, ही गोष्ट आम्ही विसरता कामा नये. केवळ शस्त्रबळावर कोणतेही राष्ट्र आजवर कसलाही चमत्कार दाखवू शकलेले नाही. गेल्या जागतिक महायुद्धात इटलीचे सैन्य सर्व आधुनिक शस्त्रांनिशी सज्ज होते; पण असे असूनही त्यांना काही घवघवीत यश मिळू शकले नाही. त्यांचे सैनिक अतिशय भित्रे व पळपुटे सिद्ध झाले व पळताना आपली सर्व शस्त्रे ते शत्रूसाठी टाकून पळाले. त्यांच्याकडे शस्त्रे कमी नव्हती, पण श्रद्धा व विश्वास यांची उणीव होती.

## शस्त्रे व श्रद्धा

या उलट, अंत:करणात श्रद्धेची भावना ओतप्रोत भरलेल्या एका छोट्याशा समूहाने, ज्यांची संख्या जेमतेम शंभरापर्यंत होती व ज्यांच्या गनिमी तुकडीत सहा-सात व्यक्तींपेक्षा अधिक संख्या नसे. अशा छोट्या समूहाने, त्या बलाढ्य पण आतून पोकळ असलेल्या इटली राज्याच्या शासकांना असे गडबडून सोडले की त्यांनी तो देश सोडण्यातच आपले हित आहे हे जाणले. दृढश्रद्धा असलेल्या या लोकांजवळ कोणतीही संहारक शस्त्रे नव्हती. त्यांच्याकडे भारी तोफखाना नव्हता, जेट विमाने नव्हती की चिलखती तुकड्या नव्हत्या. ही लढाई त्यांनी प्रत्यक्षात मामुली पिस्तूल व बंदुकींनी केली होती. पण शत्रूच्या शस्त्रापेक्षा अनेक पटीने परिणामकारक व भयानक शस्त्र त्यांचेकडे होते व ते म्हणजे त्यांच्या दृढ श्रद्धेचे व भावनांचे शस्त्र. प्रारंभीच्या काळातील मुस्लिमांप्रमाणेच अल्लाहच्या मार्गात लढतांना ते त्यांच्या प्रमाणेंच दृढ श्रद्धेच्या भावनेने ओथंबलेले

होते. त्यांनी मनात असा संकल्प केला होता की एकतर ते अल्लाहच्या मार्गात शत्रूंना ठार करतील अथवा त्यांच्या हातून शहीद होतील. अत्यंत कठीण व प्रतिकूल परिस्थितीत त्यांच्या यशाचे रहस्य त्यांची हीच अढळ श्रध्दा व दृढ निश्चय होता.[१]

## सत्यमार्गावर प्रेम हे हौतात्म्याचे स्थान

आम्ही ज्या मार्गाचा अंगीकार केला आहे, ती फुलांची शेज नसून संघर्ष, रक्तपात व अश्रूधारांमधून जाणारा मार्ग आहे, हे आम्ही जाणतो. त्यात बळी दिल्याशिवाय काम चालत नाही. याच मार्गाने जाऊन आम्ही आमची उच्च उद्दिष्टे आदर, मानसन्मान, प्रतिष्ठा व सामाजिक न्याय प्राप्त करु शकतो आणि हा सौदा काही महागात नाही.

## बलिदान अनिवार्य आहे.

सत्य असे आहे की तिरस्कार, अपमान, दुर्भिक्ष, कमकुवतपणा व अस्ताव्यस्तपणाच्या कारणास्तव आम्हाला यातनांच्या व आपत्तींच्या ज्या वादळातून जावे लागले त्यापेक्षा कितीतरी अधिक यातना, संकटे व आपत्तींना सामोरे जाण्यास इस्लाम आम्हाला हाक देत आहे. गेल्या जागतिक महायुद्धात लाखो अरब नष्ट झाले. मित्रराष्ट्रांच्या बॉंबवर्षावाला हजारो बळी पडले. असंख्य व्यक्तींची मालमत्ता नष्ट झाली. असंख्य लोकांना कैद करून तुरुंगात कोंबले गेले. मोठ्या संख्येत लोकांच्या उपजीविकेची साधने हिरावून घेतली गेली. इतके होऊनही आम्ही चर्चिलचे समाधान करु शकलो नाही. महायुद्ध संपताच निस्संकोचपणे ते आम्हाला म्हणाले, 'आम्ही तुमचे रक्षण केले आहे. त्याची किंमत चुकवण्यास आता तयार राहा.'

## पाश्चिमात्य शक्तींची वागण्याची पद्धत

काल परवाचीच गोष्ट आहे की, अरबांच्या संयुक्त संरक्षणाच्या वाटाघाटीद्वारा अरबांना आपल्याबरोबर घेण्याकरिता पाश्चिमात्य शक्ती बेचैन होत्या. त्यात त्यांचा उद्देश असा होता की कमीतकमी पन्नास लाख अरबांना त्यांच्या फौजेत दाखल करून घेऊन, त्यांच्यावर आपल्या संहारक शस्त्रांचा प्रयोग करावा आणि गोरे इंग्रज व अमेरिकन लोक संहारापासून वाचावेत. अरब सरळपणे त्यांचा प्रस्ताव मान्य करीत नाही हे जेव्हा त्यांनी पाहिले तेव्हा त्यांनी अरब जगतातील उत्पादनाच्या साधनांवर जबरदस्तीने कब्जा केला. अरब जनतेचा अवमान केला व जेव्हा त्यांच्या कामाची गरज संपली तेव्हा त्यांना उचलून फेकून दिले.

मृत्यू एक अटळ वास्तवता असून त्यापासून कोणतेही प्राणीमात्र निसटू अगर वाचू शकत नाही. म्हणून संकटांनी व आपत्तींनी घाबरुन जाऊन हातपाय गाळून बसणे व्यर्थ आहे. कितीतरी लोकांना अपमान व अनादराचे मरण आले. महायुद्धामध्ये मित्रराष्ट्रांकडून लढणाऱ्या पाच लाख लोकांचा बळी दिला गेला असा अंदाज आहे. तर मग आम्ही इस्लामकरिता सत्य व श्रेष्ठत्वाकरिता

आपले प्राण अर्पण करण्यात का संकोच करावा? इस्लामकरिता जगणारे व इस्लामकरिता मरणारे पाच लाख लोक आज असले, तर सध्याचे राजकीय चित्र अगदी बदलू शकते, यावर विश्वास बाळगा. त्यानंतर कोणताही संहारक हुकूमशहा गरजताना दिसणार नाही अथवा एखाद्या ख्रिश्चनेतर साम्राज्यवादाचाही उदय होणार नाही, हे सांगण्याची आताही गरज आहे काय?

## कम्युनिझमची प्रगती व इस्लाम

वर्तमान युगातील कम्युनिस्टांच्या वाढत्या प्रगतीने व त्याच्या वेगाने काही लोक भयग्रस्त झाले आहेत. खरे तर त्यात विचलित होण्याचे काहीही कारण नाही. जोवर इस्लामचा संबंध आहे, तेथवर कम्युनिस्टांच्या येण्याने जागतिक स्थितीमध्ये रतीभर ही फरक पडलेला नाही. आज जे देश कम्युनिझमच्या प्रभावाखाली आहेत ते विशाल ख्रिश्चन जगाचा भाग असताना जितके तीव्र इस्लाम विरोधक होते तसेच विरोधक ते आजही आहेत. म्हणूनच कम्युनिस्ट क्रांतीच्या फार आधीपासून रशियन सरकार मुस्लिम देशात फूट पाडण्यासाठी व वैमनस्य वाढविण्यासाठी आपले हस्तक पाठवित असे. मुस्लिमांचे हित त्या वेळीही त्यांना प्रिय नव्हते व आजही नाही. अशीच अवस्था युरोपचीही आहे. गतकाळात युरोपने मुस्लिमांविरुद्ध धर्मयुद्धे केली व आजसुद्धा त्याच पवित्र कार्यात मश्गुल आहे. तात्पर्य असे की इस्लामच्या व मुस्लिमांच्या संदर्भात जागतिक स्थितीमध्ये कसलाही फरक पडलेला नाही.

## आम्ही कोठे उभे आहोत ?

या पार्श्वभूमीतून पाहिले, तर आरंभीच्या काळातील मुस्लिम ज्या स्थानी होते त्याच ठिकाणी आम्ही मुस्लिमांच्या दर्जाने उभे आहोत. ते उजव्या व डाव्या बाजूला त्या काळच्या अति बलाढ्य विरोधक शक्ती ईराण व रोम यांच्या दरम्यान वेढलेले होते. तशीच अवस्था आमची आज आहे. उरली गोष्ट त्या जुलमी व अत्याचारी शासकांची जे सध्या इस्लामी देशांवर राज्य करीत आहेत. तर त्यांच्या बाबतीत आम्हाला केवळ इतकेच सांगायचे आहे की त्यांचे थोडेच दिवस शिल्लक आहेत, कारण अशा प्रकारची जुलमी व अत्याचारी सरकारे जास्त दिवस टिकत नाहीत, याला इतिहास साक्ष आहे.

## इस्लामी चेतनेची निकड

या वेळी जी इस्लामी चेतना इस्लामी जगतात उदय पावत आहे, ती इस्लामी सिद्धान्ताच्या प्रकाशझोतात सामूहिक व सामाजिक न्याय कार्यान्वित झाल्याचे पाहू इच्छिते. या उद्दिष्टासाठी तो पूर्वेकडील गटाच्या सहाय्यावर जगण्यास तयार नाही; तसेच पश्चिमेकडील गटाकडून भीक मागणेही त्याला सहन होत नाही.

## नव्या जगाचा जन्म होत आहे

अतिशय कठीण व प्रतिकूल परिस्थिती असतानाही इस्लामी आंदोलन सर्व ठिकाणी मूळ धरत व वाढत आहे. ही आनंदाची व समाधानाची गोष्ट आहे. त्याची शक्ती वाढत आहे व त्याचे महत्त्व एकसारखे वाढत आहे. अशा स्थितीत इस्लामचे पुनरुत्थान अनिवार्य असून, ज्याची झलक जगाने तेरा शतकापूर्वी पाहिली आहे अशा शानदार व उज्वल ऐतिहासिक युगाचा, इस्लामच्या प्रभावाखाली पुन्हा एकदा उदय होत असल्याचे स्पष्टपणे दिसून येत आहे.

## वर्तमान जगाच्या मुक्तीचा मार्ग

आजचे युग एकीकडे भौतिकवादी व दुसरीकडे आर्थिक संघर्षात अडकलेले आहे. इस्लाम त्याला या दोहोंपासून मुक्ती मिळवून देऊन त्याला अशी एक जीवनपद्धत देतो, की जी भूतद्रव्यावर तसेच आत्म्यावर प्रभावशाली आहे व 'दोहों'च्या गरजा एकाच वेळी पुऱ्या करते. भौतिकवादाच्या शापाने माणसांच्या मनाची व आत्म्याची शांती हिरावून घेऊन त्याच्या जगाला ओढाताणीच्या आखाड्याचे स्वरुप दिले आहे. वर्तमान युगातील या रोगांवर उपाय करणे इस्लामद्वाराच शक्य आहे. कारण तो आत्म्याला भूतद्रव्यावर बळी देत नाही; तसेच आत्म्याच्या महत्त्वासंबंधी असा अतिरेकी नाही की जीवनातील भौतिक पैलूंकडे अगदी डोळेझाक केली जावी. या दोन टोकांमधील मध्य व समतोल साधणारा बिंदू इस्लाम स्पष्ट करतो व त्यांच्या निकडीमध्ये एकजिनसीपणा निर्माण करतो. उशिरा का होईना भावी जगातील लोकांना इस्लामच्या वास्ताविक मूल्यांची जाणीव होऊनच राहील, अशी आम्हाला आशा वाटते. जगाने धर्म म्हणून जरी त्याचा स्वीकार केला नाही, तरी इस्लामने सादर केलेल्या जीवन तत्त्वाकडे कोणत्याही परिस्थितीत जास्त काळापर्यंत डोळेझाक करु शकणार नाही. त्याचा अंगिकार करण्यातच त्यांची मुक्ती आहे.

उरले आम्ही इस्लामी आंदोलनाचे कार्यकर्ते तर त्यांना सांगणे असे आहे, की आम्ही जो मार्ग पत्कारला आहे तो आल्हादकारक व शीतल मार्ग नाही, हे आम्ही जाणून आहोत. आरंभीच्या काळातील मुस्लिमांप्रमाणेच आम्हालाही सत्त्वपरीक्षांच्या, संकटांच्या व अडचणींच्या अतिकष्टप्रद व जीवघेण्या टप्प्यातून जावे लागणार आहे. तेव्हा कोठे जगाला इस्लामच्या सत्यावर आम्ही संतुष्ट करु शकू. कारण या मार्गात जे प्रयत्न केले जातात व जो त्याग व बळी दिला जातो, ते कधीही व्यर्थ होत नाही. भूमी व आकाश या सत्याला साक्षी आहेत,

'जे अल्लाहची मदत करतात, अल्लाहसुद्धा त्यांना जरुर मदत करील, निस्संशय अल्लाह सर्वशक्तिमान व प्रभावी आहे.' (कुरआन)

**व सर्वश्रेष्ठ अल्लाहचे वचन निस्संशय खरे आहे.**



'ज्या वेळी मी हे पुस्तक लिहित होतो, त्या वेळी, ते इतकें लोकप्रिय होईल असा विचारही माझ्या मनात आला नव्हता.

असे असूनही मला असे वाटत होते की हे पुस्तक पुढे प्रकाशित करण्याची गरज नाही. कारण माझ्या मते आम्हाला आमचे प्रयत्न, इस्लाम विरोधकांनी पसरविलेले गैरसमज व त्यांनी निर्माण केलेल्या शंकाकुशंकाचा वेढा तोडण्यापर्यंतच मर्यादित ठेवावयास नको. उलट आता आम्ही जीवनाच्या विविध क्षेत्रात इस्लामी शिकवणीच्या स्वीकारार्ह बाजूचे उत्पादन करावे, अशी गरज आहे.

परंतु माझी नजर जेव्हा पौर्वात्य विद्याविशारद विलफ्रेड कैंटवेल स्मिथने लिहिलेल्या 'इस्लाम इन मॉडर्न हिस्ट्री' या पुस्तकावर पडली व जेव्हा मी पाहिले की या लेखकाने आपल्या पुस्तकात तीन वेगवेगळ्या ठिकाणी, माझ्या पुस्तकाबाबत इतके तिरवट व अपमानजनक शब्द वापरले आहेत की त्यांच्यामध्ये व शिवीमध्ये काहीही फरक नव्हता. म्हणून मी अशा निर्णयाप्रत आलो, मी ज्या पुस्तकाने संकुचित बुद्धीच्या ख्रिश्चनांना इतके प्रक्षोभित केले आहे, ते पुन्हा पुन्हा प्रकाशित होऊन वाचले जाण्यायोग्य आहे.

(याच पुस्तकाच्या अरबी आवृत्तीच्या प्रस्तावनेमधील एक भाग)

– लेखक

